# सादर त्रिवार प्रणाम

---

सन १९४२ च्या आगस्ट क्रांतींत जीं जीं खेडीं ब्रिटिश
सत्तेच्या विरुद्ध लढलीं, ज्यांनी राष्ट्रध्वजाच्या सरक्ष
णार्थ आपलें सर्वस्व अर्पण केलें, ज्यांनी स्वातंत्र्याच्या
बलिवेदीवर आपल्या तरुणाचें रक्त सांडलें व
ज्यांची भूमि हुतात्म्यांच्या चिताभस्मानें
पावन झाली त्या सर्व भारतीय खेड्यांच्या
वीरतेला, त्यागाला, स्वराष्ट्रभक्तीला
व राष्ट्रध्वजावरील प्रीतीला याव
त्यांच्या स्वातंत्र्यसंग्रामाचा हा
इतिहास आदरपूर्वक त्रिवार
प्रणाम करीत आहे

---



दे. भ. शरच्चंद्र बोस व वृद्ध फकीर अकबरशाहा

# प्रस्तावना

माझे मित्र सुप्रसिद्ध विदर्भीय लेखक श्री. हरिहरराव उर्फ भय्यासाहेब देशपांडे यानी लिहिलेल्या यावलीच्या स्वातंत्र्यसंग्रामाचा परिचय प्रस्तावनेच्या द्वारें वाचकांना करून देण्याची कामगिरी यावलीकर मित्र पंजाबराव यानी मजवर सोपविली आहे. एखाद्या ग्रंथाचा, वाचनाने प्रत्यक्ष परिचय करून घेण्यापूर्वी वा देण्यापूर्वी प्रस्तावनेच्या सहाय्याने परोक्ष परिचय करून घेणें वा देणें हें एवढ्याचसाठीं अवश्य असतें कीं त्यायोगें ग्रंथातील विषयाचें यथार्थ-ज्ञान होणें वाचकांना सुकर व्हावें. परंतु त्यासाठीं वस्तुतः ग्रंथकाराने स्वतःच प्रस्तावना लिहिणें सोयीचें असतें. कारण ग्रंथकाराचें हृद्गत यथार्थच अधिक चांगलें जाणत असतो. इतरांना तें कळलेंच असलें तरी त्याच्याइतकी इतरांना त्याची अचूक ओळख पटलेली नसतें. तेव्हा या यावलीच्या स्वातंत्र्यसंग्रामाला श्री. हरिहरराव देशपांडे यानीच प्रस्तावना लिहिली असती तर ती अधिक युक्त व उपयुक्तहि झाली असती. परंतु त्यानी ती जबाबदारी स्वतः न पत्करिता मित्र पंजाबरावाकडून आग्रहाने माझ्यावर लादविली आणि प्रेमळ मित्राची भीड मोडवेना म्हणून मीं ती नाइलाजानें पत्करली. तेव्हा आता श्री. हरिहरराव देशपांडे याचें हृद्गत अगर त्यांच्या या सुंदर व सुरस ग्रंथाचें रहस्य वाचकांच्या नीट लक्षात येण्यासाठी प्रस्तावनेच्या रुपाने मी जें मार्गदर्शन करीन तें जर त्यांच्या कल्पनेशीं ततोतंत जुळलें नाही अगर सपशेल चुकीचें ठरलें तर त्याबद्दल त्यानी मला दोष देऊ नये अशी अपेक्षा मीं केल्यास ती अयोग्य ठरेल असें मला वाटत नाही. कारण त्याचें हृद्गत सांगण्याचा मीं कितीहि इमानेंइतबारें यत्न केला तरी त्यात माझा स्वतःचा असा थोडा बहुत अंश निःसंशय रहाणारच. इतकेंच नव्हे तर असाहि संभव आहे कीं त्याचें नाव पुढे करून कळत वा न कळत मी माझेंच हृद्गत वाचकांच्या पुढें मांडीन व त्यामुळे लोकांची कदाचित दिशाभूलहि होईल कोणी सांगावें ? ग्रंथकाराचें हृद्गत अचूक कळणें हें किती कठीण असतें याचा उत्कृष्ट नमुना म्हणजे गीतेवरील नानाप्रकारच्या टीका. प्रत्येक टीकाकार आपला अर्थ निश्चायक आहे असे छातीला हात लावून सांगतो, परंतु कोणत्याहि

टीकाकाराचा कोणाशींहि मेळ बसत नाही. तेव्हा याहि ठिकाणीं असाच गोंधळ होणार नाही कशावरून ! परंतु आतां काहीहि होणार असलें तरी ग्रंथकाराला व प्रकाशकाला येणाऱ्या भोगाला सादर झालेंच पाहिजे व त्याच्याबरोबर वाचकानीहि या जुलुमापुढें आपली मान बिनतक्रार वाकविलीच पाहिजे. असो.

यावली हें मागासलेल्या वऱ्हाड प्रांतांतील मूठभर अशिक्षित व निर्धन लोकाच्या वस्तीचें एक छोटेसें खेडें! व त्यानें सन १९४२ सालात आसेतु-हिमाचलात उसळलेल्या क्रान्तीच्या प्रचंड वादळात सांपडून त्याच्या हादऱ्यानें थोडीबहुत हालचाल केली. परंतु तिला ' स्वातंत्र्यसंग्रामाचें " भव्य नाव देऊन श्री. हरिहरराव देशपांड्यानी तिच्यावर एक विस्तृत वर्णनपर ग्रंथ लिहिला. तेव्हा हें गौडबंगाल आहे तरी काय ! असा वाचकांना प्रश्न पडण्याचा संभव आहे व सकृद्दर्शनीं तसे होणें अगदी साहजिकहि आहे लहान-मोठ्या खेडेगांवातून अशा मारामाऱ्या अगर दंगेधोपे नेहमीच होत असतात व त्यां काळातहि झालेले होते. परंतु त्याचें वर्णन करण्यासाठीं श्री. हरिहरराव सारख्या प्रथितयश इतिहास लेखकानीं एवढाले ग्रंथ लिहून काढल्याचीं उदाहरणें मराठी साहित्यात तरी क्वचितच आढळतील—किंबहुना आढळणारच नाहीत. मग "यावलीच्या" या छोट्याशा गडबडीलाच एवढें महत्त्व कां? " स्वातंत्र्याची स्फूर्ति " त्या गडबडीच्या मुळाशीं होती एवढें एक कारण तिचें एवढें अवडबर माजविण्यास पुरेसें आहे काय ? का तिच्यात याहून काही विशेष होतें आणि तो विशेष वाचकाच्या पुढे सांगोपांग मांडण्यासाठी श्री. हरिहरराव याना हा एवढा प्रचंड उपव्याप करावा लागला आहे ? शिवाय तो विशेष तरी इतक्या महत्त्वाचा व मोलाचा होता काय की त्याचें यथार्थ दर्शन वाचकाना घडणें सांप्रतच्या काळीं अत्यवश्य आहे. या व अशाच अनेक प्रश्नाचा उलगडा झाल्या वाचून या ग्रंथाचें महत्व वाचकाच्या लक्षात नीटसें भरेल असें वाटत नाहीं. तेव्हा याबद्दल दोन शब्द लिहिणें भाग आहे

समग्र ग्रंथ लक्षपूर्वक वाचून पाहिल्यानंतर वाचकाना निश्चितपणें असें आढळून येईल कीं श्री. हरिहररावसारख्या कसलेल्या सूक्ष्मदर्शी लेखकास असें काही तरी विशेषत्व या अद्भुतरम्य प्रसंगात साठलेलें आढळलें म्हणूनच त्यानें

लेखनाचे एवढे परिश्रम केले व आपलें लेखनकौशल्य खर्ची घालून 'या लहान गोष्टीवर हा मोठा ग्रंथ" लिहिला नाहीतर अशा "अव्यापारेषु व्यापारात" पडण्याचें त्याला अर्थाअर्थी कांहीच कारण नव्हतें 'यावली'ची दगल कितीही छोटी असली तरी ती एक सुटी व अल्प स्थलकालानें मर्यादित झालेली कवडीमोल दगल नव्हती, तर हिंदुस्थानाच्या पोटात आज कैक वर्षापासून पेटलेल्या व प्रत्यहि सतत वाढत असलेल्या एका सर्वव्यापी महाविशाल विराटस्वरूपी क्रांतीच्या अतिप्रसर प्रलयाग्नीचें साम्प्रतच्या परिस्थितीचा शीतल पृष्ठभाग फोडून बाहेर पडलेलें तें एक उत्तुंग व तेजःपुंज ज्वालाशृंग होतें व त्याच्या द्वारें कालगर्भात वेगाने वृद्धिंगत होत असलेल्या अभूतपूर्व अभिनव क्रांतीचें शुद्धरूप अत्यल्प प्रमाणात का होईना परंतु स्पष्ट प्रगट झालेलें होतें तेव्हा "यावलीचा स्वातंत्र्यसंग्राम" व ही भविष्यकालात सर्वजगत् व्यापून टाकणारी विराट क्रांति यांचा हा अन्योन्य निकट संबंध वाचकाना समजावून देणें व त्या बरोबरच साधल्यास भावी क्रान्तीच्या यथार्थ स्वरूपाचा पूर्वपरिचय करून देणें ग्रंथकारास अवश्य होतें तसे त्याने केलें नसतें तर या संग्रामाचें रहस्यच त्यास समजलें नसल्याकारणाने या संग्रामाचें वर्णन करण्यास तो पात्र नाही असेंच दुर्दैवाने म्हणावें लागलें असतें. "या छोट्या गोष्टीचा मोठा ग्रंथ" लिहिण्याचें आमच्या मतें खरें कारण हें आहे अर्थात हा ग्रंथकाराचा हेतु ग्रंथात कितपत् सिद्ध झाला आहे हें पाहणें वाचकाचें काम आहे व ते तें करतील अशी आशा आहे.

तथापि अशा उद्देशानें ग्रंथावलोकन करीत असता वाचकाना एक महत्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. हा क्रान्तिशास्त्रावरील स्वतंत्र ग्रंथ नसल्यामुळे क्रान्तीचें शास्त्रोक्त विस्तृत विवेचन यात कोठेंहि स्वतन्त्रपणें केलेलें त्यांना फारसें आढळणार नाही व त्यामुळे या संग्रामाचा भावी क्रान्तीशीं असलेला हा अतिनिकट अगाधी भावसंबंध स्पष्टपणें त्याच्या लक्षात भरण्यास क्वचित प्रसंगीं कठीणहि जाईल. तथापि ठिकठिकाणीं तत्कालीन परिस्थितीचीं जीं विस्तृत वर्णनें आलीं आहेत तीं लक्षपूर्वक वाचल्यास त्या वर्णनाच्या द्वारें त्या परिस्थितीच्या पृष्ठभागाखालीं नांदत असलेल्या क्रान्तीचें त्यास निदान दिग्दर्शन तरी खात्रीनें होईल अशी आमची समजूत आहे.

परंतु हें दिग्दर्शन होण्यासहि क्रान्तीच्या स्वरूपाचें थोडें तरी पूर्वज्ञान वाचकास असणें अवश्य आहे. कारण त्यावाचून आपणास दिसत आहे हें खरोखर त्या क्रान्तीदेवतेचेंच रूप आहे अशी त्यास खात्री पटणें शक्य नाहीं. कारण ज्यानें देव कधीच पाहिलेला नाहीं अगर देवासवधानें वेडीवाकडी भलीबुरी खरीखोटी कोणत्याच प्रकारची कल्पनाहि ज्याच्या डोक्यात कधी आली नाही, त्याच्यासमोर अकस्मात् देव साक्षात् येऊन उभा राहिला तरी देव म्हणतात तो हाच अशी त्यास ओळख कशी पटणार? खऱ्या खोट्याची कसोटी पहाण्यासाठी प्रत्यक्ष नसला तर निदान काल्पनिक तरी त्या वस्तूचा पूर्वपरिचय मनुष्यास असावा लागतो आणि म्हणून प्रथाचा पूर्वपरिचय करून देण्याच्या हेतूने लिहिलेल्या या प्रस्तावनेंत क्रान्तीसंबंधच्या काही ठोकळ कल्पनांशीं वाचकाची गाठ घालून देणें आम्हास इष्ट वाटतें. तथापि हें करीत' असता क्रान्तीच्या बाह्यागापेक्षा तिच्या अतरंगाचाच म्हणजे क्रान्तिकाळात मानवी मनोव्यापारांत ज्या अनेक घडामोडी व स्थित्यतरें सारखीं घडून येत असतात त्याचाच विचार या स्थळीं आम्ही प्राधान्यानें करणार आहोंत अर्थात् आमच्या विचाराचें श्री हरिहरराव यांच्या क्रान्तीविषयक सिद्धान्तांशीं कितपत साम्य असेल हें आम्हीं सांगू शकत नाहीं कदाचित त्यांच्यात साम्यापेक्षा वैषम्यच अधिक असण्याचाहि संभव आहे तथापि आम्हीं स्वीकारलेली विचारसरणी डोळ्यापुढे ठेवून ग्रंथ वाचल्यास त्यातील रहस्य समजण्यास वाचकांना बरेंच सोपें होईल अशी आमची कल्पना आहे अस्तु

सृष्टींतील सर्व प्राण्यांच्या शिरोभागीं मोठ्या डौलानें नांदणाऱ्या मनुष्य प्राण्याचा प्रपंच आज कसा काय चालला आहे हें पाहूं लागल्यास आपणास काय आढळून येतें? ईश्वराची प्रत्यक्ष प्रतिमा म्हणून वाखाणल्या जाणाऱ्या मनुष्य प्राण्याची परिस्थिति इतर कनिष्ठ प्राण्यांच्या परिस्थितीपेक्षा अधिक सुखदायक व प्रगतिपर असावयास पाहिजे, हें उघड आहे परंतु तशी ती आज आहे काय? इतर प्राण्यांच्यापेक्षा मनुष्य प्राण्यास निसर्ग देवतेला सुप्रसन्न करण्याचें सामर्थ्य जास्त प्रमाणांत झालें आहे तेव्हा त्या सामर्थ्याचा योग्य उपयोग करून त्याने आपल्या अशाश्वत व शाश्वत सुख वैभवात दिनी पटीनें अधिक भर टाकलेली आहे? का सुख सरतीच्या तुडुंबेच्या सरोवरात डुबत असताहि तो पाषाणाप्रमाणे कोरडाच्या कोरडाच राहिला आहे?

एखाद्या मोठ्या शहरात जा अगर एखाद्या छोट्या खेड्यात जा, तेथे एका बाजूला थोड्या मूठभर लोकांचे भव्य व सुंदर प्रासाद दिमाखाने उभे असलेले व त्यांत नाना प्रकारच्या विलासरंगात दंग झालेले स्त्री पुरुष स्वर्गानंदात तल्लीन झालेले आढळतील, आणि लगेच दुसऱ्या बाजूला काडीमोडीची चंद्रमोळी घरें व त्यात अन्नावाचून तडफडणारी, जीर्ण वस्त्र परिधान केलेली-' मनुष्य ' या थोर संज्ञेने ओळखिली जाणारी पाप्याची पितरें दारिद्र्याच्या महा भयानक नरकात सडत-कुजत मरणोन्मुख होऊन पडलेली सापडतील. सृष्टिदेवतेनें वाढत्या मानवजातीला पुरून उरेल इतकी सुखसाधन संपत्ति आपल्या भांडागारांत भरून ठेवलेली असता व ती यथेच्छ लुटण्यास मानवास सर्रास मुभा दिलेली असतां, इतकेंच नव्हे तर बुद्धिमान मनुष्य प्राणी विज्ञानाच्या सहायाने या सृष्टसंपत्तीची सारखी बिनहरकत लूट करीत असता मनुष्य वस्ती असलेल्या जमिनीच्या कोणत्याहि भागावर पाऊल ठेवतांच हें हृदय विदारण करणारें सुखोपभोगातील विषमतेचें भेसूर दृश्य दृष्टीस का पडावें? विश्वसुंदर मनुष्य प्राण्यानें वसविलेला भूभाग म्हणजे कल्पवृक्षानीं गजबजलेलें साक्षात नंदनवन असावयास पाहिजे, परंतु प्रत्यक्ष अनुभव पहाता आजचें जग त्रस्त भुकाबेताच्या कर्कश आक्रोशाने दुमदुमून टाकलेले एक भयाण स्मशान बनून गेलेलें आहे असेंच दुर्दैवाने दृष्टीस पडतें कोठेहि सुख समाधान व शांति यांचें नावनिशाणहि दृष्टीस पडत नाही जो तो चिंतामग्न व दुःखातिशयाने निराश झालेला विज्ञानाच्या अभिवृद्धीमुळे मानवी प्रपंचास अवश्य असणाऱ्या साधनसंपत्तींत सारखी भर पडत असता मनुष्याच्या जिवाला क्षणाचीहि विश्रान्ति व शांति लाभू शकत नाहीं हें खरोखरच दुःखदायक आश्चर्य आहे. धर्माची ग्लानि होऊन अधर्म बेसुमार फोफावला म्हणजे समाजावर कोसळणाऱ्या अति भयंकर कहराच पुराणांतून केलेलें वर्णन, मानवी प्रपंचाच्या आजच्या दुर्दशेच्या वर्णनापुढे नि मशय फिकेंच पडेल! या पराकाष्टेच्या शोचनीय अवस्थेतून मुक्त कसें व्हावें हा बिकट प्रश्न मानवापुढे आज कैक वर्षांपासून उभा आहे व त्याचें अचूक उत्तर शोधून काढण्यासाठी तो मारखा धडपड करीत आहे. सुदैवाने तें उत्तर आता त्याला सापडलें असून ' क्रान्ति ' या नावाने तें त्याने जगात प्रगट केले आहे व "इन्किलाब जिंदाबाद" "क्रान्ति चिरायु होवो"

इत्यादि घोषणानी जगाच्या मेंदूंत तें ठासून कोंबण्याचा त्याचा रात्रंदिवस प्रयत्न चालू आहे.

परंतु नुसत्या क्रांति शब्दाच्या उच्चाराने तिच्या पोटात केवढें ब्रम्हांड साठलेलें आहे याची कल्पना सामान्य माणसास होणें शक्य नाही. फार झालें तर आजच्या दुःखमय दुःस्थितीचें तिच्या अगदी उलट असणाऱ्या सुखमय सुस्थितींत रूपांतर होणें अथवा आपल्याभोंवतीं नांदणाऱ्या नरकाचा अकस्मात स्वर्ग बनणें म्हणजे क्रांति एवढें तो फार झालें तर आज समजू शकेल. परंतु हा नरक कोणीं उत्पन्न केला–कसा उत्पन्न केला आणि त्याचा स्वर्ग कोण बनवूं शकेल कसा बनवूं शकेल–कधीं बनवूं शकेल याबद्दल त्याला समाधान-कारक खुलासा करता येईल असें वाटत नाहीं. आपल्या सारखेच दोन पायाचे व दोन हाताचे प्राणी मूल्यवान वस्त्रालंकारानी नटून सजून डौलाने मिरवीत असलेले पहात असता त्याला आपल्या अंगावरील फाटक्या तुटक्या लक्तराची जाणीव नसते असे नाही. ती त्यास जरूर असते व तीमुळे त्याच्या दुबळ्या अंतःकरणास प्राणांतिक वेदनाही होत असतात. परंतु "तुझ्या व त्याच्या स्थितींत ही जमीन अस्मानची तफावत का" असा सवाल त्यास केल्यास त्यांचा जबाब शब्दानी न देता कपाळास हात लावून अगर आकाशाकडे बोट दाखवून तो देतो. त्याच्या मनाची अशी दृढ समजूत झालेली असते कीं दैव म्हणा देव म्हणा–या विश्वात अशी एक बलाढ्य अदृश्य शक्ति आहे कीं जिच्यापुढे कोणाचें कांही चालत नाही व तिनेच मनुष्यामनुष्यात हा दुर्धर स्थिति भेद निर्माण केला आहे. दुर्दैव बिचाऱ्याचें कीं त्याच्या राशीस लागलेलें हें निष्ठुर दैव अगर त्याच्या मानगुटीस बसलेला हा निर्दय देव त्याच्या कधीच दृष्टीस पडत नाही. व त्याला त्या दैवास अगर देवास या त्याच्या अन्याय्य वर्तनाचा जाब विचारतां येत नाही आणि त्यामुळे त्याला जन्मभर त्यांच्या नांवाने खडे फोडीत बसण्याशिवाय कांही मार्ग राहिलेला नाही..

परंतु दैवाच्या अगर देवाच्या नावानें रात्रंदिवस आक्रोश करीत बस-ण्याचें सोडून त्याने क्षणभर डोळे उघडे ठेवून आपल्या भोंवताली बारकाईने पहाणी केली तर त्याला चटकन् कळून येईल कीं या अदृश्य दैवापेक्षा त्याच्या

मानव बधूच त्यांच्या या दुर्दशेस अधिक कारण झालेला आहे सृष्टिदेवतेनें आपल्या भांडाराचें दार सर्वांना खुलें ठेवलें असतां त्याच्या हाडामासाच्या त्यांच्या ह्या बधूनेच त्याचा मार्ग आडवून सृष्टिदेवतेने सर्वांच्या करितां देऊन केलेली सुखसंपत्ति बलात्काराने आपल्या कोठाराकडे वाहून नेण्याचा सारखा सपाटा चालविलेला आहे खुनी मारेकऱ्याला जसा खून चढतो तशी या छुटारूलाहि एक प्रकारचा खून चढला आहे व त्याच्या धुंदीत आपल्या या अमानुष कर्मानें आपण आपल्या असंख्य बांधवांना दारिद्र्यांच्या गर्तेत ढकलून त्याचे खून पाडीत आहोत याचें त्याला भान राहिलेलें नाहीं त्याला वाटत असतें, मी करतों हें योग्य व आवश्यकच आहे कारण तो सृष्टिदेवतेनें संचय करून ठेवलेल्या या अफाट संपत्तीचा स्वतः लाच एकमेव मालक समजत असतो आणि त्यामुळे आपणाशिवाय इतरांनाहि तिचा उपभोग घेण्याचा हक्क आहे असें तो मानीतच नाहीं इतकेंच नव्हे तर इतर कोणी या संपत्तीकडे आशाळभूत नजरेने पाहूं लागला तर त्याचे लोभाविष्ट पापी डोळे फोडून टाकणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे व तें आपण तत्परतेने बजावलेंच पाहिजे असा त्याचा ठाम सिद्धांत बनून गेलेला असतो या अखिल विश्वाचा मध्य मी-या विश्वाचा स्वामी मी, या विश्वाचा भोक्ता मी, असा उन्मत्त अहंकार त्याच्या हाडींमासीं अभेद्यपणें खिळून गेलेला असतो आपणाशिवाय इतर मानव हे आपल्या सेवेसाठी व आपल्या सुखासाठीच निर्माण करण्यांत आलेले आहेत व त्यांनी आपल्या गुलामगिरींतच सदैव राबलें पाहिजे, त्यांना जगावयाचें असल्यास त्यांनी केवळ आपल्यासाठीच जगलें पाहिजे व मरावयाचें असल्यास आपल्या कारणींच मेलें पाहिजे, स्वतंत्रपणें जगण्याचा अगर मरण्याचा त्यांना बिलकूल हक्क नाहीं, आपल्या सुखातच त्यांचें सुख-सर्वस्व सांठलेलं आहे आपल्या सुखानेच त्यांनी सुखी झालें पाहिजे आपल्या समाधानात त्यांना समाधान वाटलें पाहिजे, त्यांना स्वतःचें असें निराळें सुख नाही स्वतःचें असें निराळें दुःखहि नाही अशा प्रकारच्या विचित्र कल्पनांनी त्याचा मेंदू बद्दून गेलेला असतो अशा प्रकारच्या विक्षिप्त भावनांनी त्याचें मन भडवून गेलेलें असतें त्याचा जन्मजात 'मी' पणा इतका संकुचित झालेला असतो कीं स्वतः या भावनेतील हात देहापलीकडे त्याला कांहीं दिसतच नाहीं आणि त्यामुळे इतर मानवांच्या सुखदुःखांशीं समरस होणें त्याला अशक्य होऊन

बसलेलें असतें. ञाम्ह्याप्रमाणे इतरानाहि काही अस्तित्व आहे, काही भावना आहेत, काही सुखदुःख आहे हें मानण्यास तो तयारच होत नाहीं तो म्हणजे जग व जग म्हणजे तो एवढें एकच विपरीत सत्य त्याच्या विकृत बुद्धीला पटलेलें असतें व याच मिथ्या सत्याच्या उपासनेंत तो सर्वकाल गर्क झालेला असतो गीतेंत श्री भगवतानीं अशा देहात्मवादी स्वयनिष्ठ पुरुषाला असुर अशी संज्ञा दिलेली आहे आणि मानवी प्रपंचाच्या आजच्या भयानक दुर्दशेस अशा आसुरी वृत्तीच्या नराधमांचाच स्वयनिष्ठ दुराचार सर्वस्वीं कारण झालेला आहे अशा क्रूर पशूनाहि लाजविणाऱ्या निर्घृण स्वभावाचे अधमाधम मानव—मानवी देह आजच्या उत्क्रान्त अवस्थेस प्राप्त होण्यापूर्वी राक्षसाच्या अक्राळ विक्राळ देहात वावरत होते व त्यामुळे त्याच्या ठिकाणीं वसत असलेल्या या आसुरी संपत्तीची तत्काळ ओळख पटत असे, परंतु मनुष्य प्राणी उत्क्रान्त होता होता अशा स्थितीस संप्रत येऊन पोहोचला कीं त्याच्या ठिकाणचें राक्षसी देह उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नष्टप्राय झालें व तो निर्माण करीत असलेल्या आजच्या कोमल व सुंदर नरदेहात संचार करण्याचें दुर्भाग्य या राक्षसी प्रकृतीच्या प्राण्याना प्राप्त झालें त्यामुळे पूर्वीचे राक्षस ज्याप्रमाणे एखादा उत्क्रान्त कोमल देहधारी मानव दिसताच त्याला चटकन सहज लीलेने उचलून आपल्या तोंडात टाकीत व आपल्या तीक्ष्ण दाढाखालीं रगडून घशाखाली ढकलीत, तसे या उत्क्रान्त मानव शरीरात वावरत असता त्याना आता करिता येईनासें झालें आहे. मनुष्याच्या रक्ताची पिपासा तर कायम आहे, पण त्याच्या नरडीस दात लावून तें प्राशन करण्याचा सहज सुलभ उपाय तर कायमचा हातचा निसटून गेला तेव्हा आपली नररक्तलालसा तृप्त करण्यासाठी आज त्याला नवीनच मार्ग शोधून काढावे लागले आहेत—ते मार्ग नवीन व अत्यंत कुशलतेने तयार केलेले असल्यामुळे प्रत्यक्ष रक्ताला आपल्या जिव्हेचा स्पर्शहि न होऊ देता तो मनुष्याला सहकुटुंब सहपरिवार रक्तशून्य करून टाकतो आजच्या मानवी आणि प्रपंचातील आर्थिक विषमतेचें मूळ कारण हा अधमाधम कोटींतील मानव आणि त्याचा परस्वापहारमय स्वार्थलंपट दुष्ट स्वभाव हेंच होय आणि त्याच्या स्वभावातील हा दोष जोपर्यंत नष्ट होत नाहीं अथवा तो नष्ट होणें प्रयत्नातीं अशक्य ठरल्यास त्या दोषाचें अभेद्य आश्रयस्थान होऊन बसलेला हा पर-

स्वापहारी पापी चांडाळ या जिवंत मानवी जगाच्या चतुःसीमेबाहेर जोपर्यंत हद्दपार केला जात नाही, तोंपर्यंत आजच्या मानवी जगावर ओढवलेली ही दुर्धर आपत्ति कदापि निवारण व्हावयाची नाही !

मानवी समाजाच्या शरीरांत कायमचें विच्छेद करून त्याला स्वाहा करण्यासाठी सारखा धडपडत असलेला हा व्याधि समूळ नष्ट करून मानवी समाज निरोगी व अजरामर करावयाचा असल्यास त्याच्या विनाशाचाच मार्ग शोधून काढण्यावाचून आता गत्यंतर नाही भगवंतांनी भगवद्गीतेमध्ये धर्म संस्थापना हें आपलें अवतार कार्य आहे असें सांगून तें कार्य सिद्धीस नेण्या-साठी आपणास दुष्कृतांचा विनाश करून सुकृतांचें परित्राण करावें लागतें, असें प्रतिपादन केलें आहे. शान्ति सिद्ध करावयाची असेल--तिची मानवी समाजात संस्थापना करावयाची असेल व तिला 'जिंदाबाद' 'चिरायु' करावयाचें असेल तर त्यासाठीहि हा भगवंतांनी सांगितलेला एकच मार्ग अवलंबिणें अवश्य व अपरिहार्य झालें आहे. याहून अन्य तरणोपाय अद्यापि मानवी बुद्धीला उपलब्ध झालेला नाही

दुष्कृताच्या स्वभाव-अगर-प्रकृतिपरिवर्तनानें दुष्कृताचा विनाश न करि-ताहि दुष्कृतींचा समाजातून सर्वतोपरी लोप करतां येतो असें प्रतिपादन करणारा एक ज्ञानी पुरुषांचा वर्ग समाजात पूर्वी होता; आजहि आहे; पुढेहि राहील. तो या दुष्कृताच्या प्रकृतिपरिवर्तनाचा उत्तम उपाय म्हणजे "अहिंसा" अगर "अहिंसात्मक असहकार" हा आहे असें निश्चिततरपणें प्रतिपादित असतो आणि त्याच्या या सिद्धान्तात कांही मर्यादेपर्यंत सत्याचा अंशहि असतो. परंतु समाजाच्या सात्विक मनाच्या सर्वच अवस्थामध्यें तो सारखाच लागू पडतो असा जो त्याचा आग्रह आहे तो मात्र अनुभवाच्या कसोटीवर घासून पाहिल्यास खरा ठरेल असें आम्हास मुळीच वाटत नाही. मानवी समाजातील घटक म्हणजे मानव जन्ममरणाच्या भोवऱ्यात विश्वातील इतर वस्तुप्रमाणेच कायमचे सापडले असल्यामुळे त्याच्या बेरीजवजाबाकीने मानवी समाज व त्याच्या अंतिम मर्यादा त्या नित्य बदलत असतात आणि या नित्य चालू असलेल्या अवस्थांतरात मानवी समाजास एक अशी विशिष्ट अवस्था प्राप्त होत

असते की ज्या अवस्थेंत उपरिनिर्दिष्ट उपाय एका मर्यादेपासून दुसऱ्या मर्यादेपर्यंत सर्वतोपरी गुणकारी ठरतो परंतु ही विशिष्ट अवस्था वारवार येणारी व नेहमी टिकणारी नसते आणि यामुळे उत्क्रान्तीच्या मार्गावरील या टप्यावर मनुष्य समाज येऊन पोहोचेपर्यंत त्याला तदितर अनेक अवस्थातून प्रवास करावा लागतो व त्या अवस्थात हा उपाय कमी अधिक मानाने कमजोर ठरून मानव समाजास गाठून मारण्यास टपलेल्या महाभयंकर रोगजन्तूच्या प्रतिकारार्थ मानवाला अन्य कठोर उपायाचाहि अवलंब करावा लागतो आणि दुर्दैवाने म्हणा *वा सुदैवाने म्हणा, निसर्गाने या अवस्थाचा एकंदर काल फारच लांबलचक ठेव*लेला असल्यामुळे क्रान्तीचा विचार करताना हा विपरीत काल लक्षात घेऊनच उपाय योजना करणें भाग पडतें अर्थात या उपाययोजनेंत हा अहिंसेने प्रकृतिपरिवर्तन करण्याचा उपाय नेहेमी वर्ज्यच मानला जातो असें मुळीच नाही त्याला त्या योजनेंत स्थान असतें किंबहुना पहिलें व कायमचें स्थान असतें. परंतु त्याचें रोग निवारणाच सामर्थ्य कमी पडतें असें आढळून येताच त्याच्या सहाय्याय " **दमन मार्गाचा** " अंगिकार करावा लागतो. दुष्कृतांच्या परस्वापहाराच्या दुर्वासनेस उतार पडत नसेल तर त्याचें परस्वापहाराचें सामर्थ्य तरी नाहीसें करावें अशा उद्देशाने हा **दमन मार्ग** उपयोगात आणला जातो. परस्वापहारास चटावलेले दुरात्मे ज्या साधनसामुग्रीच्या सहाय्याने आपला समाजविध्वसनाचा उद्योग सफल करितात तीं सर्व साधनें त्यांच्यापासून हरण करून त्यांच्या पीडेपासून समाजाचें रक्षण करण्याचे जे अनेक प्रयोग समाजवाद्यानी आज सुरू केले आहेत त्या सर्वांचा समावेश या **दमन मार्गातच** होतो सर्पाचा विषदंत उपटून टाकून अथवा वाघ चीं दातनखें उखडून काढून त्याला निरुपद्रवी करण्यासारखाच हा एक प्रकार आहे. परंतु त्यामुळे परस्वापहारी दुष्कृताच्या दुर्वासनेचा सर्वस्वी लोप होतो असें मात्र मुळीच नाही इतकेंच नव्हें तर कधी कधी ही दुर्वासना कमजोर होण्याऐवजी अधिक बलवान होते व परस्वापहाराचे नवेनवे मार्ग शोधून काढून मानवी समाजाची अधिकाधिक हानि करू लागते. अशा प्रसंगीं आसुरी वृत्तीच्या मनुष्याच्या मग्रहीच्या साधनाचेंच हरण करून भागत नाही तर त्या साधनांच्या बरोबरच त्याच्या प्रत्यक्ष प्राणाचेंहि हरण करणें पुष्कळदां अवश्य होतें समा-

जाच्या आचार विचारात अशी परिस्थिति निर्माण होणें म्हणजेच जुन्या लोकानी वर्णन केलेली धर्मग्लानि व अधर्माचें अभ्युत्थान होय. अशा अध र्माच्या उन्माद कालात साधेल त्या उपायानी दुष्टाचा संहार' हा एकच उद्योग समाजहितचिंतकाना करावा लागतो, कारण हें दुष्टसंहाराचें कार्य केल्यावाचून सुकृतांचें-सदाचारी वा निरुपद्रवी मनुष्याच रक्षण होऊंच शकत नाही आणि सदाचारसंपन्न मानवाच्या आश्रयावाचून समाजात परस्वापहारशून्य सदाचाराची-अर्थात जुन्या भाषेत धर्माची संस्थापना होणें अशक्य असतें

साराश, क्रान्ति सफल करावयाची असल्यास प्रथम 'परिवर्तन'-तें अपुरें पडूं लागल्यास त्याच्या जोडीस 'दमन' आणि शेवटीं हीं दोन्हीहि कमताकत ठरल्यास त्या दोहोच्या जोडीस 'संहरण' या तीन टप्प्यानीच क्रान्तीचा अखेरचा मुक्काम गाठावा लागतो परंतु त्याला काही इलाज नाही सृष्टीची आहे तीच रचना व आहेत तेच कायदे कायम आहेत तोपर्यंत परस्वापहाराच्या दुर्वासनेने विषमय बनलेल्या वृत्तींचें व प्रवृत्तींचें शुद्धिकरण करण्याच्या कामीं इतर सर्व सौम्य व कठोर साधनें हीनबल ठरल्यानतर त्याना जन्म देणारें त्याचें उगमस्थानच नष्ट करणें हा एकच उपाय शिल्लक रहातो व तोच अमलात आणावा लागतो नाहीतर मनुष्यहत्येचा दोष पदरीं पडू नये म्हणून त्याचा अव्हेर केल्यास दुष्टाम बाचविण्याकरिता निरुपद्रवी व सद्वृत्त-सुष्टता या सर्व रचनाशाचें पाप शिरावर घेण्यास सिद्ध व्हावें लागतें. तेव्हा अशा परिस्थितीत दुष्टांच्या हातून सुष्टाना अगर दुष्टांच्या अत्याचारापासून सुष्टाचें रक्षण कर णाऱ्याच्या हातून दुष्टांना, कोणाला तरी मरणें अपरिहार्य असल्यामुळे दुष्टाच्या प्राणापेक्षां त्याच्या अमानुष अत्याचाराना प्रत्यहि बळी पडत असलेल्या अनेक सुवृत्तसुकृताचे म्हणजे चागल्या वृत्तींच्या सदाचारी मानवाचे प्राण अधिक मोलाचे मानन दुष्टाच हनन करणें हा धर्म मानावा लागतो व तो नि सकोच पणें आचरावा लागतो वरवर पहाणाराना हा मनुष्यसहारच होय असे !-सत असलें तरी दुर्जना या हस्तें होणारा सज्जनसहार व सज्जनाकडून या त्याच्या रक्षणकर्त्यांकडून होणारा दुर्जन सहार हे दोन्ही एक नसून त्या दोहोंच्या नैतिक मूल्यांतहि जमीनअस्मानाचें अतर आहे ही गोष्ट कोणाहि शार्ना पुरुषाला नाकबूल करतां यावयाची नाही इतकेंच नव्हे तर दुष्टांनी सज्जनाचा पूर्णत

सहार केल्यावरहि त्याचें मनुष्यहत्येचें अघोर कर्म थांबत नाही—ते आपाप सातच एकमेकाचे मुडदे पाडू लागतात तसें सज्जनांकडून होत नाही. दुष्ट सहार पूर्ण होताच हत्याकांड समाप्त होतें असो.

आतापर्यंत क्रांति, तिचें प्रयोजन, तिचें पर्यवसान, तिची संस्थापना करण्यासाठी अवलंबावयाच्या मार्गाचें स्वरूप इत्यादि मुद्यांचें आम्ही सक्षेपतः विवेचन केलें त्यावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं मानवी प्रपंचाची दुर्दशा होण्यास दैव अथवा देव कारणीभूत झालेला नसून मानवजातींत उत्पन्न झालेला आसुरी प्रकृतीचा परस्वापहारी स्वार्थलंपट मानवच सर्वतोपरी कारण झालेला आहे आणि या दुर्दशेपासून मानवी प्रपंचास कायमचें मुक्त करावयाचें असेल तर ती जबाबदारी दैवाच्या अगर देवाच्या कपाळीं न मारता तिचा भार मानव जातींत जन्मास आलेल्या मानवानेच आपल्या शिरावर घेतला पाहिजे आजपर्यंत मानवाने पृथ्वीच्या पाठीवर केलेली घाण मानवालाच काढावी लागली आहे व त्याने ती काढलेलीहि आहे. आणि वर्तमानकाळीं व भविष्यकाळींहि त्यालाच हें पवित्रीकरणाचें महत्कार्य करावं लागेल व तोच तें करील. भूतकाळीं ज्या ठिकाणीं व ज्या वेळीं असे त्यानं केलें नाही अगर त्यास करता आलें नाही त्या ठिकाणीं व त्या वेळीं मानव जातीचा तेवढा भाग पृथ्वीच्या पाठीवरून कायमचा लुप्त झालेला आहे एकमेकाच्याजवळ येण्याच्या साधनांची पूर्वयुगात फारच कमतरता असल्यामुळे मानवी समाज अनंत लहानमोठ्या भागात विभागला गेलेला होता व त्यामुळे मानवाच्या उत्कर्षापकर्षाचें—उत्क्रांति अपक्रांतीचें—विकास सकोचाचें हें दृश्य विभागशः अत्यंत मर्यादित स्वरूपांत दृष्टीस पडत असे व या कारणानें त्याला एका प्रकारची विविधता आलेली होती तथापि क्रान्तीच्या या विविध दृश्याचा समन्वय केल्यास असें आढळून येईल कीं त्या सर्वांत मानवी स्वभावातील व आचारातील वैषम्याचे व साम्याचे नियम सर्वत्र एकच होते. मानवाचा 'मी' पणा अत्यंत सकुचित होऊन तो अमर्याद स्वयनिष्ठ बनला कीं त्याचा स्वार्थ बेसुमार होऊन त्याचें परस्वापहारांत रूपांतर होतें व अशा परस्वापहारलोलुप घटकाचें सामर्थ्य वाढून त्यांची समाजात बहुसंख्या होऊ लागली म्हणजे त्याच्या आसुरी अत्याचारांनी समाजचीं शकलें होऊन समाजाचा

सहस्रावधि मुखानी विनिपात होतो. सुदैवाने त्या मरणोन्मुख अवस्थेंत त्यास तारणारा कोणी समर्थ पुरुष निर्माण झाला तर ठीक, नाही तर त्या दुर्दैवी व्याधिजर्जर समाजाचें अखेरीस बलहीनतेमुळे प्राणोत्क्रमण होतें किंवा बलिष्ठ परक्याच्या हस्ताने त्याचा संहार होतो. असाच निरपवाद नियम सर्वत्र आढळतो. जगाचा इतिहास पाहिल्यास अनेक संस्कृति, अनेक समाज, अनेक राष्ट्रें, अनेक वंश जन्मास आले, वाढले व अशाच प्रकारें शेवटीं मृत्युमुखीं पडून नामशेष झाले. यावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं गीतेंत सांगितल्याप्रमाणे मानव समाज हा "आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः" आहे. हें म्हणणेंच शेवटीं खरें ठरतें. असो. मनुष्याच्या ठिकाणीं व्यक्तिगत व विश्वगत अशा दोन्ही प्रकारचा अहंभाव निसर्गतःच वास करीत असतो आणि व्यक्तित्वापासून उत्क्रान्त होत होत तो अखेरीस विश्वत्वास जाऊन पोहोचतो. त्यामुळे मानवजातींत अशा दोन्ही प्रकारचे पुरुष कालानुसार कमी अधिक प्रमाणात आढळतात ज्या प्रमाणे अत्यंत संकुचित 'मी' पणा असणारा स्वार्थासक्त परस्वापहारी आसुरी मानव समाजाच्या अपकर्षाचें कारण होतो, त्याचप्रमाणे 'मी' पणाचा विकास झाल्यामुळे ज्याच्या ठिकाणीं सात्विक भावनेचा उद्भव व उत्कर्ष होत असतो व त्यामुळे जो समाजाच्या सुखदुःखाशीं व हिताहिताशीं समरस होऊं लागतो असा निस्वार्थी परोपकारी दैवी संपदेनें अलंकृत झालेला मानव मानवी समाजास उत्कर्षाच्या शिखरास नेऊन पोहोचवितो. आसुरी प्रकृतीचा पुरुष समाजास आपलें भक्ष्य समजून त्याचें भक्षण करीत असतो व दैवी प्रकृतीचा पुरुष समाजास आपलें रक्ष्य समजून आपल्या स्वतः-च्या सर्वस्वावर तिलांजली देऊन त्याचें रक्षण करण्यात सदैव मग्न झालेला असतो. पहिला समाजाच्या देहांत वावरत असताहि त्याच्या जीवनकलेचा सारखा नाश करतो तर दुसरा त्याचें पोषक द्रव्य बनून त्याच्या जीवनबलाची सारखी वृद्धि करतो पहिला समाजाची अपक्रांति करणारा असतो तर दुसरा समाजात आमूलाग्र क्रान्ति घडवून आणीत असतो पहिला स्वतःस समाजाचा देव समजत असतो व त्यास आपल्या सेवेंत राबवीत असतो तर दुसरा समाजास आपला देव मानून त्याच्या सेवेंत राबत असतो असो.

क्रान्तीच्या भक्ताला पहिल्याने कोणती गोष्ट करणे अत्यावश्यक असेल तर ती ही कीं समाजघटकाच्या वर्गीकरणाच्या सर्व प्रचलित व रूढ कसोट्या

झुगारून देऊन प्रकृतिभेदाच्या म्हणजे सत्वाच्या—गुणाच्या—शीलाच्या कसोटीवर घासून मानवी समाजाचे दैवी व आसुरी असे दोन स्पष्ट विभाग त्याने प्रथम केले पाहिजेत. आज समाजवाद्यांनी पूर्वीच्या सर्व कसोट्या झुगारून देऊन श्रमाची कसोटी उपयोगात आणली आहे व तिच्या अनुरोधाने श्रमजीवी व भांडवलदार—मजुर व कारखानदार—शेतकरी व जमीनदार अशा प्रकारें समाजाचें वर्गीकरण करण्याचा उद्योग सुरू केलेलाच आहे. हें जें वर्गीकरण करण्यात आलें आहे त्यात, समाजाच्या शरीरात घटक रूपाने नादणाऱ्या द्रव्याची म्हणजे मनुष्याची छाननी करून त्यापैकी समाजाच्या शरीरास अर्थात् जीवनकलेस पोषक होणारीं द्रव्यें कोणतीं व नाशक होणारीं द्रव्यें कोणतीं हें निश्चित करणें व त्या निर्णयानुसार पोषक द्रव्याची अभिवृद्धि व नाशक द्रव्याचें उच्चाटन करणें हाच एकमेव उद्देश आहे अशी आमची समजूत आहे. आणि समाजाच्या प्रथमदर्शनीं गोचर होणाऱ्या स्वरूपाच्या म्हणजे आर्थिक परिस्थितीचा विचार करता ही कसोटी प्रत्यक्ष अनुभावाने पुष्कळ अशीं बरोबर ठरलेली आहे हेंहि प्राजलपणें कबूल करणें भाग आहे. परंतु मनुष्याच्या मानसिक व्यापारात व शारीरिक व्यापारात बाह्य परिस्थिती मुळे पुष्कळदा विसंगति उत्पन्न होत असली तरी मूलत मनुष्याचे शारीरिक व्यापार हे त्याच्या अव्यक्त मानसिक व्यापाराचेच बाह्य परिस्थितीच्या मिश्रणानें तयार झालेलें व्यक्त स्वरूप आहे ही गोष्ट क्वचितहि अमान्य करता यावयाची नाही. तेव्हा मनुष्याचा शारीरिक व्यापाराबरोबर त्यांच्या मानसिक व्यापाराचीहि पूर्ण परीक्षा केल्यावाचून मनुष्याचें वर्गीकरण केल्यास तें क्वचित्हि अपुरें व अतिव्याप्ति—अव्याप्ति या दोघांनीयुक्त असेंच होणार हे अगदी उघड आहे. आजचे पूर्वीचे सर्वच भांडवलदार—कारखानदार—अगर जमीनदार जन्मजात भांडवलवाले, कारखानेवाले अगर जमीनवाले होते असें मुळीच नाही. कोणी स्वत —कोणाचे बाप, कोणाचे आजेपणजे, प्रारंभीं श्रमजीवीच म्हणजे भांडवल नसलेले कारखाना नसलेले अगर जमीन नसलेले, मजुर दारच होते. कदाचित् प्रामाणिक मजुरदारहि असतील. परंतु त्यांचा पुढचा इतिहास सशोधून पाहिल्यास बहुधा सर्वांच्या बाबतींत असेंच आढळून येईल कीं श्रमाच्या द्वारें लक्ष्मीच्या कृपेचे कण त्याच्या पदरात पडू लागताच त्याची बुद्धि चढून त्याची स्वार्थाची भावना वाढत वाढत परस्परद्वारा

( Exploitation ) च्या दुर्वासनेंत तिचें शेवटीं पर्यवसान झालें आणि त्यांनी आपल्या संग्रहीं असलेल्या बुद्धि—पराक्रम—इत्यादि सर्व साधनांचा समाजाच्या इतर घटकांची लूट करण्याकडे मनमुराद उपयोग करून आजचें उच्चपद प्राप्त करून घेतलें. जें पूर्वीच्या लोकांनी केलें तें कमीअधिक प्रमाणांत आजचेहि लोक करीत आहेत आणि क्रान्तीच्या विचाराचा प्रभाव समाजाच्या मनावर उत्तरोत्तर अधिकाधिक पडत न गेल्यास ह्याच प्रकारें पुढेहि असाच दीर्घकाल चालू राहील. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे केवळ श्रमाच्या निकषानें समाजांतील घटकांचें वर्गीकरण करण्यानें श्रमजीवि वर्गांत ज्या घटकांचा समावेश करावयास नको त्यांचा न कळत समावेश केला जातो व त्यांच्या सगळीनें सर्व्वी श्रमजीवि घटकांच्या वाढीस अडथळा उत्पन्न होतो. हा अडथळा टाळावयाचा असल्यास श्रमास शीलाची जोड देऊन त्याच्या संयुक्त निकषाच्या सहाय्यानेंच समाजाचें वर्गीकरण करणें क्रान्तीच्या शीघ्र विकासाच्या दृष्टीनें अधिक उपयुक्त ठरेल असें आम्हास वाटतें. आर्यांनीं प्राचीन काळीं याच निकषाच्या मदतीनें समाजाचें वर्गीकरण करून समाजरचनेचा एक उत्कृष्ट नमुना तयार केला होता व दीर्घकाल टिकवून दाखविला होता " शील श्रम " या नव्या कसोटीलाच पूर्वीचे लोक " गुणकर्म " असे म्हणत आणि या कसोटीला झुगारून तिच्या जागीं ' जन्मा ' च्या कसोटीची स्थापना करण्यांत येईपर्यंत आर्यांचा संघ अगर समाज सामर्थ्यसंपन्न व नित्य विकासवान असाच राहिला होता. ' जन्मा ' स प्रधानपद प्राप्त होऊन गुणकर्म अर्थात् शीलश्रम गौण मानले जाऊ लागल्यापासून आर्यांचा सारखा अधःपातच होत गेला. या अधःपताच चित्र आज हिंदुस्थानांत प्रत्यक्षच पहावयास मिळत आहे जन्मानें ब्राम्हण म्हणून स्वतःस गौरविणारा अगर क्षत्रिय म्हणून आपली प्रतिष्ठा मिरविणारा अथवा वैश्य म्हणून समाजास आपल्या हातांत खेळवू पहाणारा खरोखरच एवढ्या श्रेष्ठ पदवीस पात्र आहे काय? गुणकर्माच्या कसोटीचें अधिष्ठान जी सामाजिक निष्ठा तिचा लवलेश तरी त्यांच्या आचारविचारांत दिसून येत आहे काय? सारेच आपापल्यापरीनें समाजाचें भक्षण करण्यासाठीं टपून बसलेले! चातुर्वर्ण्य व्यवस्थेचे आम्ही सारेच मुक्तकंठानें गोडवे गातों परंतु चातुर्वर्ण्य व्यवस्था अयत श्रेष्ठ अशा समाजनिष्ठेच्या पायावर उभारली गेली होती याची कोणास तरी शुद्ध आहे काय! ब्राम्हण,

क्षत्रिय व वैश्य यांची तर गोष्टच मोठा, परंतु या तीन वर्णांची सेवा करण्याचें कार्य त्यांच्या वान्यास आलें होतें ते शूद्र सुद्धा प्राचीन काळीं चातुर्वर्ण व्यवस्थेत पूर्ण समाजनिष्ठ होते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. उत्तम समाजरचना कोणत्याहि प्रकारची असो परंतु त्या रचनेचा पाया " अढळ समाजनिष्ठा " हा एकच असू शकतो—व्यक्तिगत स्वयंनिष्ठा हा असू शकत नाही हें अनेक शतकाच्या अनुभवाने आज निर्विवाद सिद्ध झालें आहे. स्वयंनिष्ठ व स्वार्थासक्त घटकांचे बनलेले समाज आज सर्वत्र दृष्टीस पडत आहेत. परंतु त्यांच्या ठिकाणीं मनुष्याला देव बनविण्याचें सामर्थ्य नाही त्या समाजरचनेंत स्वार्थलंपटपणा व परस्वापहार यांचीच सारखी वाढ होत असून मनुष्य पशूहूनहि पशू बनत चालला आहे असेंच अनुभवास येत आहे. तेव्हां मानवाच्या ठिकाणीं मानवतेचा पूर्ण विकास घडवून आणावयाचा असेल व त्यासाठीं सर्व प्रकारें उपयुक्त होईल अशी समाजाची नवी रचना निर्माण करावयाची असेल तर समाजाच्या हितासाठीं तळमळणाऱ्या समाजवाद्यांना समाजघटकाऱ्या प्रवृत्तींतील व्यक्तिगत स्वयंनिष्ठा नष्ट करून तिच्या ठिकाणीं समाजनिष्ठेचें आरोपण करणें अवश्य आहे मनुष्याचें मानसिक कर्म जोंपर्यंत बदलत नाहीं तोंपर्यंत त्याच्या शारीरिक कर्मांत बदल होऊन मानवी प्रपंचात क्रान्ति घडून येईल अशी आशा करणें व्यर्थ आहे तथापि हा बदल घडवून आणण्याचें सामर्थ्य एकट्या श्रमात नसून त्याला शीलाची जोड देणें जरूर आहे श्रमाचें माहात्म्य वर्णन करून श्रमाविषयीं भक्ति समाजात उत्पन्न करीत असतां शीलाचें—सत्वगुणाचें—समाजनिष्ठेचें सर्वश्रेष्ठत्वहि समाजाच्या मनात बिंबविलें पाहिजे हें करीत असतां क्रान्ति म्हणजे किसान-मजुरांचीं राज्यक्रांति म्हणजे दरिद्रीनारायणाचा उत्कर्ष इत्यादि अतिव्यापक व्याख्यांना शीलाची मर्यादा घालावी लागेल आणि क्रान्ति म्हणजे समाजनिष्ठ शीलवान् परस्वापहाराच्या दुर्वासनेचा त्याग केलेल्या—किसानमजुरांचें राज्य अशी थोडी लांबलचक व्याख्या करावी लागेल हें खरें. परंतु क्रान्तीच्या मार्गावर समाज वेगानें पुढें सरसावू लागला म्हणजे आज नाही उद्यां हें तत्व अमलात आणल्यावाचून क्रान्तिकारकांना क्रान्तीचा पूर्ण विकास करतांच यावयाचा

नाही. कारण क्रान्तीच्या पूर्णावस्थेत मानव समाज स्वाग्रहाराच्या व्याधी-पासून पूर्णपणें मुक्त झालेलाच आटळून येईल परस्वापहाराचा यत्किंचित् दोष समाजाच्या शरीरात जोंवर शिल्लक राहील तोंवर क्रान्ति पूर्णावस्थेस पोंहोचली असें म्हणताच यावयाचें नाही. परस्वापहाराच्या दुर्वासनेचा—निदान तिच्या वाढीला पोषक होणाऱ्या परिस्थितीचा पूर्ण लोप हेंच क्रान्तीच्या पूर्णावस्थेचें स्पष्ट लक्षण आहे. किंबहुना हें कार्य घडवून आणण्यासाठीच क्रान्तीचा व क्रान्तिकारकाचा अवतार झालेला आहे. समाजघटकाची बहु-संख्या म्हणजे बहुजनसमाज—जोंपर्यंत परस्वापहाराच्या पापकर्मापासून शरीराने व मनाने पूर्णत परावृत्त होत नाही तोंपर्यंत क्रान्तिकारकाचें कार्य सफल झालें अगर समाप्त झालें असें कदापि म्हणता यावयाचें नाही. हें कार्य नजीकच्या भविष्य कालात पूर्ण होईल असे मानणें चुकीचें ठरेल. परंतु भविष्यकाल नजीकचा असो वा दूरचा असो, क्रान्ति पूर्ण होईपर्यंत आपला उद्योग बंद पडू द्यावयाचा नाही असा क्रान्तिकारकाचा दृढ निश्चय असला पाहिजे मानव समाजाचा घटक जो मनुष्य प्राणी तो जन्ममरणाधीन असल्या-मुळे समाजांतून काही घटक रोज मृत्युमुखीं पडून बना होत असतात व त्याची रिकामी पडलेली जागा जन्मास येणाऱ्या नव्या घटकांना रोज भरून काढण्यात येत असते. अर्थात् समाजांतून बाहेर पडणाऱ्या व समाजात प्रवेश करणाऱ्या घटकाची संख्या नेहमी सारखीच असते असें नाही—बहुधा ती कमी जास्तच होत असते आणि त्याच प्रमाणें त्याच्या गुणातहि नेहमी सारखेपणा नसतो—बहुधा फरकच पडत असतो तथापि ह्या संख्येंत व गुणात पडणारा फरक कधी उत्क्रान्तिपर असतो तर कधी अपक्रान्तीपर असतो व त्यामुळे निसर्गनियमानुसार क्रान्तीची गति कधी शीघ्र तर कधी मंद होते आणि क्रान्तीच्या समाप्तीचा काल नजीक अगर दूर होतो तथापि क्रान्तीच्या विचाराचा प्रवाह अव्याहतपणें वाहता ठेवल्यास या काळाच्या लांबीत घटाउतार होऊ शकतो असा आजवरचा अनुभव आहे आणि म्हणून क्रान्तीच्या उपासकांनी निराशा न होता आपला ज्ञानप्रसाराचा उद्योग नेटाने सारखा चालू ठेवला पाहिजे असा आमचा आग्रह आहे क्रान्तीच्या भावनेने समाज जसजसा

उत्क्रान्त होत जाईल तसतशा तकलीं समाजात नांदत असलेल्या अपक्रान्तीच्या शक्ति सतप्त होऊन क्रान्तीस कसून अडथळा करतील हें अगदी उघड आहे तथापि क्रान्तिकारकानी अशा अडथळ्याची पर्वा करण्याचें मुळीच कारण नाही अपक्रान्तीच्या सतप्त शक्तींनी केवढेंहि अकांडतांडव केलें तरी परिणामीं क्रान्तीचें सामर्थ्यच सरस ठरणार हें निश्चित आहे असो

क्रान्तीच्या स्वरूपाचें केवळ दिग्दर्शन करण्याच्या उद्देशाने आम्हीं *लिहिण्यास प्रारभ केला,–परतु लिहिता लिहिता हें दिग्दर्शन मर्यादेबाहेर गेलें* असें आम्हाला वाटतें तेव्हा आता ' झालें इतकें क्रान्तिवर्णन पुरें ' असें म्हणून लेखनीच्या सचारास येथेच आवरण घालण्याचें आम्ही ठरवितो. आम्ही वर केलेलें क्रांतीच्या उद्भवाचें-वृद्धीचें व पूर्णावस्थेचें वर्णन इतर क्रान्तिकारकानी केलेल्या वर्णनाहून भिन्न आहे हें आम्ही जाणतों आणि तं अगदी स्वाभाविकहि आहे क्रान्तीकडे पहाण्याचा आमचा दृष्टिकोणच इतरांच्या दृष्टिकोणाहून निराळा आहे, त्याला करणार काय ? आमच्या विचारसरणीप्रमाणे क्रांतीच्या पूर्णावस्थेपर्यंत जाऊन पोहोचल्यास तेथे किसानमजुरांचें राज्य दृग्गोचर न पडता परस्वापहाराच्या दोषापासून पूर्णपणे मुक्त झालेल्या परोपकाराच्या एकैकभावनेने प्रेरित झालेल्या सदाचारसपन्न समाजनिष्ठ मानवाचें राज्य दृष्टीस पडेल अर्थात त्यात किसानाना अगर मजुराना मज्जाव असेल असें मुळीच नाही ते आणि तदितर अनेक पेशाचे लोक तेथे अवश्य असतील परतु त्यांच्या ठिकाणीं निस्सीम समाजनिष्ठा व सत्वगुणविकास असेल तरच त्यांना तेथे स्थान मिळेल नुसत्या किसानाच्या अगर मजुराच्या नावावर व धन्यावर त्याचा तेथे शिरकाव होऊ शकणार नाही इतकेंच नव्हे तर उलटपक्षीं समाजनिष्ठा व लोकहिततत्परता या गुणानी मडित झालेले असल्यास भाडवलदार–जमीनदार अगर कारखानदार या नावाने आज निंद्य मानले गेलेले लोकहि सदाचारसपन्न किसान मजुराच्या पक्तित तितक्या मानाने अधिष्ठित झालेले आढळतील अर्थात् याची सख्या फारच कमी असेल हें खरें, परतु त्यानी आपली समाजनिष्ठा निर्विवादपणे शाबीत करून दिल्यावर केवळ भाडवलदार अगर कारखानदार अगर जमीनदार एवढ्या नावासाठी पेशासाठी त्यास द्वार बद केलें जाणार नाही.

कारण आमच्या क्रान्तीच्या कल्पनेंत जन्मापेक्षा व त्याचप्रमाणे धद्यापेक्षा त्याच्या ठिकाणीं वसत असलेल्या शुद्ध व सात्विक समाजनिष्ठेलाच सर्वांत जास्त महत्त्व आम्ही दिलेलें आहे व या एकाच कसोटीने समाजघटक व समाजकटक असे दोन विभाग मानलेले आहेत. तेव्हा मूळ दृष्टिकोणातच अशी तफावत असल्यामुळे त्या कोणातून दिसणाऱ्या क्रान्तीच्या स्वरूपात व त्याच्या केलेल्या वर्णनात अतर दिसून आल्यास त्यात नवल काय! आणि म्हणूनच आमच्या प्रतिपादनात आम्ही आज प्रचलित असलेली परिभाषा जाणूनबुजून टाळली आहे.

त्याचप्रमाणे प्रकृतीच्या व कार्यव्यापृततेच्या अडचणींत आम्हास हें प्रतिपादन करावें लागलें असल्यामुळे त्यात अनेक दोष राहून गेले आहेत व त्यामुळे ग्रथाच्या सौंदर्यास पुष्कळच हानि पोहोचण्याचा संभव आहे याचीहि आम्हास पूर्ण जाणीव आहे इतकेच नव्हे तर आजच्या क्रान्तिलेखकाप्रमाणे खुद्द ग्रथकारालाहि आमचें प्रतिपादन अमान्य व अप्रिय वाटण्याचा व त्यामुळे आमच्याकडून प्रस्तावना लिहून घेण्यात आपण मूर्खपणा केला असा त्यास पस्तावा होण्याचा संभव आहे, असेंहि आमचें मन आम्हास बजावीत आहे. तथापि क्रान्तीसबधाचे आपले विचार—मग ते भले असोत—बुरे असोत—बरोबर असोत चूक असोत—या सर्वांचा फायदा घेऊन एकवार जगापुढे माडावेत असा आमच्या मनाला पडलेला मोह आम्हीं आवरू शकलें नाही आणि या प्रतिपादनाच्या सहाय्याने वाचकास मूळग्रथ समजण्यास सहाय्य होईल किंवा नाही याचाहि विसर पडून आम्ही आपल्या लेखणीस बिनहरकत स्वर सचार करू दिला आहे. वास्तविक पहता वाचकाला मूळग्रथाशीं मतलब आहे प्रस्तावनेशीं नाही आणि त्यामुळे त्याने प्रस्तावनेकडे अजिबात दुर्लक्ष केलें तरी त्याचें त्यात काही नुकसान नाही. तथापि चुकून प्रस्तावनेवरून नजर फिरविण्याचा प्रमाद त्याच्या हातून घडलाच तर आपल्या चुकीबद्दल आम्हाला दोष देण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे तेव्हा आम्हीं केलेल्या या अप्रासगिक व अनाठायी लाडक्याबद्दल त्याची क्षमा मागण्याचें ढोंग करण्याचें आम्हाला काहीच कारण नाही.

तथापि श्री. हरिहरराव देशपांडे व आमचे पावलीकर स्नेही याना आमच्याकडून अशी वेडीवाकडी प्रस्तावना लिहून घेण्यात जे कष्ट पडले व त्यामुळे त्यांची व ग्रंथाची जी कुचंबणा झाली तिच्याबद्दल त्यांची क्षमा मागणें आमचें कर्तव्य आहे. हुटका चाश देऊन आम्हीं त्यांच्या पदरात जर कांही मूल्यवान वस्तु टाकली असती तर त्याना समाधानाला काही तरी जागा होती. परतु दुर्दैव त्यांचें कीं त्यांची दोहोबाजूनी फसवणूक झाली. पण आता त्याला इलाज काय ? " पदरीं पडलें आणि पवित्र झालें " असें म्हणूनच त्याना आपलें समाधान करून घेणें भाग आहे !

अमरावती-वऱ्हाड,
रविवार ता ७ सप्टेंबर,
१९४७

वामन गोपाळ जोशी

# लेखकाचे दोन शब्द



सन १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळीं अमरावती जिल्हा युद्धमंडळाचा मंत्रि या नात्याने मी अमरावती जिल्ह्यांत सुमारें तीन महिने खेडोपाडीं दौरा केला. गांधीइर्विन करारनाम्यानुसार तुरुंगांतून सुटका झाल्यावर विदर्भ प्रांतिक कांग्रेस कमिटीचे माझे सन्माननीय मित्र श्री. ब्रिजलालजी बियाणी व मी असे दोघ मंत्री निवडले गेले. प्रां. कां. क.च्या वतीने प्रांतांतील कायदेभंगाच्या चळवळीच्या ज्या हकीकती त्यावेळीं आम्हीं संकलित केल्या त्यांत यावलीने व यावलीचे हुतात्मे के. लक्ष्मणराव पांचघरे यांच्या बलिदानान माझें चित्त वेधून घेतलें. तेव्हापासून यावलींच्या कर्तृत्वाविषयीं मला विशेष आत्मीयता वाटू लागली.

पुढे १९४२ च्या आगस्ट क्रांतींत यावलीने गाजविलेल्या पराक्रमाच्या कथा प्रारंभीं कर्णोपकर्णीं ऐकावयास मिळाल्या. परंतु न्यायालयांतून यावलीच्या कर्तृत्वावर जो प्रकाश पडूं लागला त्यामुळे यावलीविषयीं माझी उत्कटता अधिक वाढत गेली. १९४५ च्या आगस्ट १८ ला यावलीच्या शहीदांच्या स्मृतिसन्मानार्थ विदर्भ प्रां. कां. क. ने जो समारंभ यावलीस घडवून आणला त्याला नागपूर येथील सुप्रसिद्ध श्री. पु. य. देशपांडे यांच्या 'भवितव्य' साप्ताहिकाचा प्रतिनिधि या नात्याने मी मुद्दाम उपस्थित राहिलों. त्या दिवशीं अवघा ३–४ तासच मी यावलीला असेन. परंतु तेवढ्या वेळात आगस्ट क्रांतींतील यावलीच्या कर्तृत्वाने माझ्या अंतःकरणावर अतिशय गंभीर परिणाम केला.

तेथून परत आल्यानंतर यावलीने माझ्या चित्तावर उठविलेले तरंग मीं 'भवितव्या'त सुमारें दहा स्तम्भाचा मजकूर लिहून व्यक्त केले. सांप्रतचे ग्रामोद्योग मंत्रि ना. दादासाहेब बार्लिंगे यांचे तीर्थरूप श्री. शिवदासपंत उर्फ अप्पासाहेब यांनी यावलीची 'भवितव्यां' तली ही वीरगाथा जेव्हा वाचली, तेव्हा यावलीच्या शहीदांच्या स्मारकासाठी स्वयं-

स्फूर्तीने मजजवळ २५ रु. ची देणगी तात्काळ दिली आणि मीं ती वीर वामनराव जोशी यांच्या मार्फत श्री पु.का. देशमुख यांच्याकडे पोहचती केली.

त्यानंतर १९४६ च्या एप्रिल महिन्यांत यावलीच्या आगस्ट क्रांतीचे प्रेरक वीर पंजाबराव बापुराव यावलीकर यांची कांग्रेस मंत्रिमंडळ सत्तारूढ झाल्यावर सुटका झाली. आगस्ट क्रांतियुद्धांतला एक तेजस्वी स्फुल्लिंग असें जें यावलीच्या संग्रामाचें स्वरूप तें अधिक विस्ताराने लिहावें अशी उत्कट इच्छा माझ्या मनांत, आधीच उत्पन्न झालेली होती. तशांत वीर पंजाबराव यांनी मला नेमकी तीच विनंती केली व ती मीं मोठ्या आनंदाने मान्य केली असा प्रस्तुत ग्रंथाचा थोडक्यांत इतिहास आहे.

या ठिकाणीं हें नमूद करणें अवश्य आहे की, या ग्रंथांत आलेली यावलीविषयक माहिती संकलित करण्यास व ती मला वेळीवेळीं उपलब्ध होण्यास वीर पंजाबराव यांचेच परिश्रम कारणीभूत झाले.

पंजाबराव तुरुंगांतून सुटून आल्यावरच त्यांचा माझा प्रथम परिचय झाला. ग्रंथलेखनाचें तोंडी आश्वासन दिल्यापासून प्रत्यक्ष ग्रंथलेखनास प्रारंभ करण्यापर्यंत सुमारें एक वर्षाचा काळ लोटला. अखिल भारतीय शारीरिक शिक्षण परिषदेचें जें पहिलेंच अधिवेशन अमरावतीला १९४६ च्या ऑक्टोबरांत भरलें त्याचा प्रधानमंत्रि या नात्याने तत्संबंधीच्या पूर्वोत्तर कार्यांत माझा १९४७ च्या एप्रिलपर्यंतचा काळ गेला. एप्रिल महिन्यांत मी आजारी झालों आणि त्या संधीचा फायदा घेऊन सुमारें १५ दिवसांत हा ग्रंथ लिहून तयार केला.

ग्रंथ लिहीत असतांना राष्ट्रीय महत्वाच्या मोठमोठ्या घटना घडत होत्या. १९४८ च्या जून महिन्यांत आपण हिंदुस्थान सोडणार अशी घोषणा ब्रि. सरकारने केली होती. ग्रंथ १५ आगस्ट १९४७ ला प्रसिद्ध करावयाचाच या निश्चयाने पूर्ण करण्यांत आला व त्याच्या मुद्रणाचें काम सुरू झालें. परंतु त्यानंतर आणखीहि अनंतपट वेगाने राष्ट्रीय महत्वाच्या केवढ्या तरी मोठ्या घटना घडूं लागल्या. १९४८ च्या जूनच्या ऐवजी

१९४७ च्या १५ आगस्टलाच ब्रिटिशांनी भारतांतील आपल्या सत्तेचें विसर्जन केलें. १५ आगस्टला यावलीचा हा ग्रंथ उद्यास येऊं शकला नाहीं. पण ता. १५ आगस्टलाच यावलीने क्रांतिसंग्रामास प्रारंभ केला होता. भारतीय स्वातंत्र्यहि मोठ्या समारंभपूर्वक ता. १५ आगस्टलाच उदयास आलें, ही यावलीला अभिमानाची गोष्ट वाटते.

अर्थात्, एप्रिल १९४७ च्या नंतरच्या या सर्व राष्ट्रीय व ऐतिहासिक घटनांचा निर्देश या ग्रंथांत येऊं शकला नाहीं. १५ आगस्ट १९४७ रोजीं यावलीने जेव्हा स्वतंत्र भारताचा राष्ट्रध्वज फडकविला तेव्हा खरोखरच तिच्या डोळ्याचें पारणें फिटलें असेल, कारण याच ध्वजाच्या रक्षणासाठी यावलीचा ४२ आगस्टचा उग्र संग्राम घडून आला होता.

सांप्रतचा स्वतंत्र भारत जेव्हा स्वातंत्र्य प्राप्तीसाठी आपण केलेल्या प्रयत्नांकडे मागे वळून पाहील तेव्हा त्याला त्याचें स्वरुप कशा तऱ्हेचें दिसेल याचें केवळ दिङमात्र दर्शन प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने होणार आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या बृहत् संग्रामाचें विद्‌भींतील एक अल्पसें पण उज्ज्वल व गौरवास्पद प्रतीक या दृष्टीनेच यावली येथील स्वातंत्र्यसंग्रामाच्या प्रस्तुत इतिहासाकडे पाहिलें पाहिजे.

ग्रंथाची सर्व तयारी झाली तरी 'सर्वारंभास्तंडुलप्रस्थ मूलाः' या न्यायानें मुद्रणासाठी आवश्यक रकमेची उभारणी कशी करावयाची हा प्रश्न होताच. परंतु शहीद स्मारक समितीला ग्रंथ प्रकाशनासाठी यावलीचे श्री. रामकिसन अंबादास मुंदडा उर्फ बाबूशेठ व दे. ग. राजाराम शिंगाजी कांडलकार यांनी अनुक्रमे रु. १५०० व ५०० बिनव्याजी कर्जाऊ देऊन हीहि अडचण दूर केली याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. त्यांच्या या साह्याच्या अभावीं समितीला प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित करण्यास बराच विलंब लागला असता.

ग्रंथ छपाईचें काम नागपुर येथील रामेश्वर मुद्रणालय' व प्रभाकर' मुद्रणालय यांचे चालक अनुक्रमें श्री. पटले व श्री. तिडके यांनी अतिशय

आस्थापूर्वक व गैरसोय सोसून करून दिलें याबद्दल मी त्यांचा अतिशय आभारी आहे. तसेंच यांत देण्यांत आलेल्या छायाचित्रांचे ठसे (Blocks) नागपुर येथील शिवराज लिथो प्रेसचे मालक श्री घनवटे यांनी अल्प मूल्यांत आत्मीयतेने करून दिले, याबद्दल त्यांचेहि आभार मानणें अवश्य आहे. ग्रंथाचीं मुद्रितें तपासण्याची जबाबदारी नागपुरच्या हिस्लॉप महाविद्यालयांतील मराठीचे प्राध्यापक श्री. अ. ना. देशपांडे यानी अंगावर घेऊन पार पाडली याबद्दल तेहि धन्यावादास पात्र आहेत.

याशिवाय श्री. जा. बा. दिवटे, यावली, यांनी रात्रं-दिवस खपून मुद्रणार्ह हस्तलिखित प्रत तयार करून दिली या बद्दल तेहि धन्यवादास पात्र आहेत.

नागपुर प्रकाशन संस्थेचे चालक श्री. दि. मा. धुमाळ व माझे मित्र श्री. वि. ब. वैद्य यांचेंहि ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत जें वारंवार साह्य झालें त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. मुखपृष्ठावरील चित्र श्री. दिनानाथराव दलाल यांनी अल्पावधींत तयार करून दिलें याबद्दल त्यांचा साभार निर्देश करणें अवश्य आहे.

या ग्रंथाच्या प्रथमावृत्तींचें सर्व उत्पन्न यावली येथील शहीद स्मारक समितिला देण्यांत यावयाचें आहे. वीर पंजाबराव यांची अखंड प्रेरणा जर मागे नसती आणि कालावधि होत गेला तरी त्यांनी मजवर जो अढळ विश्वास ठेवला तो जर ठेवला नसता तर ग्रथलेखनाचें कार्य माझ्या हातून झालें असतें किंवा नाही याची शंकाच आहे पण पंजाबराव यांचे आभार मानण्याचा प्रयत्न करणें हा देखील औचित्यभंग होईल.

अस्तु. यावलीस जे शहीद झाले ते चिरंजीव झाले आणि जे जगले ते भाग्यवान् ठरले. आपल्या त्यागाचें उत्कट फळ त्यांना आज उपभोगण्यास मिळत आहे.

अमरावती
ता. २८।८।१९४७

हरिहर वामन देशपांडे

## छायाचित्रें

# यावलीचा स्वातंत्र्य संग्राम

## अनुक्रमणिका

### क्रांतिकांड



### हत्याकांड

## न्यायकांड



शहीद राजारामजी औरंगपुरे

ता. १८ आगस्ट १९४२ युद्धांतील तीन वीर—



१ बारकाजी तडस   २ अबदुल रहीम   ३ तुळशीरामजी भरडकार

# यावलीचा स्वातंत्र्य-संग्राम

## क्रांतिकाण्ड

### प्रकरण १ लें

### प्रास्ताविक माहिती

भारतीय स्वातंत्र्य संग्रामाच्या इतिहासात विदर्भातल्या अमरावती जिल्ह्यातील यावली नामक गावाने एक प्रकारचा दिव्य लौकिक व अढळ स्थान संपादन केलें आहे. १९२० ३०, व ४२ या तीनही वर्षी परकीय ब्रिटिश सत्तेचें जोखड आपल्या मानेवरून काढून टाकण्यासाठीं म० गांधींच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेसने भारतीय जनतेला जो संग्रामाचा आदेश दिला त्याचें यावलीच्या शूर, ग्रामीण जनतेने कसें पालन केलें आणि स्वातंत्र्ययज्ञाच्या अग्निकुंडात आपला हविर्भाग कशा रीतीने अर्पण केला याचा इतिहास प्रस्तुत पुस्तकात देण्याचें योजिलें आहे. यावलीच्या नागरिकांवर परकीय सत्तेच्या दुष्ट आणि निर्दय अधिकाऱ्याकडून झालेल्या अत्याचाराच्या या कथा अद्भुत व रोमांचकारी आहेत गेल्या २५ वर्षांत स्वदेश-स्वातंत्र्याची तळमळ खेड्यापाड्यापर्यंत कशी जाऊन पोहोंचली होती याचें उपलक्षणात्मक ज्ञान भावी पिढीला करून देण्यास हा इतिहास उपयुक्त होईल, अशा आशेने तो प्रसिद्ध करण्यात येत आहे. अशाच प्रकारचा इतिहास भारतवर्षाच्या दूरदूरच्या कोपऱ्यातील खेड्यापाड्यातून घडला असला पाहिजे! हजारों लाखों खेड्यातून भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचा सिंहनाद दुमदुमला असला पाहिजे!! हजारों लाखो ग्रामीणांचें बलिदान स्वातंत्र्य-यज्ञाच्या वेदीवर घडलें असलें पाहिजे!!! सहस्रावधि देवाब्राम्हणानी व ऋषींनी आपल्यावरील

अत्याचाराच्या कथा सहस्रमुखानें वर्णाव्यात व त्याच्या आर्तनादाने गगन मंडळ दुभंगूं लागावें तेव्हा कोठे क्षीरसागरात झोपीं गेलेला भगवान जागा होतो आणि ह्या भूलोकावर अवतार घेऊन दुष्टांचें पारिपत्य करून आपल्या भक्तांचें सरक्षण करतो अशी पुराणातरीं कथा आहे. जनताजनार्दनाचें आवाहन देखील अशाच रीतीने सहस्रमुखाने व्हावें लागतें, तेव्हा कोठे तो जागृत होतो.

या जागृतीच्या कालखंडांत जुल्मी अत्याचाराना टक्कर देणाऱ्या वीरांचें बलिदान जितक्या प्रमाणात विशुद्ध अशा नैतिक भूमिकेवरून होईल तितक्या प्रमाणात तें जागृतीचें कार्य लवकर यशस्वी करू शकतें यावलीच्या स्वातंत्र्य संग्रामाचा जो इतिहास प्रस्तुत ग्रंथात देण्यात आला आहे त्यावरून तेथील जनतेने या नैतिक भूमिकेचाच अवलंब कसा केला होता आणि त्यामुळेच अघोर दडपशाहींतूनहि तिच्या सामर्थ्याचा विकास कसा होत गेला याची कल्पना येऊ शकेल.

भारतवर्षांतील सात लक्ष खेड्यांपैकीं यावली हें एक लहानसें पण टुमदार खेडें आहे. १९४१ साली झालेल्या सरकारी शिरगणतीप्रमाणें यावलीची लोक संख्या २०१० नमूद करण्यात आली आहे. गावात कुणबी व माळी या जातींचें वास्तव्य अधिक प्रमाणात असलें तरी, तेली, चांभार, मुसलमान इ० जातींच्या लोकांची वस्तीहि यावलीस आहे एकूण घरें सुमारें ५०० आहेत एकदरींत गावकरी लोक शेती, बागायती व तद्विषयक उद्योग धंदे यावरच आपली उपजीविका करतात शेतीचें मुख्य उत्पन्न ज्वारी व कापूस हें असलें, तरी त्या बरोबरच गहू, दाळी इत्यादि जीवनोपयोगी धान्यांची पैदास शेतीवर करण्यात येते स्वावलंबी जीवन निर्माण करण्याच्या दृष्टीने ज्या थोड्या फार खेड्यानी बुद्धिपुरस्सर प्रयत्न केला असेल त्यातच यावलीची गणना करावी लागेल शैक्षणिक दृष्टीने मराठी चार इयत्तेपर्यंत प्राथमिक शिक्षणाचीहि व्यवस्था या गांवांत झाली आहे आणि अधिक वरच्या शिक्षणाची व्यवस्था व्हावी अशी ग्रामस्थ लोकांची मागणी आहे

यावलीचें भौगोलिक महत्त्व विशेष आहे. अमरावतीपासून उत्तरेकडे चौदाव्या मैलावर हें गाव वसलेलें आहे अमरावतीहून मोर्शीस जाणारा जो

जमार्ग आहे त्यावर बाराव्या मैलावर माहुली नामक गावीं पोलीस ठाणें आहे. थून तीन मैल आत यावली गाव वसलेलें आहे गावाच्या दक्षिणेस पूर्व श्चिम एक नदी वाहत आहे, पश्चिमेकडे सपाट असें मोठें मैदान आहे, उत्तरे कडील प्रदेश बागबगीच्यानी रमणीय बनलेला आहे, गावाच्या मध्यभागीं शाळा व तिच्या समोर एक छोटेसे पटांगण असून त्याला ग्रामस्थ लोकानी गांधी चौक हें नाव दिलें आहे एका बाजूला नदी, दुसऱ्या बाजूला मोकळें मैदान, तिसऱ्या बाजूला बागबगीचे यामुळे गांवाचा आसमत मोठा रमणीय भासतो गावांतील घरें मातीचीं पण प्रशस्त व मोकळीं मोकळीं अशीं आहेत पावसाळ्या दिवसांत माहुली जहागीरच्या पोलीस ठाण्यापासून यावलीपर्यंतचा अवघ्या तीन मैलाचा रस्ता चालून जाणें हें एक कठीण कर्म आहे सर्व जगल काळ्या मातीचें असल्याने चिकट व चिकण अशा चिखल तुडवीत जावें लागतें शिवाय वाटेंत नाले भरून चाललेले असतात. सुमारें एक मैलाचा प्रवास नाल्या नाल्यातूनच करावा लागतो

या भौगोलिक परिस्थितीमुळे इग्रजी अमलापूर्वी यावलीला परकी आक्रमणापासून बरेंच नैसर्गिक सरक्षण मिळत असलें पाहिजे पावसाळ्यात गाडी तर चालत नाहींच, घोडें देखील मोठ्या मुष्कलीने जाऊ शकतें शिवाय याव लीची पावसाळी विशेषता अशी आहे कीं, यावलीच्या वाटेवरील नाल्यात व खुद्द यावली गावात जागोजागीं डेरे निर्माण होतात ह्या डेऱ्याच्या जागा अति शय फसव्या असतात वरून सपाट व बिनधोक्याची अशी जमीन दिसत असते परतु तिच्यावर पाऊल ठेवताक्षणींच मनुष्य कुठें गुडघ्याइतका, तर कुठे कबरेइतका आत फसतो. पावसाळ्यात अशा फसव्या जागा पुष्कळ निर्माण होतात आणि यानाच वऱ्हाडी भाषेत डेरा असे नाव आहे या डेऱ्या मुळे यावलीची 'डेऱ्याची यावली' म्हणून प्रसिद्धी आहे गावांत एक जुनाट पडीक अशी गढी आहे ती निदान २५०।३०० वर्षां पूर्वीची असावी असें वाटतें अमरावती जिल्ह्याच्या गॅझिटिअर मध्ये यावलीचा ऐतिहासिक सदर्भ आढळून येत नसला, तरी गावाची भौगोलिक रचना व संरक्षणक्षम अशी नैसर्गिक परिस्थिति, यामुळे ऐतिहासिक कालात हा गाव बराच बलाढ्य असावा, आणि १९२०, १९३० व १९४२ सालीं झालेल्या स्वातंत्र्य-संग्रामात येथील

लोकानी अभिव्यक्त केलेला पराक्रम ही त्यांच्या रक्तात चालत आलेली परपरा गत देणगी असावी असेंहि अनुमान करण्यास वाव आहे वरील तीनहि स्वातंत्र्य सग्रामात यावलीने ज्या वाढत्या प्रमाणांत भाग घेतला, जे अत्याचार सहन केले, आणि प्रतिकारात्मक शौर्यचा जो अनुक्रम आदर्श घालून दिला, त्यामुळे यावलीचा आधुनिक इतिहास निर्माण झाला आहे हा इतिहासाच्या ग्रंथात गौरवाचें स्थान विभूषित करू शकेल आणि भावी पिढीच्या स्वातंत्र्य प्रीतीला अखड स्फूर्तीच्या जलधारेने परिसिंचित करीत राहील इतका उज्वल इतका अद्भुत व रोमहर्षण-दायक आहे यावलीसारख्या लहानशा गावीं साप्रत कॉंग्रेस कमिटी व्यायाम शाळा, भारति मडळ, शहीद स्मारक समिति, वाचनालय, औषधालय इत्यादि कार्यक्षम सस्था यशस्वी रीतीनें चालू आहेत यावरून यावलीस निर्माण झालेला चैतन्य प्रवाह केवढा प्रबळ असला पाहिजे याची कल्पना येऊ शकते प्रतिकारात्मक अनुक्रम वीरतेबरोबरच ही जी विधायक योग्यता या सामर्थ्य कार्यकर्त्यांनी दाखविली तिचाच परिणाम असा झाला कीं, राष्ट्रीय सरकारची राजवट येऊन कॉंग्रेस मत्रिमडळ अधिकारारूढ झाल्या बरोबर माट्ली यावली सडकेची योजना तयार झाली, प्रसूतिगृहासहित सपूर्ण चिकित्सालय सरकारी खर्चानें यावलीला स्थापन करण्याच्या योजनेस मजुरी मिळाली, प्रांतात ज्या ठिकाणीं बेसिक शिक्षणाच्या नवीन शाळा स्थापन होणार आहेत त्यात यावलीला अग्रमान मिळाला, खादी इत्यादि कॉंग्रेसप्रणीत विधायक कार्याचें केंद्र यावली बनणार हें स्पष्ट झालें, आणि हें सर्व ज्या शहीदांच्या १९४२ च्या सग्रामात आहुती पडल्या त्यांचें स्मारक म्हणून होणार हें विशेष होय !!!

प्रकरण २ रें

# वन्हि चेतला

प्रतिकारात्मक पराक्रमाच्या यावर्तांत अमरावती जिल्हा वऱ्हाडांत नेहमीच आघाडीवर राहिला. दैनंदिन जीवनांत चिकाटीने करावयां लागणाऱ्या विधायक कर्तृत्वापेक्षा आणीबाणीचा प्रसंग निर्माण झाला असता, राष्ट्रीय आन्दोलनाची लाट उफाळली असतां व दोन हात करण्याची संधि उपलब्ध झाली असता या जिल्ह्यांतील जनतेने विशेष शौर्य प्रगट केलेलें आहे. जोपर्यंत कॉंग्रेसची चळवळ अर्जविनऱ्याच्या चाकोरींतून जात होती तोपर्यंत या जिल्ह्यातील जनतेला तिच्याबद्दल फारसें सौहार्द वाटलें नाही. परंतु कै० लोकमान्य टिळकानी स्वराज्याचा जो महामंत्र फुकला त्याचे वारें कानात शिरल्याबरोबर अमरावती जिल्ह्यांतील लोकांच्या प्रतिकारात्मक शौर्याने उचल खाल्ली. १९०४ ते १९०७ च्या घोर काळातहि आखाडे व तालीमखाने, गुप्त मंडळें, तरुणाच्या संघटना इ० प्रकारानीच या जिल्ह्यातील जागृतीला अभिव्यक्ति मिळाली. वीर वामनराव जोशी यांच्या सभोंवार तरुणाचे समूह जमूं लागले. त्या काळातील दडपशाहीचा तडाखाहि या जिल्ह्यावर बसला आणि लो० टिळक १९०८ सालीं तुरुंगात गेल्यावर सर्व महाराष्ट्राप्रमाणें अमरावती जिल्ह्यातहि किंकर्तव्यमूढता उत्पन्न झाली. परंतु या नंतर जालियनवाला बागेंतील असहाय स्त्रीपुरुषावर जनरल डायर नामक ब्रिटिशाधमाने झाडलेल्या गोळ्यांचे आवाज आणि पंजाबच्या जनतेचा आर्तनाद कानीं पडताच पुन्हा जागृतीची लाट उसळली. गावोगावीं हरताळ पडले निषेधाच्या सभा झाल्या. जनतेच्या संतापाचा पारा भडकत चालला तशात म० गांधींच्या असहकारितेचा कार्यक्रम समोर आला नागपूर कॉंग्रेसमध्ये त्यावर पसंतीचा शिक्कामोर्तब चढला, आणि नतर सर्व जिल्हाभर एक प्रकारें तुफानच उठलें.

जनतेच्या संतप्त मनोवृत्तीला असहकारितेची पुकार घालीत कॉंग्रेस पुढारी खेड्यापाड्यांतून फिरू लागले विशेषतः वीर वामनराव जोशी यांच्या तुफानी दौऱ्यानी जनतेंत विलक्षण आवेश निर्माण केला. त्या कालीं वीर वामन-

रावाची व्याख्यानेंहि अशीं होत कीं, प्रत्यक्ष प्रेतातहि प्राणसंचार व्हावा, स्मशानातील मृतानीहि जागृत होऊन लढू लागावे, दगडधोंड्याच्या ठिकाणींसुद्धा चैतन्य सळसळू लागावें. या तुफानी दौऱ्यात वीर वामनराव जोशी यानी यावलीस एक दिवस व्याख्यान देऊन काँग्रेसचा असहकारितेचा कार्यक्रम समजावून सांगितला. विशेषतः विदेशी मालावर बहिष्कार व स्वदेशीचा पुरस्कार, आणि बिगारबलुत्याच्या गैरकायदा जुलमाचा निषेध हा वामनरावजींच्या भाषणाचा मुख्य भाग असे. करबंदीच्या संभाव्य चळवळीबद्दलहि ते जनमत तयार करीत. वीर वामनराव याच्या उपरिनिर्दिष्ट व्याख्यानानी यावलीसहि चळवळीच्या अग्नीचा स्फुलिंग पडला.

याप्रमाणें ठिणगी पाडून वीर वामनराव निघून गेले. सरकारी नोकऱ्या व पदव्या याचा त्याग करण्याच्या कल्पनेने, यावली जवळच दोन फर्लांगावर असलेल्या नरसिंगपुर येथील कामकर्ते पाटील रंगराव बालाजी व यावली येथील कामकर्ते पटवारी रामचंद्र केशवराव याच्या मनात घर केलें. कामकर्त्या पाटील-पटवाऱ्याचीही जोडगोळीच पहिल्यादा ब्रिटिश सरकारच्या छातीवर आदळली त्यानी वीर वामनराव गेल्यानतर स्वयस्फूर्तीनें यावलींत एक सभा भरविली आणि काँग्रेसचा कार्यक्रम अमलात आणण्याची योजना या सभेंत त्यानी ग्रामस्थ लोकासमोर मांडली त्यानी प्रथम काँग्रेसचं एक स्वयंसेवक दल स्थापन केलें.

स्वयंसेवक दलाच्या स्थापनेचा निश्चय जाहीर करताच त्यात पहिले स्वयसेवक म्हणून पुढील लोक भरती झाले. ( १ ) रंगराव बालाजी पाटील ( स्वतः ) ( २ ) रामचंद्र केशवराव पटवारी ( स्वत. ) ( ३ ) अबादास मारुती त्रिकाडे ( ४ ) गंगाधर नारायण जोशी ( ५ ) श्रीधर नारायण जोशी ( ६ ) शंकर भाऊंव ( ७ ) नारायणराव पाटूर्जी ओरंगपुरे. या औरंगपुरेंचाच धाकटा भाऊ १९४२ च्या आंदोलनांत शहीद झाला. या स्वयंसेवक दलातर्फे प्रथमतः गांव स्वावलंबी करण्याची चळवळ हातीं घेण्यात आली. त्यानी गावांत एक तेलघाणा काढला आणि गोरगरीबाना स्वस्त भावाने जीवनोपयोगी वस्तु मिळवून देण्यासाठी एक धान्याचं व किराणा मालाचें दुकान उघडलें. याशिवाय गोरक्षण फंड जमा करून तो अमरावतीच्या गोरक्षण संस्थेकडे पाठविण्याचा उपक्रम सुरू केला.

यावलींतील स्वावलंबनाचा उत्साह सहा महिनेपर्यंत पुरला. पुढे तो ओसरला त्या रागाने बालाजी व रामचंद्र केशवराव या पाटील-पटवाऱ्याच्या जोडीने हा वन्हि, मडकविला व त्यासाठी सभा भरविली, त्याच्यावर सरकारी अधिकाऱ्याची वक्रदृष्टि वळली नसती तरच आश्चर्य झालें असतें सरकारी दडपशाहीची कुऱ्हाड तात्काळ त्याच्यावर कोसळली. सहा महिन्याकरिता त्या दोघानाही कामावरून काढून टाकण्यांत आलें. परंतु चळवळीचें बीज रुजलें तें रुजलेंच १९३० च्या आंदोलनाच्या वेळीं त्याला अंकूर फुटले आणि १९४२ सालीं त्याचा यावलीस मोठा पराक्रमशाली वृक्ष बनला सारांश, १९२१ च्या असहकारितेच्या आंदोलनात यावलीने भाग घेतला आणि सरकारी दडपशाहींत यावलीचे दोन बळी गेले

## प्रकरण ३ रें

# १९३० चा जंगल सत्याग्रह

हिंदुस्थानांतील स्वातंत्र्याच्या चळवळीचा असा एक विलक्षण योग आहे कीं, सामान्यत दर दहा बारा वर्षांनी तिला एक नवी भरती येते. परकीयसत्ता आपल्या प्रबळ सामर्थ्याने ही लाट दडपून टाकण्याचा प्रयत्न करते. कांहीं काल ती दडपलीहि जाते सर्वत्र सामसूम व शांतता निर्माण होते परकीय शासकाचा कारभार सुरळीतपणें व विनबोभाट चालू लागतो, जनता थिजल्यासारखी-थंड झाल्यासारखी भासते दडपशाहीच्या आतंकामुळे लोक आता अगदी निष्प्राण बनले आहेत, त्याच्या ठिकाणचें सर्व चैतन्य नष्ट झालें आहे, पुन्हा ते आता वर तोंड काढू शकत नाहीत आणि गुलामगिरीची बेडी आता अधिक मजबूत झाली आहे, असाही समज पसरू लागतो आणखी शें दोनशें वर्षें देखील आपणांस सोपा कादण्यास हरकत नाही असें ब्रिटिश शासकांनाही वाटू लागतें परंतु वस्तुस्थिति अशी असते कीं, दडपशाहीच्या वरवऱ्याखाली दबलेली आग भूमिगत होऊन पसरू लागते पसरता पसरता पुन दहा वर्षांनी पूर्वीपेक्षाहि दुप्पट

जोमानें तिचा प्रस्फोट होतो आणि हा प्रस्फोट झाला म्हणजे पुन्हा घोर दमन-चक्र फिरतें, पुन्हा सर्वत्र शांतता भासते, पुन्हा असंतोषाची आग भूमिगत होऊन धुमसत राहते, पुनः दहा बारा वर्षांनी पूर्वीपेक्षा कितीतरी वेगानें तिचा भयंकर स्फोट घडून येतो ब्रिटिश शासनाच्या प्रारंभापासून हा आवर्त अशाच रीतीनें चालत आलेला आहे १८५७ च्या उघड स्वातंत्र्य संग्रामानंतर हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत झालेल्या उठावण्या, क्रांतिकारकांचे गुप्त कट, बॉंबगोळ्यांचे परिस्फोट, १९१४ च्या महायुद्धाच्या वेळीं परदेशस्थ हिंदी बांधवांनी केलेले स्वातंत्र्य-साधनाचे प्रयत्न आणि काँग्रेसच्या सनदशीर चळवळीच्या निर्जीव सांगाड्यांत लो० टिळक इ० पुढाऱ्यांनी निर्माण केलेला जिवंतपणा व तिच्या माध्यमांतून उघडपणें वाहूं लागलेलें स्वराज्यप्राप्तीच्या प्रयत्नांचें वारें इ० गोष्टींचा इतिहास वरील विधानाच्या सत्यतेस बळकटी आणण्यास पुरेसा आहे

१९०४ तें १९०८ च्या दरम्यान उठलेली स्वराज्याच्या चळवळीची लाट दबल्यानंतर पुन. १९२०–२१ सालीं तिची केवढ्या मोठ्या प्रमाणांत असहकारितेच्या आंदोलनाच्या रूपानें आवृत्ति निघाली व तिचे पडसाद यावलीसारख्या दूरस्थ ग्रामांतही कसे उमटले हें मागील प्रकरणीं आपण पाहिलें. परंतु नैसर्गिक क्रमांत असहकारितेचाहि भर ओसरला. सरकारी शाळा-कॉलेजें पुन्हा पूर्ववत् सुरू झालीं, कोर्ट कचेऱ्यांना बहर येऊं लागला. कज्जे दलालांचे खिसे गरम होऊं लागले. ब्रिटिश शासनाचा दरारा सर्वत्र भासूं लागला व मोठमोठे पुढारी पुन्हा आपल्या कर्तृत्वाचा गाडा कायदे मंडळादि सनदशीर मार्गावरून चालवूं लागले क्षणभर असें भासूं लागलें कीं, क्रांतीचा मार्ग खुरटला आहे. तिचें नांवहि उच्चारण्यास कोणी तयार नाहीं; आणि हप्त्या *हप्त्याच्या सुधारणांच्या द्वारा ब्रिटिशांच्या मेहेरबानीनेच फेव्हां तरी शेंदीडशें* वर्षांनंतरच स्वराज्याचें शिखर पाहावयास मिळणार !

परंतु *सनदशीरपणाच्या मृगजळामागे धाऊं* लागलेली चळवळीची हरिणी लवकरच भ्रमनिरस्त झाली क्रांतीच्या अथांग जलाशयाकडे तिचें मन पुन्हा ओढ घेऊं लागलें १९२९ सालीं लाहोरच्या कॉंग्रेसनें पूर्ण स्वराज्याचा प्रस्ताव मंजूर करून कायदेभंगाच्या लढाईचें रणशिंग फुंकण्याचा सर्वाधिकार म० गांधींना दिला मिठाच्या सत्याग्रहाची अभिनव घोषणा गांधीजींनी

करतांच 'रणभेरी बज चुकी. वीरवर पहिनो केसरिया बाना' या गानाचे निनाद भारत वर्षभर घुमूं लागले. गांधीजींचा 'दंडी प्रवास' सुरू झाला. या प्रवासातील त्यांच्या एकेका व्याख्यानाने देशात सहस्र सहस्र हत्तींचें बळ निर्माण केलें. चळवळीचा वणवा देशभर भडकूं लागला. मिठागरावर सत्याग्रहीचे मोर्चे सुरू झाले पुनः एक वार शाळा कॉलेजें ओस पडली. दारू वंदी, परदेशी कापडाचें निरोधन इ० बाबतच्या काळ्या कायद्यांना लोक खुशाल पायाखाली तुडवूं लागले. चैतन्याचा प्रचंड सागर हेलावून गेला त्यावर लाटा मागून लाटा उसळूं लागल्या. समुद्रापासून शेकडों मैल लांब असलेल्या यावलीसहि या लाटांचे तुषार झोंचू लागले. या चळवळीची लाट यावलीला येऊन पोहोंचतांच यावलीच्या जनतेने पहिल्या सप्ताहात विठ्ठलराव दादाजी मगरूळकर यांच्या हस्तें विदेशी कापडाची होळी पेटवून तींत इतक्या दिवसांचें आपलें शैथिल्य जाळून टाकलें आणि नवचैतन्याने प्रेरित होऊन ती मोठ्या जोमाने नवीन आंदोलनांत भाग घेण्यास सिद्ध झाली.

त्यावेळीं वऱ्हाड प्रांतिक कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्षपद लोकनायक माधव श्रीहरी उर्फ बापूजी अणे यांच्या हातीं होतें. लाहोर कॉंग्रेसच्यानंतर मध्यवर्ती कायदे-मंडळांतील जागांचे राजीनामे देण्याच्या बाबतींत कॉंग्रेस श्रेष्ठींशीं मतभेद होऊन त्यांनीं प्रांतिक कॉंग्रेस कमेटी वीर वामनराव जोशी यांच्या स्वाधीन केली. परंतु लवकरच गांधीजींचें दंडीकूच सुरू झाल्यानंतर लो० अणे यांनी मध्यवर्ती कायदे मंडळातील सदस्य याचा राजीनामा दिला आणि एक सामान्य सैनिक या नात्याने वीर वामनरावाच्या नेतृत्वाखाली उभारल्या जाणाऱ्या स्वातंत्र्य-सेनेंत ते भरती झाले. वऱ्हाडात जरी समुद्र-सानिध्य नसलें, तरी वऱ्हाडच्या एका फार मोठ्या विभागात पूर्वी म्हणजे ब्रिटिश सरकारने मिठाचा कायदा पास करून मीठ निर्माण करण्याची येथील लोकांना बंदी करीपर्यंत, मिठाची मोठ्या प्रमाणात निपज होत असे. वऱ्हाडातील मिठाचा व्यापार पूर्वेस भंडाऱ्यापर्यंत तर पश्चिमेस खानदेशापर्यंत चालत असे चाळीस हजार कोळ्यांचीं कुटुंबें या व्यापारावर समृद्ध झालेलीं होतीं. मिठाचा कायदा ब्रिटिश सरकारनें अमलात आणल्यानंतर या लोकोपयोगी जमातीची व कुटुंबाची वऱ्हाडात वाताहत झाली. कोळी समाजाची गांवेंच्या गांवें कशी नामशेष झालीं

आणि उरल्या सुरल्या कोळ्याना उपजीविकेचा धंदा नष्ट झाल्यामुळे सांप्रत कसें दीनवाणी जीवन कंठावें लागत आहे याचा लोकांना फारसा विसर पडलेला नव्हता. त्यामुळे मिठाच्या सत्याग्रहाच्या कल्पनेनें देखील वऱ्हाडच्या जनतेला झाल्वून सोडलें. मिळेल त्या खाऱ्या पाण्याच्या विहिरींचें पाणी घेऊन जागों जागीं लोक बेकायदा मीठ करूं लागले समुद्राचें पाणी आणवून त्यापासून मीठ बनविण्यात येऊ लागलें, आणि या बेकायदा मिठाचा इंरास गांवोगाव होऊ लागला. एकेका मिठाच्या पुडीची किंमत पन्नास पन्नास व शंभर शंभर रुपये देखील लागूं लागली. सभा व-व्याख्यानें याचा सर्वत्र बेफाम दर्या उसळला आणि त्यात मे महिन्याच्या ३१ तारखेस वऱ्हाड प्रांतिक कॉंग्रेसचे अध्यक्ष वीर वामनराव जोशी आणि जून च्या १४ तारखेस उमरावती जिल्हा युद्ध मंडळाचे मंत्री श्री. हरीहरराव देशपांडे याना अटक करून ब्रि० सरकारने जनतेवरील आपल्या पहिल्या हल्ल्याचा बिगूल वाजविला. वीर वामनराव जोशी यांच्या पश्चात् वऱ्हाड प्रांतिक युद्ध मंडळाची माळ स्वाभाविकपणेंच लो० अणे यांच्या गळ्यात पडली.

वऱ्हाडात वनचराईच्या कायद्यामुळे सर्वसामान्य शेतकऱ्यांची जी गैर-सोय होते, तिचें गाऱ्हाणें वेशीवर टांगण्याचा प्रयत्न लो० अणे यानी आपल्या यवतमाळ जिल्हा सभेतर्फे पूर्वी अनेक वेळां केलेला होता. जंगल सत्याग्रहा-च्या रूपाने पुन्हा एक वार वऱ्हाडी जनतेच्या या गाऱ्हाण्याला जबरदस्त वाचा फोडण्याचें लो० अणे यानी ठरविलें आणि वऱ्हाडात जंगलचा कायदा तोड-ण्याचें पहिलें रणशिंग पुसद येथे फुंकून लो० अणे गिरफदार झाले. त्यांच्या गिरफदारीच्या पश्चात् वऱ्हाडच्या कोनाकोपऱ्यातून जंगल सत्याग्रहाचा एवढा प्रचंड कल्लोळ उसळला की, त्यामुळे ब्रि० नोकर शाहीचें देखील धाबे दणा-णून गेलें आणि तिला सळो की पळो असें होऊ लागलें. जंगलेंच्या जंगलें, कापून सफा करण्यात येऊ लागलीं. ताडी, शिंदी, चंदन इत्यादींचीं सरकारी उत्पन्नाला कारणीभूत होणारीं बनेंच्या बनें उध्वस्त करण्यात आलीं

ह्या प्रकाराने यावलींतील तरुणाच्या ठिकाणीं नव चैतन्य सचरू लागलें १९२० पेक्षाहि अधिक जोमाने भारत मातेच्या हाकेला ओ देण्याची वेळ आतां आली आहे असे ते बोलू लागल जंगल सत्याग्रहाच्या योजना तयार

होऊं लागल्या आणि सत्याग्रहींच्या सेनेत तरुणाची भरती सुरू झाली. सुमारें ५२५ नांवें नोंदविली गेलीं असतील नसतील तोंच सत्याग्रहाचा मुहूर्त ठरविण्यात आला. उमरावती जिल्हा कॉंग्रेस कमेटीने १९३१ सालीं जिल्ह्यातील सत्याग्रहाचा त्रोटक इतिहास छापून प्रसिद्ध केला आहे त्यात यावली येथील घटनाचा गौरवपूर्ण निर्देश करण्यात आला आहे. ता. ८ आगष्ट १९३० हा सत्याग्रहाचा मुहूर्त योजण्यात आला कुऱ्हाडी, विळे इत्यादि सत्याग्रहाचीं साधनें गोळा करण्यांत आलीं.

या खेपेस यावलींतील तरुणाचें नेतृत्व कैलासवासी हुतात्मे वीर लक्ष्मणराव पाचघरे यानी स्वीकारलें होतें. १९४२ च्या संग्रामात प्रसिद्धीस आलेले वीर पजाबराव यावलीकर यानीहि सत्याग्रहींच्या यादींत आपलें नाव नोंदविलें होतें. सत्याग्रहाकरिता कुऱ्हाडी, विळे, पहारी, इत्यादि उपकरणें आणण्यासाठी ते उमरावतीस गेले असताना त्याच्या वडिलानी त्याना जबरदस्तीनें आसेगाव हिवरा येथे नेऊन ठेविलें. तथापि सत्याग्रहाची तयारी चालूच राहिली. ता ७ आगष्टला वीर लक्ष्मणराव पाचघरे यानी ग्रामस्थ बन्धुभगिनींची जाहीर सभा घेतली आणि उद्याच्या सत्याग्रहाच्या वेळीं प्रेक्षक म्हणून सर्व लोकानी हजर रहावें अशी विनती केली. सत्याग्रहाची जागा यावलीचे पूर्वेकडे डवरगाव—चिचखेड रस्त्यावर असलेलें सरकारी जगल ही ठरविण्यात आली तो सर्व रस्ता तोरणें, तिरगी झेंडे लावून सुशोभित करण्यात आला होता. ८ आगष्टला सकाळीं बरोबर ९ वाजता सर्व सर्व सत्याग्रही वीर गाधी चौकात जमा झाले त्या ठिकाणीं त्याना सत्याग्रहाचा उद्देश व चळवळीचा दृष्टिकोण समजावून सागण्यात आला. यावली येथील सकल्पित सत्याग्रहाची वार्ता समजताच माहोली पोलीस ठाण्यातील सब इन्स्पेक्टर मि० शर्मा हे नऊ दहा शिपायाची तुकडी बरोबर घेऊन यावलीस येऊन ठेपलेले होते. योजनेप्रमाणें गाधी चौकातून निघून सत्याग्रहींची तुकडी सत्याग्रहस्थानावर ग्रामस्थ जनाच्यासह जाऊन पोहोंचली आणि तिनें ब्रि० सरकारच्या जगल कायद्यावर कुऱ्हाडी चालवून त्याची खाडोळी करण्यास प्रारभ केला. दुपारीं ३ वाजेपर्यंत याप्रमाणें एक सारखीं झाडें तोडल्यानतर सत्याग्रहींनी विश्राति घेतली. त्या वेळीं पोलीस सब इन्स्पेक्टर मि० शर्मा यानी सत्याग्रहींना अटक केली व प्रथम माहोलीस व तेथून पुढे उमरा-

वतीच्या तुरुंगात त्याची रवानगी केली. सत्याग्रहींनी तोडलेली लाकडें गावकरी लोकानी गावात आणून त्याचा लिलाव केला. आणि लिलावात वसूल झालेली रक्कम गाव काँग्रेस कमेटीला देण्यात आली. जनतेने अत्यंत निर्लोभ व शांत वृत्तीने सत्याग्रहाविषयी आपली सहानभूति अशा रीतीने व्यक्त केली

पहिल्या दिवशींची सत्याग्रहींची तुकडी या प्रमाणे गिरफ्दार झाल्यानंतर जनतेने सत्याग्रह परस्पर चालू ठेवण्याचें ठरविलें आणि प्रथम सत्याग्रहाची सप्ताहाची एक योजना तयार केली. दुसऱ्या दिवशीं म्हणजे ९ आगष्टला बाल सत्याग्रहींच्या तुकडीने जगलाच्या कायद्यावर हल्ला चढविला. सत्याग्रहींची बालवयें पाहून त्याना पकडण्याची हिंमत पो० स० इ० मि० शर्मा याना झाली नाही तिसऱ्या दिवशीं सत्याग्रहींची तुकडी बदलण्यात आलीं व ती पकडलीहि गेली चवथ्या दिवशीं या प्रमाणेंच सत्याग्रह झाला. सत्याग्रही व ग्रामस्थ लोक अत्यंत शिस्तीने व शांततेने आपलें कार्य करीत होते तरी त्याच्याविरुद्ध निरनिराळ्या प्रकारच्या फुगविलेल्या भरमसाट बातम्या वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्याकडे पाठविण्यात येत होत्या वस्तुत दुसऱ्या दिवसापासून सकाळीं ८ ते ९॥ याप्रमाणें अवघा १॥ तास सत्याग्रहाचा कार्यक्रम चाले परंतु वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्याकडे ज्या बातम्या पाठविण्यात येत त्यात ' आज बाभळीचीं साडेतीनशे झाड तोडण्यांत आलीं, 'आज सत्याग्रहींनी पोलिसाना शिवीगाळ केली' 'आज लोक त्याना मारण्यास धावले' ' हा सत्याग्रह चवदा दिवस चालणार आहे,' ' प्रसंग मोठा भयंकर आहे' इत्यादि प्रकारच्या विकृत स्वरूपातील बातम्या पाठविण्यांत येत होत्या, आणि अधिक बलाने वरिष्ठ अधिकाऱ्यानी यावलीस येऊन बंदोबस्त न केल्यास चळवळीचा भडका फार मोठ्या प्रमाणावर झाल्याखेरीज राहणार नाही असें हि सुचविण्यात आलें

यावलींतील घटनाचीं अतिरंजित वर्णनें दररोजच्या दररोज ऐकून व वाचून वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यानी आपल्या दलबलासहित यावलीवर आक्रमण करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें माहोली पोलीस ठाण्यावर कळविण्यात आलें. सत्याग्रहींना केवळ अटक करून अधिकाऱ्यांचं समाधान होईना त्याच्या ठिकाणीं गावकरी लोकाना खासी दहशत बसविण्याची आसुरी लालसा उत्पन्न झाली. यावलीचें निमित्त करून आसपासच्या गावावरहि त्यांना आपला दरारा बसवा-

वयाचा होता त्यावेळीं यशवत आकाजी हा यावलीचा कामकर्ता पाटील होता १९२० सालचें रंगराव बाळाजी पाटलाच उदाहरण पाहून सरकारने यशवत आकाजीला आपल्या अगदी मुठींत धरून ठेवला होता जिल्हा पोलीस अधिकारी नेल्सन हा मोठें पोलीस दल घेऊन यावलीवर चालून येणार आहे ही बातमी कळतांच यशवत आकाजी पाटलाने आपल्या नीच कारवाया सुरू केल्या स यायाग्रहांत सामील न झालेल्या निरपराध गांवकरी लोकांना तो छळू लागला आणि पोलीसला मी तुमचें नाव सागणार नाहीं 'तुमचा बचाव करीन' असें सांगून पैसे उकळू लागला ज्यानी अशा रीतीने लाच देण्याचें नाकारलें ते सर्व लोक सत्याग्रहात सामील होते असा कांगावा करण्यास प्रारंभ केला सत्याग्रहाच्या पाचव्या व सहाव्या दिवशीं डिस्ट्रिक्ट सुपरिन्टेन्डेन्ट ऑफ पोलीस मि० नेल्सन् हा परिस्थिति स्वत अवलोकन करण्याच्या हेतूने यावलीस आला आपल्या केवळ उपस्थितीनेहि गावचे लोक घाबरून जातील अशी त्याची अपेक्षा असावी परतु तसें काहीच घडलें नाही नित्याप्रमाणें सत्याग्रह झालाच गावकऱ्यांचा प्रचड समुदाय उपस्थित होता प्रामस्थाच सख्याबल पाहिल्यावर नेल्सन् महाशय मनात चरकले त्यानी गनिमी काव्याचा आश्रय केला त्यानी तसेंच गावाच्या सीमेवरून पाठीस पाय लावला

दुसरे दिवशीं जिल्हा पोलिस अधिकारी नेल्सन् हा एक सार्जंट व पन्नास लाठीबद शिपायाची एक तुकडी घेऊन पुन यावलीवर चाल करून आला तो स्वत व सार्जंट हे दोघेहि भरलेलीं पिस्तुलें घेऊन घोड्यावर स्वार झाले होते हें सर्व आक्रमणकारी दल गावावर चालून आलें त्यावेळीं पुन सत्याग्रह चालूच होता समस्त गांवकरी प्रेक्षक म्हणून हजर होते. त्यांचा जमाव पाहिल्यावर नेल्सन साहेबाची त्यांच्यावर चाल करून जाण्याची हिंमत झाली नाही त आपल्या दलबलासहित एका जवळच्या नाल्यात लपून बसले

ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें सत्याग्रह आटोपला. सत्याग्रही व गावकरी लोक आपापल्या घरीं परतले जेवणखावणें आटोपून त्यानतर गावातील बहुतेक लोक आपापल्या शेतावर कामें करण्यास निघून गेले

सत्याग्रहींचीं योजनें आटोपल्यावर त्यानीं नित्याप्रमाणें कापून व तोडून आणलेल्या लाकडाचा लिलाव गावचावडीत सुरू केला थोडेसे लोक बोली बोलण्यास जमले होते

दोन्ही डोळ्यानी आंधळा वीर नामदेवराव मराठा भाषण करून सत्याग्रहाचीं पवित्र लाकडें खरेदी करण्याविषयी लोकाना सांगत होता. गावातील बहुसंख्य लोक शेतावर निघून गेले आहेत, अवघीं पांच पंचवीस माणसेंच गांधी चौकात जमा झालीं आहेत आणि आंधळा नामदेवराव भाषण करीत आहे, तेव्हा ही परिस्थिति गावावर हल्ला करण्यास अनुकूल आहे असें कामकर्ता पाटील यशवंत आकाजी याने पोलीस अधिकारी मि० नेल्सन् यास कळविलें. ही माहिती कळताच आपले सर्व दल बरोबर घेऊन व कवायती पद्धतीने त्याना चालून नेल्सन् नाल्यांतून लपलेल्या ठिकाणातून बाहेर पडला व त्यानें यावलीवर छापा घातला वाटेंत गुढ्या तोरणें व तिरंगी झेंडे लागलेले होते ते सर्व उध्वस्त करण्यांत आले पोलीस दल मोठ्या प्रमाणात चालून आलें आहे हें पाहून लोक जरा चपापले पण तेथेच बसून राहिले त्याच्यावर लाठीमार करून त्याना पळवून लावण्यात आलें. आंधळा नामदेवराव मराठा भाषण करीतच होता समोर चाललेला प्रकार त्याला काहीच दिसत नव्हता, अथवा कळत नव्हता. त्याचें भाषण चालूच आहे असें पाहून नेल्सन्‌च्या रागाचा पारा मस्तकात शिरला व घोड्यावरून उतरून त्याने त्या कॉंग्रेसभक्त आंधळ्याच्या छातीवर हातातील वेताचा प्रहार केला. अनपेक्षित प्रहार झाल्याबरोबर अंध नामदेवराव थोडा डगमगला. परंतु लगेच सावरून गर्जून म्हणाला—" मी भाषण करीत असताना कोण वेत मारतो आहे? भाषण चालू असताना ही मजाक काय कामाची!" त्याचें तें बोलणें ऐकून नेल्सन् साहेबाचा पराक्रम फुरफुरून आला व त्यांनी आंधळ्या नामदेवरावला वेताने झोडण्यास प्रारंभ केला. मार लागून आंधळा कोलमडून जमिनीवर कोसळला

याप्रमाणें गांधी चौकात आंधळ्यावर आपल्या शौर्याचे प्रदर्शन करून नंतर नेल्सन् व त्याचें पोलीसदल यानी पळू लागलेल्या लोकाचा पाटलाग करण्यास प्रारंभ केला लोक दारें लावून आत बसले. दरवाजे फोडफोडून व घरात घुसून घुसून लोकाना बेदम चोपण्यात आलें व जो जो सापडेल त्याला पकडून शाळेंत बंद करून ठेवण्यांत येऊ लागले ज्यांच्या ज्याच्या घरात बामलीचें लांकूड दिसेल तो सत्याग्रहास साहाय्यक असलाच पाहिजे असें समजून चोपण्यांत आलें व पकडून शाळेंत बंद करण्यात आले सुर्याजी पिसा-

त्याचा अवतार बनलेल्या यशवंत आकाजी पाटलाने आपल्या नीचपणाची पराकाष्ठा केली. ज्यांनी त्याला लांच देण्याचें नाकारलें त्या प्रत्येकाचें घर त्यांनी दाखवून दिलें. त्यांच्या घरची मालमत्ता लुटण्यात आली १९२१ सालीं देशभक्तीसाठी सरकारी रोपाची कुन्हाड स्वतःवर ओढवून घेऊनहि काँग्रेसचें बीजारोपण करणारा देशभक्त व शूर रंगराव बालाजी पाटील कोणीकडे! आणि आपल्या स्वार्थासाठी १९३० सालीं आपल्याच ग्रामबंधूंची गर्दन शत्रूच्या हातीं देण्यास तयार झालेला व त्यांच्या जळत्या चितेवर स्वतःची रोटी भाजून घेणारा नराधम यशवंत आकाजी पाटील कोणीकडे!! एकाच ठिकाणच्या ह्या दोन पाटलांचें चित्र व चरित्र उद्बोधक नाही काय? परंतु यशवंत आकाजीच्या नीचपणाला पायाखाली तुडवून रंगराव बालाजींची संख्याच देशांत वाढत आहे. म्हणूनच देश स्वातंत्र्याच्या मार्गावर अधिकाधिक प्रगति करीत आहे!!!

या हल्ल्याच्या वेळीं नेल्सन साहेब व त्यांचे शिपाई आणि यशवंत आकाजीसारखे त्याचे हस्तक यांच्या अंगात इतका सैतान संचरला होता की, त्यांनी लहान मुलें व स्त्रिया यांच्याहि अंगावर हात टाकण्यास कमी केलें नाही. बायामुलांसह सुमारें दोनशें लोकांना जनावराप्रमाणें कोंडण्यांत आलें. याप्रमाणें बाया व मुलें यांच्यावर अचाट पराक्रम गाजून पोलीस अधिकारी व शिपाई थकले. त्यांना भूक लागली. गावी चौकांत पहिल्या दिवसांच्या सत्याग्रहाचे पुढारी वीर लक्ष्मणराव पाचघरे यांचें किराणा मालाचें दुकान होतें. लक्ष्मणराव यांना पहिल्या दिवशींच अटक झाली होती. त्यानी सत्याग्रहाची आग यावलीस पेटविली होती त्यांच्या कर्तृत्वाने अधिकाऱ्यांची मनें जळूं लागलीं होतीं म्हणून त्यांचें दुकान लुटून फस्त करण्यात आलें. सुमारें तीन हजार रुपये किंमतीच्या मालाची लूट करण्यात आली. खाववेल तेवढा माल सैतानांनी तेथेच खाल्ला. बाकीच्या मालाने त्यानी आपले खिसे भरले. कापड, किराणा इत्यादि मालाच्या गठड्याच्या गठड्या बांधण्यात आल्या. ही सर्व लूट त्यांनी आपल्याबरोबर नेली लुटीने आपली सुडाची पोटातली आग शांत केल्यावर ही टोळधाड शाळेंत बंद करून ठेवण्यात आलेल्या लोकांच्याकडे वळली ज्यांच्या डोक्यावर गांधी टोप्या होत्या त्यांना पुनः मारण्यांत आलें. गांधी टोप्या फाडून व जाळून टाकण्यांत आल्या.

एवढ्याने शूर पोलीसाचें समाधान झालें नाही त्यानी शाळेत यदीत असलेल्या त्या असहाय लोकाना 'ब्रिटिश सरकारकी जय' व गांधी मुर्दाबाद' अशा घोषणा करण्यास सांगितलें लोकानी इनकार केला त्याना पुन बेदम मारण्यात आलें व झेंडा फाडून टाकण्यात आला ब्रिटिश सरकारचा विजय झाला !! शाळेंत बद करून ठेवलल्या काहीं लोकाना कैद करून नेण्यात आल यावलीवर या प्रमाणे अत्याचार करून व आपले बायका व मुलें यांच्यासमोर आपला पराक्रम प्रकट करून जिल्हा पोलीस अधिकारी आपल्या पोलीस दलासह कैद्याना बरोबर घेऊन निघून गेले

कॉंग्रसच्या जिल्हा युद्धमडळाच्या कचेरींत यावलीच्या अत्याचाराची बातमी पोहोचली तावडतोब कॉंग्रेसचें शुश्रूषापथक यावलीच्या मदतीस धावून आलें जखमी लोकांना मलमपट्ट्या करण्यांत आल्या अधिक गभीर जखमा झालेल्या लोकांना अमरावती इस्पितळांत आणण्यात आलें

त्यावेळचे अमरावती जिल्हा कॉंग्रेस कमेटीचे मंत्रि आचार्य त्र्य ग जोशी यनी १९३१ साली तुरुगातून सुटल्यावर ' अमरावती जिल्ह्यातील सत्याग्रहाचा त्रोटक इतिहास " पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला पुढे सरकारनें हें पुस्तक जप्त केलें त्यात यावलीच्या सत्याग्रहाविषयी जो गौरवपर परिच्छेद पृष्ठ २३ वर आला आहे तो खाली देण्यात येत आहे —

यावली जगल सत्याग्रह—" ता ८ आगस्ट रोजीं यावली येथ हुतात्मा लक्ष्मणराव पाचघरे याचे नेतृत्वाखाली १३ स्वयसेवकानी सत्याग्रह केला त्यापैकी नेत्यासुद्धा ६ स्वयसेवकाना अटक करण्यात आली लक्ष्मणराव पाचघरे यांना ९॥ महिने शिक्षा व बाकी या पाचजणास ६।६ महिने शिक्षा झाली तारीख ९ रोजी आनंदराव सोनाजी वानखडे यांच्या नेतृत्वाखाली स्वयसेवकानी सत्याग्रह केला अटक कायास करण्यात आली नाही ता १० रोजी याच तुकडीने पुन सत्याग्रह केला अटक कोणासच झाली नाही ता ११ रोजी सकाळीं काशीराव पुजाजी पाटील याचे नेतृत्वाखाली कायदेभग करण्यांत आला

' ता० ११ चा सत्याग्रह संपून स्वयंसेवक व प्रेक्षकमडळी मराठी शाळेसमोरील मैदानात जमले व काशीराव पुजाजी याच अध्यक्षतेखाली सभेस

सुरुवात झाली. सभेच्या अगोदर जवळच्या एका आड असलेल्या नाल्यात पोलीस लपून बसलेले होते. सभा चालू असता काही गोरे ऑफिसर, सबइन्स्पेक्टर व सरासरी १०० शिपाई एकदम सभास्थानीं हजर झाले. पोलिसांनी सभेस जमलेल्या लोकांवर एकदम हल्ला केला, त्यावेळीं नामदेव व्यंकटराव मराठा यांचें शांतता राखण्याविषयीं व्याख्यान चालू होतें. इतक्यांत त्याच्या छातीवर लाठीचे दोन तडाखे बसले. त्यामुळे ते खाली कोलमडून पडले. नामदेवरावांचें वय अंदाजें २० वर्षांचें असून ते दोन्ही डोळ्यानी आधळे होते. वरील लाठीचे तडाखे एका गोऱ्या ऑफिसरने मारले व दुसऱ्या ऑफिसरने अध्यक्षास लाठी मारून खाली पाडले बाकीच्या पोलिसांनी प्रेक्षकावर लाठीमार सुरू केला. लाठीमार करण्याचें कारण जमलेल्या लोकास सागण्यात आलें नाही लोक भराभर पळू लागले. तेव्हा त्याचा पाठलाग करून त्याना मार देण्यात आला. काही लोकाना त्याच्या घरात घुसून मारण्यात आले. ता० ११ रोजी सत्याग्रह केलेल्या स्वयंसेवकास यावलीवरून माहोली येथील पोलिस टाण्यात पोहोचविण्यात आलें व तेथे पोलिस ठाण्यात नेताने बेदम मारण्यात आले. दीपचंद माणिकचंद, गणपतराव, मारोती, गोविंद, परशराम, रामा पुंजाजी, गणेशगीर, बाजीराव वगैरे लोकांना एक एक लाथ मारून सोडून देण्यात आलें. वरील मारामारींत सरासरी ४० माणसें जखमी झालीं. त्या सर्वांना मोटारींतून अमरावती कॉंग्रेस हॉस्पिटलमध्यें आणून डा. वाटवे व डॉ. जोशी यानी औषधोपचार सुरू केले. या सर्व प्रकरणाची चौकशी करण्याकरितां जिल्हा कॉंग्रेस कमेटीनें श्री. बाबासाहेब खापर्डे याच्या अध्यक्षतेखालीं एक चौकशी कमेटी नेमली होती. तिचा सविस्तर रिपोर्ट (उदयच्या) ता० २ व ९ सप्टेंबर १९३० च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. या सत्याग्रहात भाग घेण्यापूर्वी यावलीजवळील कापूसतळणीचे पाटील काशिराव पुंजाजी यानी आपल्या पाटीलकीचा राजिनामा दिला होता. परंतु त्याना अजून गांधी इर्विन तहनाम्याप्रमाणें कामावर घेण्यांत आलें नाहीं."

---

## प्रकरण ४ थें

# हुतात्मा लक्ष्मणराव पांचघरे

स्वातन्त्र्य-देवतेच्या चरणीं ज्यानी आपली शिरकमलें समर्पण केलीं अर यावली-या देशभक्ताच्या उज्ज्वल परंपरेंत हुतात्मा लक्ष्मणराव पाचघरे या स्थान फार श्रेष्ठ आहे. १९३० च्या चळवळीचा वन्हि याच तरुण देशभक्ताच प्रयत्नाने यावली येथे कसा भडकला हें आपण मागील प्रकरणीं पाहिलेंच आहे

यावेळीं लक्ष्मणराव पाचघरे यांचें वय २० वर्षांचें होतें त्याचा स्वभा मोठा तेजस्वी व स्वाभिमानी होता कोणाकडून यत्किंचित् झालेला उपमर्दसु त्यांना सहन होत नसे त्याच्या या करारी व तेजस्वी जीवनाची छाप सहज कोणावरहि पडत असे अन्याय-मग तो कोणावरहि झालेला असो—पाहिल की, त्याची त्याना भयकर चीड येई व परिणामाची मुळीच पर्वा करता ते त्याच्या प्रतिकारास धावून जात अशा या तेजस्वी व स्वाभिमान तरुण देशभक्ताला त्याच्या सत्याग्रही साथीदारासह जेव्हा पकडून नेलें, तेव्ह पदोपदीं नि. सरकारच्या अधिकाऱ्याकडून होत असलेले अन्याय त्याल दिसू लागले

लक्ष्मणराव यांचेवर तावडतोब खटला भरण्यांत आला व त्यांना १। महिन्याच्या सक्त मजुरीची शिक्षा सुनावण्यात येऊन अमरावतीच्या तुरुगांत ब वर्गात ठेवण्यात आलें

पोलिस काय किंवा तुरुगाधिकारी काय, बहुतेक सर्व अधिकारी हिंदी अस ताना त्यानी आपल्याच देशबांधवाना कष्ट द्यावेत, त्यांच्यावर अन्याया करावेत आणि फक्त आपल्या पोटाची खळगी भरण्यासाठीं परकी सत्तेचे गुलाम बनून कोणताहि अन्याय करण्यास प्रवृत्त व्हावें, याची लक्ष्मणरावांना तुरुगात्य जीवनात भयकर चीड येऊ लागली. गांधीजींच्या उपदेशास अनुसरून आपल्य

त्ताची शांति सांभाळण्याचा त्यांनी कसोशीने प्रयत्न केला, परंतु केवळ पोटा-
ठी मनुष्य नीतिमत्तेचा खून करण्यास व आपल्या आत्म्याचाहि विक्रय कर
ग्रम का तयार होतो, हें कोडें त्यांना भंडावून सोडूं लागलें

त्याच्या या सहनशीलतेचाहि अंत पाहणारा असाच एक प्रसंग ते
रुंगात असताना घडला. लक्ष्मणराव आपल्या बराकीच्या आवारात चक्करला
ागून असलेल्या लोखंडी कुंपणापाशी उभे होते. चक्कर ऑफिसर एका राज
ीय कैद्याला शिवीगाळ करीत होता. लक्ष्मणरावांनी तें पाहिलें आणि त्याचें
ाभिमान हारपलें. त्याचा कावू सुटला. ते दरवाजांतून चक्करमध्यें मुसंडी मारू
ागले. दरवाजाला लठ्ठ कुलूप लागलेले होतें आणि पहारेकरी तर कुलूप उघडून
यांना चक्करमध्यें जाऊं देईना त्यासरशी एका घडाक्यात पुरुषभर उंचीच्या
ोखंडी कुंपणावरून त्यांनी चक्करमध्यें उडी मारली आणि चक्कर आफिसरच्या
याने केलेल्या अन्यायाबद्दल सडकून हजेरी घेतली. जो राजकीय कैदी चक्कर
ॉफिसरची शिवीगाळ मुकाट्याने ऐकून घेत होता, त्यालाहि त्यांनी दोन गोष्टी
कविल्या आणि त्याच्या नामर्दपणाची व स्वाभिमानशून्यतेची तशीच घोर
ंदा केली. तेजस्वितेची ही आकस्मिक चमक पाहून, चक्कर ऑफिसर
ानेळीं तर चूप बसला, परंतु मागाहून त्याने लक्ष्मणरावांना गुन्हाखान्यात
हणजे अंधारकोठडींत नेऊन कोंडलें

हा मनुष्य आपल्या तेजस्वी वागणुकीने सर्व तुरुंगाचें वातावरण बदलून
ाकील, आपला दरारा नाहीसा होईल, सरकारी शिस्त कोणी पाळणार नाही
आणि परिणामीं आपलीच बदनामी होईल, हें जाणून त्या चक्कर ऑफिसरने
आपल्या नेहमीच्या पद्धतीने लक्ष्मणरावांना पिचून टाकण्याचें ठरविलें तो
त्याचा देह मारूं इच्छित नसला, तरी आत्म्यास मारूं इच्छित होता. कष्टाने
गांजून, संत्रस्त होऊन दीनपणें लक्ष्मणरावांनी शरण यावें अशी त्याची इच्छा
असली पाहिजे, पण लक्ष्मणरावांची मूर्ति कच्च्या धातूची बनलेली नव्हती.
त्यांचा स्वाभिमान सहज छिन्नभिन्न होण्याइतका लेचापेचा नव्हता त्यांनी एक
शब्दहि न बोलता अथवा कृतकर्माचा यत्किंचितहि विषाद न मानता अंधार-
कोठडींतील यातना सहन केल्या भारी चक्कीवर दळणाचें काम या अंधार

## या दोघांनाहि गोळ्या लागल्या



१ ताराबाई न्हावीन

२ उद्धव ढोक

ताची शांति सांभाळण्याचा त्यांनी कसोशीने प्रयत्न केला, परंतु केवळ पोटा-ठीं मनुष्य नीतिमत्तेचा खून करण्यास व आपल्या आत्म्याचाहि विक्रय करण्यास का तयार होतो, हें कोडें त्यांना भडावून सोडू लागलें

त्यांच्या या सहनशीलतेचाहि अंत पाहणारा असाच एक प्रसंग ते रुगात असतांना घडला लक्ष्मणराव आपल्या बराकीच्या आवारात चक्करला लागून असलेल्या लोखंडी कुंपणापाशीं उभे होते चक्कर ऑफिसर एका राजकीय कैद्याला शिवीगाळ करीत होता लक्ष्मणरावांनी तें पाहिलें आणि त्यांचें देहभान हारपलें त्यांचा कानू सुटला ते दरवाजातून चक्करमध्यें मुसंडी मारू लागले. दरवाजाला लट्ठ कुलूप लागलेलें होतें आणि पहारेकरी तर कुलूप उघडून त्यांना चक्करमध्ये जाऊ देईना त्यासरशी एका महावेगात पुरुषभर उंचीच्या लोखंडी कुंपणावरून त्यांनी चक्करमध्ये उडी मारली आणि चक्कर ऑफिसरची त्याने केलेल्या अन्यायाबद्दल खडसून हजेरी घेतली जो राजकीय कैदा चक्कर ऑफिसरची शिवीगाळ मुकाट्याने ऐकून घेत होता, त्यालाहि त्यांनी दोन गोष्टी ऐकविल्या आणि त्याच्या नामर्दपणाची व स्वाभिमानशून्यतेची तशीच घोर निंदा केली. तेजस्वितेची ही आकस्मिक चमक पाहून, चक्कर ऑफिसर त्यावेळीं तर चूप बसला, परंतु मागाहून त्याने लक्ष्मणरावांना गुन्हाखान्यात टाकणे अंधारकोठडीत नेऊन कोंडलें

हा मनुष्य आपल्या तेजस्वी वागणुकीने सर्व तुरुंगाचें वातावरण बदलून टाकील, आपला दरारा नाहीसा होईल, सरकारी शिस्त कोणी पाळणार नाही आणि परिणामीं आपलीच बदनामी होईल, हें जाणून त्या चक्कर ऑफिसरने आपल्या नेहमीच्या पद्धतीने लक्ष्मणरावांना पिचून टाकण्याचें ठरविलें तो त्याचा देह मारू इच्छित नसला, तरी आत्म्यास मारू इच्छित होता कष्टने गांजून, संत्रस्त होऊन दीनपणें लक्ष्मणरावांनी शरण यावें अशी त्याची इच्छा असली पाहिजे पण लक्ष्मणरावांची मूर्ति कच्च्या धातूची बनलेली नव्हती त्यांचा स्वाभिमान सहज छिन्नभिन्न होण्याइतका लेचापेचा नव्हता त्यांनी एक शब्दहि न बोलता अथवा कृतकर्माचा यत्किंचितहि विषाद न मानता अंधार कोठडींतील यातना सहन केल्या भारी चक्कीवर दळणाचें काम त्या अंधार

कोठडींत त्याना नेमून देण्यात आलें दररोजचें काम त्यानी दररोज पूर्ण करावें. त्यानी कधी काम पडूं दिलें नाही, अथवा काम कमी करण्याची याचनाहि केली नाही.

परंतु त्याना देण्यात आलेलें कामच इतकें भारी व कष्टाचें होतें की, त्याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर झाल्याविना राहिला नाही. कदर्न्नें कदान्न भक्षण, अंधारकोठडींतून हवा व प्रकाश याशिवाय चाललेलें जीवन, अनारोग्य-कारक परिस्थिति, आणि त्यात चक्की दळण्यासारखें भारी काम या सर्वांच्या समुच्चयाने त्यांची प्रकृति सपाट्यानें ढासळली. चक्की दळून दळून त्याची छाती फाटू लागली छातींत वेदना होऊं लागल्या. असह्य अशा कळा निघू लागल्या. अशाहि स्थितींत ते आपलें रोजचें काम पुरें करीत. परंतु त्यांचें दुखणें विकोपास चाललें आहे हें पाहून त्यांना इस्पितळात नेण्यात आलें

त्रि० तुरुंगाचा—विशेषतः हिंदुस्थानातील तुरुंगाचा—असा एक कायदा आहे की, कोणतीहि गोष्ट विकोपास गेल्याशिवाय तुरुंगाधिकारी तिची दादच घेत नाहीत. पुष्कळदा योग्य वेळीं दाद न घेतल्यामुळे गोष्टी इतक्या विकोपास जातात की, नंतर त्या सुधारणें अशक्यप्राय होऊन बसतें. गोष्ट विकोपास गेल्याशिवाय तिची दाद न घेण्याच्या संवयीमुळे तुरुंगांतील व्यवस्थेने कितीएक लोकाना जन्माचे जायबंदी करून टाकलें, कितीतरी लोकांच्या प्रकृति कायमच्या ढासळल्या, आणि कित्येकाचें तर तुरुंगाच्या आतच बलिदान घडलें

लक्ष्मणराव पाचघरे यांच्या बाबतींतहि असेंच घडलें. त्याना जेव्हा इस्पितळात आणण्यात आलें, तेव्हा त्यांची प्रकृति सुधारण्याच्या मर्यादेच्या पलीकडे ढासळली असल्याचें आढळून आलें. मोजून चार दिवससुद्धा इस्पि-तळांत त्याना काढावे लागले नाहीत. तिसऱ्या दिवशींच त्यांचें देहावसान झालें. *यावलीच्या पहिल्या शहीदाचें रक्त अशा रीतीने तुरुंगात सांडलें त्या रक्ताच्या थेंबाथेंबातून पुढे तुरुंगात झालेले अनेक तेजस्वी लढे निर्माण झाले.* लक्ष्मणरावचा बळी उमरावतीच्या तुरुंगांत गेला नसता, तर येथील तुरुंग जीवनात पुढे जी सुधारणा झाली ती कितपत झाली असती याची शंकाच आहे.

लक्ष्मणरावाचा मृत्यु हा मृत्यु नव्हता. मूर्ख व हृदयशून्य चक्कर ऑफिसर व तुरुगाची बनावटी, कठोर शिस्त, यानी त्याचा पद्धतशीर खून पाडला होता. चक्कर ऑफिसरसमोर त्यानी आपली मान वांकविण्याचें नाकारलें, व त्याने केलेल्या अन्यायाचा त्यानी तोंडावर निषेध केला या अपराधाचें तें प्रायश्चित होतें. त्यानी आपल्या आत्म्याचें रक्षण केलें, पण त्यासाठी त्याना आपल्या देहाचा बळी द्यावा लागला.

लक्ष्मणरावच्या मृत्यूची बातमी हा हा म्हणता तुरुगभर पसरली. जिकडून तिकडून सत्याग्रहींचे जत्थे त्याच्या त्या पावन शरीरापाशी जमा झाले. त्याच्या जिवंतपणीं जीं लोखडी कुलुपें उघडण्याचें पहारेकरी लोकानी झिडकारलें होतें, तीं आता त्यांच्या मृत्यूमुळे आपोआप खुली झालीं तुरुगाधिकारी थगून गेले. खाली माना घालून अपराधी मुद्रेने लक्ष्मणरावाच्या शवाचा होत असलेला सत्कार ते पहात राहिले, त्यांचें अपराधी मन तिकडे त्यांना ओरडून सांगत होतें कीं 'तुम्ही या देशभक्ताचा खून केलात ! तुम्ही या निरपराध देशभक्ताचा बळी घेतलात !! तुम्ही भेकड आहात, खुनी आहात'!!! आणि इकडे तुरुगातील सत्याग्रही लक्ष्मणरावच्या त्या मृतदेहावर पुष्पहार चढवीत होते, त्याची पूजा करीत होते, पुष्प शय्येवर त्याला निजवीत होते !!!

हां हा म्हणता या बलिदानाची हकीगत अमरावती शहरात समजली. अमरावती जि० कां० कमेटीने तुरुगाधिकाऱ्याकडे त्याच्या शवाची मागणी केली मुकाट्याने खाली माना घालून त्यांनी प्रेत बाहेरील काँग्रेस कार्यकर्त्यांच्या स्वाधीन केलें. प्रचड प्रेतयात्रा निघाली. हजारों हिंदुमुसलमानानी प्रेताला खांदा दिला. लक्ष्मणरावांच्या जयजयकाराने नभोमडल दुमदुमून गेलें, तर लोकानी— स्त्रीपुरुष नागरिकानी गाळलेल्या अश्रूंच्या पुरामुळे अमरावतीची भूमि भिजून ओली चिंब झाली

अमरावती जिल्हा काँ कमेटीने प्रसिद्ध केलेल्या १९३० सालच्या सत्याग्रहाच्या पूर्वोक्त इतिहास पुस्तिकेंत (पृष्ठ १३) हुतात्मे लक्ष्मणराव पांचघरे याना पुढीलप्रमाणे श्रद्धांजलि अर्पण करण्यात आली आहे

' अमरावती तुरुगातील अधिक ऱ्यांच्या निर्दय वर्तनामुळे यावली काँ कमेटीचे चिटणीस दे० भ० लक्ष्मणराव पाचघरे याना तुरुगातील हालअपेष्टा सहन न होऊन ताप आला. त्यातच ता० १२ ऑक्टोबर रोजीं तुरुगातच त्याचा अंत झाला. त्याचें शव मोठ्या शिकस्तीने तुरुगाच्या अधिकाऱ्याकडून लक्ष्मणराव पाचघरे यांच्या आप्तानी ताब्यात घेतलें त्या शवाची अमरावती शहरात प्रचड मिरवणूक काढण्यात आली. मृतात्म्यास हजारों स्त्री पुरुषानी प्रणाम करून, सर्वांनी आपली भक्ति व्यक्त केली. जाहीर सभेत त्याच्या गुणवर्णनपर भाषणें होऊन त्याचें शव यावली मुक्कामीं पोहोचविण्यात आलें. अमरावती जिल्ह्यातील सत्याग्रही वारांपैकीं पचप्राणाचें बलिदान करणारा हा वीर कोणाचेहि स्मृतींतून दूर होणार नाही "

प्रेतयानेच—मिरवणुकीचें पर्यवसान जाहीर सभेत झालें. जिवतपणीं मिळाला नसेल एवढा बहुमान लक्ष्मणराव याना मृत्यूनंतर मिळाला, त्याच्या शवावर पुष्पहाराचे ढीग पडले शवाची छायाचित्रें घेण्यात आलीं त्याच्या गुणवर्णनपर भाषणें होऊन त्याना श्रद्धाजलि अर्पण करण्यात आला.

## यावली येथील दहनसंस्कार

याप्रमाणे अमरावती येथील समारभ आटोपल्यावर शव आप्ताबरोबर यावलीस रवाना करण्यात आलें लक्ष्मणरावाच्या तुरुगातील निर्घृण मृत्यूची बातमी एकताच त्याऱ्या घरीं एकच आकात माजला. अमरावतीहून शव येण्याची ग्रामस्थ लोक तटस्थ वाट पहात बसले. कोणी भोजन नेलें नाहीं, कोणी कामावर गेला नाही यावलीस प्रेत पोहोंचल्यावर पुन: संस्कार करण्यात आले स्मशानयात्रा निघाली विधिपूर्वक अग्नि देण्यात आला त्यावेळीं लक्ष्मणरावाऱ्या मातेने जो आकात केला, त्याच कोण वर्णन करू शकणार ! आपल्या पुत्राबरोबर आपणहि स्वर्गारोहण करावें, या भावनेनें ती माऊली वारवार चितेला कवटाळण्याचा प्रयत्न करू लागली

१२ अक्टोबर १९३० ही तारीख यावलीच्या इतिहासात चिरस्मरणीय राहील लक्ष्मणराव पाचघरे याच्या दिव्य हौतात्म्याने यावलीच्या राष्ट्रीय

जीवनांत नवीन प्राणसंचार झाला. त्यामुळे यावलीच्या हृदयात कधीहि न विझणारी अशी क्रांतीची ज्योत भडकली. या ज्योतीचा १९४२ च्या आंदोलनात जो दिव्य प्रकाश सर्वत्र पसरला त्यामुळेच यावलीचा इतिहास सार्थ झाला. यावलीच्या स्मशानांत, लक्ष्मणरावाच्या चितेतून उगवणाऱ्या दुर्वांकुरानी पूजित झालेली क्रांतीचा महादेवता, जागृत झाली. आणि तिने १९४२ सालीं साक्षात् रणचंडी बनून यावलीचा चैतन्यमय संग्राम ग्रामीणांच्या हातून घडवून आणला.

ग्रामीण जनतेतून ज्या ज्या प्रमाणात स्वातंत्र्य—आंदोलनाचें बीज रोवलें जाईल, त्या त्या प्रमाणातच स्वराज्याचा महावृक्ष वाढू लागेल हें उघड आहे. अशा ग्रामीण स्वातंत्र्य-समरातच यावलीचा समर महत्वाचा आहे. खेड्यांतील शेतकरी एक वेळ आपल्या निढळीचा घाम गाळून आपल्या उपजीविकेचा प्रश्न सोडवीत असे. आता तो आपले बहुमोल रक्तसिंचन करून, स्वातंत्र्याचा प्रश्न सोडविण्यास तयार झालेला आहे. दैन्य, दारिद्र्य, पारतंत्र्य, जुलुम व जबरदस्ती यान्यामुळे एकेकाळीं तो केवळ अश्रुमोचन करीत असे, आतां असहाय अश्रूंच्या ऐवजीं मर्दपणानें रक्ताचे पाट वाहवून तो प्रतिकारास सज्ज होऊं लागला आहे आणि लक्ष्मणराव पांचघरे यांच्यासारख्या हुतात्म्यांच्या बलिदानामुळे त्याच्या प्रतिकारक्षमतेला अधिक तेजस्वी अशी धार चढू लागली आहे; हें यावलीनें १९३० सालीं दाखवून दिलें. आणि त्याचें अत्यंत विकसित व भडकदार असें रुद्र रूप १९४२ सालीं प्रकट झालें

प्रकरण ५ वें

# क्रांतिपूर्व काळ

१९३० च्या आंदोलनाची परिसमाप्ति गांधीइर्विन करारनाम्यांत झाली. " या करारनाम्याच्या रूपाने, ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानांतील आपलें साम्राज्य गांधीजवळ गहाण टाकलें आहे व आता तें परत मिळण्याची आशा नाही " असे उद्गार ब्रिटनमधील हुजूर पक्षाचा गणग पुढारी चर्चिल याने त्यावेळीं काढले होते. गांधीइर्विन तहनामा हा कॉंग्रेसने ब्रिटिश सरकारवर मिळविलेला मोठाच विजय होता. नव्हे, या विजयाची ब्रिटिश सरकारच्या मुखाने मिळालेली ती मान्यता होती. या विजयामुळे हिंदी जनतेला अवर्णनीय स्फुरण चढलें. ब्रिटिश सरकारने पहिली गोलमेज परिषद रद्द करून, दुसरी गोलमेज परिषद लंडन येथें बोलाविली तिला हिंदी राष्ट्राच्या वतीने एकमात्र प्रतिनिधी म्हणून कॉंग्रेसने म० गांधींची निवड केली. बरोबरीच्या नात्याने गांधी व ब्रि० सम्राट यांची भेट झाली. कॉंग्रेसचा हा बोलबाला कट्टर साम्राज्यवादी ब्रिटिशांना व हिंदुस्थानांतील दुर्रम्य गोऱ्या नोकरशाहीला सहन होणें शक्य नव्हतें. त्यांनी आपसांत कारस्थान रचलें आणि म० गांधी लंडनहून गोलमेज परिषदेंतून परत येण्याच्या आंत हिंदुस्थानात पं० जवाहरलाल नेहरूंना अटक करून कॉंग्रेसला युद्धाचें आव्हान दिलें. परिस्थिति बिकट होती जनता १९३० च्या संग्रामानंतर थकली होती आणि त्यात मिळालेल्या विजयामुळे सावधहि नव्हती. अनन्यगतिक होऊन कॉंग्रेसने आव्हान स्वीकारलें. सरकारचा आघात खाली मान घालून सहन करणें शक्य नव्हतें.

सरकारी दमनशाहीचें चक्र सुरू झालें. कॉंग्रेसचे पुढारी व अनुयायी तुरुंगांत दडपण्यात आले. पश्चात् हरिजनांबद्दल ब्रि० सरकारचा अवार्ड प्रसिद्ध झाला तो रद्द करून घेण्यासाठी म० गांधींनी तुरुंगातच प्राणांतिक उपोषणाचें प्रायोपवेशन केलें. ब्रि० सरकार दबलें. अवार्ड रद्द झाला. पुनः एक महत्त्वपूर्ण विजय मिळाला. हळूहळू सर्वच पुढारी सुटले आणि गांधीजींनी

मोठ्या खुबीने चळवळीची गाडी हरिजन कार्याच्या रुळावर ढकलून दिली. देशव्यापी हरिजन-दौरा करून सर्व देशाचें व कार्यकर्त्यांचें लक्ष त्यांनी हरिजनोद्धाराच्या कार्याकडे वेधून घेतलें.

१९३४ साल उजाडलें जॉइंट पार्लमेंटरी कमेटीच्या रिपोर्टाकडे सर्वांचें लक्ष लागलें. १९३५ सालीं रिपोर्ट प्रसिद्ध झाला. १९३६, १९३७ मध्यें नवीन घटनेप्रमाणे हिंदुस्थानात निवडणुकी होणार हें निश्चित झालें निवडणुकी आल्या. त्याच्या निमित्तानें प्रचंड धामधूम सुरू झाली. काँग्रेसने निवडणुकी लढविण्याचें ठरविलें. काँग्रेसचा आबालवृद्ध कार्यकर्ता काँग्रेसच्या विजयासाठी झटू लागला. अकरापैकी सहा प्रांतात काँग्रेस दणदणीत विजय मिळवून निघून आली १९३२ च्या घोर दडपशाहीनंतरही देश व जनता काँग्रेसच्याच मागे आहे हें निर्विवाद सिद्ध झालें. दडपशाहीचा वार फुसका ठरला. अवघ्या तीन वर्षांत—१९३० तें ३२—दडपशाहीच्या दोन दोन अग्निकुंडांतून भाजून निघालेलें जनतेचें काँग्रेसभक्तीचें सोनें बावन्नकशी ठरलें. प्रथम सहा प्रांतांत व नंतर सरहद्द व आसाम प्रांतांत मिळून अकरापैकीं एकूण आठ प्रांतात काँग्रेसची राजवट सुरु झाली लोक, जनता, शेतकरी, कामगार, व्यापारी सर्वच मोठ्या आनेने व उत्साहाने काँग्रेसचा हा, राज्ययंत्र हातीं घेऊन राबविण्याचा, प्रयोग पाहू लागले

अकस्मात् जागतिक परिस्थितींत वादळाचे मेघ जमं लागले. युरोपांत हिटलरने पोलंडवर आक्रमण केलें. नेहमीप्रमाणे दलित व लहान राष्ट्राच्या मदतीस धावून जाण्याचें ढोंग माजवीत ब्रिटन व फ्रान्स युद्धात पडले. जागतिक महायुद्धाचा वणवा भडकला. १९३९ सालीं सुरू झालेल्या या महायुद्धात हिंदी जनतेच्या मताची कदर न करता ब्रि० सरकारने हिंदुस्थानला आपल्या बाजूने युद्धात खेचलें. हा हिंदी जनतेच्या मताचा उपमर्द सहन न होऊन काँग्रेस मंत्र्यांनी आपापल्या मंत्रिपदाचे राजिनामे दिले. युरोपांतील वादळी मेघाची छाया भारतावरहि पडू लागली.

हिंदी लोकमताचा उपमर्द करून ब्रि. सरकारने हिंदुस्थानला महायुद्धाच्या खाईत तर ढकललेंच, पण त्याशिवाय युद्धसाहाय्याच्या नावाखाली हिंदुस्थानची

पायचे, दररोजच्या परिचयाचे, आपत्काली आपल्या साहाय्यास धावून येणारे स्थानिक पुढारी आपल्याजवळ नाहीत, आणि परिस्थिति तर अधिकाधिक भीषण होत चालली आहे, हें पाहून जनतेचाहि धीर सुटत चालला होता. भावी भीषण संकटाची जाणीव जनता व सरकार या दोघानाहि म० गांधी करून देत होते. 'हरिजना'च्या ओळीओळींतून त्यांचें तुटणारें अंतःकरण अभिव्यक्त होत होतें. पण दोस्तांच्या तर्फे उफाळणारा त्यांची सर्व सदिच्छा धुळीस मिळत होती. उन्मत्त व क्षुद्र ब्रिटिश अधिकारी हा कळकळीचा उपदेश झिडकारून ब्रिटिश साम्राज्याच्या विनाशाचा खड्डा स्वतःच खोदू लागले होते

अखेरीस त्याचा उद्दामपणा त्यांच्याच अंगलट येऊ लागला हिटलरची विजयी समशेर पश्चिम युरोपातील छोटीं मोठीं राष्ट्रें पादाक्रांत करून ब्रिटनवर अग्निवमन करू लागली, जर्मनांच्या वैमानिक हल्ल्यामुळे ब्रिटनमधील सर्व मोठमोठ्या नगरांच्या घराघरांतील विटा खिळखिळ्या झाल्या दूर परदेशांत असलेलें रणक्षेत्र हिटलरच्या वैमानिकांनी युद्ध इंग्लंडच्या भूमीवर नेऊन पोहोंचविलें. इंग्लंडमधील श्रीमंत लोकांच्या बायकामुलें जहाजांत भरून कानडांत पाठविण्यात येऊ लागलीं ब्रि० राजिन्यांतील मौल्यवान् वस्तू व कागदपत्रेंहि कानडांत पाठविण्यात आलीं शाही राजवाड्यावर व पार्लमेंटच्या सभागृहावरहि बॉंबगोळे पडले इंग्लंडच्या जनतेची पायावर धारण बदलल्याचे स्पष्ट दिसू लागले

इकडे १९४१ सालीं अमेरिका व ब्रिटन या दोघांच्याहि विरुद्ध जपानने युद्ध पुकारून मोठीच बिकट परिस्थिति निर्माण केली अवघ्या नऊ महिन्यांच्या अवधीत जपानी सेनेने फिलीपाईन्स, सायमन्स, गाडलकनाल, न्यूगिनी, बोर्निओ, जावा, सुमात्रा, सिंगापूर, मलाया व ब्रह्मदेश, हिंदुचीन इ० प्रदेश पादाक्रांत केले पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे ब्रिटिश, अमेरिकन फ्रेंच, डच व पोर्तुगीज या पाचहि साम्राज्यशाह्या जपानच्या एकेका धडकीबरोबर कोसळल्या आणि जपानी सेना हिंदुस्थानच्या दाराशीं धडका मारू लागल्या.

एका बाजूने ब्रि० नोकरशाहीची हिंदुस्थानांतील उद्दाम जुलुमी राजवट अधिकाधिक असह्य होत चालली होती, जनतेच्या सहनशीलतेच्या मर्यादा सुटत चालल्या होत्या तर दुसऱ्या बाजूने ब्रिटिशांच्या पराभवाच्या व पळून

उडाल्याच्या बातम्या तिच्या कानावर आदळत होत्या. जपानी आक्रमणामुळे ब्रि० साम्राज्यशाही किती दुर्बल-कमकुवत झाली आहे याचा अदाज हिंदी लोकांना लागला होता. एक धडक मारली तर कोसळून पडण्याइतकी ती पोखरून निघाली आहे हे तिला मनोमन कळू लागलें होतें. आणि म्हणूनच क्रांतीसाठी ती अधिकाधिक उतावीळ झाली होती. गांधीजी जनतेच्या मनोवृत्तीची जाणीव ब्रिटिश सरकारला निःसंदिग्ध शब्दात करून देण्याचें कर्तव्य बजावीत होते

तिकडे युरोपांत लेनिनग्रॅड, मास्को, स्टॅलिनग्रॅड आज पडतात की उद्या, अशी स्थिति निर्माण झाली आहे, रशियाचा जर युद्धात पराजय झाला तर आपली मुळीच धडगति राहणार नाही, इकडे जपान हिंदुस्थानच्या दाराशीं धडका मारू लागला आहे, जर्मनीचा विख्यात सेनापती रोमेल अलेक्झंड्रिया-च्या दाराशीं येऊन थडकला आहे, अमेरिका व तिची मदत फारच लांब आहेत, अशी अनन्यगतिक परिस्थिति निर्माण होतांच ब्रि० साम्राज्यकर्त्यांची धुंद खाडकन् उतरली आणि ज्या नग्नफकीराचें तोंडहि पहाण्यास ब्रिटनचे प्रधान-मंत्रि चर्चिल महाशय तयार नव्हते, त्याच महात्मा गांधींची खुषामत करण्यास सर स्टॅफोर्ड् क्रिप्स याना हिंदुस्थानांत पाठविण्यात आलें.

काँग्रेस नेत्यांची तुरुंगांतून सुटका करण्यात आली. वाटाघाटींचा घोळ घालण्यात आला जनतेच्या आशा पल्लवित होऊ लागल्या. राष्ट्रीय सरकार प्रस्थापित करण्याच्या गोष्टी क्रिप्स महाशय बोलू लागले खातेवाटणीच्या गोष्टी करीपर्यंत मजल पोहोंचली. आपल्या आपत्तींचा अंत आतां जवळ येऊन पोहोंचला आहे, स्वातंत्र्याचा सूर्य आतां खरोखरच उदय पावणार आहे असें हिंदी लोकांना वाटू लागलें. हिंदी लोकांच्या समस्त आशा-आकांक्षा दिल्लीस चाललेल्या वाटाघाटींवर केंद्रित झाल्या डोळ्यांत व कानांत प्राण आणून ती वाटाघाटींचे दृश्य पाहू लागली व बोलणीं ऐकू लागली. या पहिल्या क्रिप्स शिष्टाईच्या वेळीं हिंदी जनतेच्या आशा जितक्या पल्लवित झाल्या तितक्या त्या यापूर्वी कधीच झाल्या नव्हत्या, त्यामुळे वाटाघाटी फसल्या तर त्याचे घोर परिणाम होणार हें सर्वांनाच दिसत होतें परंतु, पुन एक वेळ ब्रिटनमधील

प्रतिगामितेने जोर मारला. सर स्टॅफर्ड क्रिप्स यांना तातडीने परत बोलाविण्यात आलें. खानेवाटणीची बोलणीं प्रत्यक्ष सुरू असतांना वाटाघाटी मोडल्याचें जाहीर करण्यात आलें. वाटाघाटींच्या अपयशाचें खापर काँग्रेसच्या डोक्यावर फोडण्यासाठीं साम्राज्यशाही प्रचारतत्रांचें ढोल मोठमोठ्यानें बडविण्यात येऊं लागले.

वाटाघाटी फसल्या. हिंदी जनतेची घोर निराशा झाली. तिची शांति ढळणार हें स्पष्ट दिसूं लागलें. जनतेचा शांतिभग ढळावा यात कांहीच नवल नव्हतें. म० गांधी एवढे शांतीचे महामेरु, पण त्यानाहि आपली शांति कायम ठेवणें जड जाऊं लागलें. वाटाघाटी सरण्यापूर्वीच ते सेवाग्रामला परत आले होते पुढील भीषण दृश्य त्याच्या ज्ञानचक्षूंना स्पष्ट दिसूं लागलें होतें सदिच्छेच्या व कळकळीच्या अंतर्गर्भातून त्यानी ब्रिटिशाना हाक दिली की, "ब्रिटिशानो, हा देशातून निघून जाण्यातच तुमचें अंतिम कल्याण आहे. सत्तात्याग करण्यातच तुमची भलाई आहे" हरिजनमधून त्याची भविष्यदर्शी वाणी बोलू लागला

क्रिप्स-वाटाघाटी विफल झाल्यामुळे जी जनता निराशा-पंकात मग्न होऊं लागली होती, तिला हरिजनमधील गांधी-वाणीने नवजीवन दिलें. पुनः ती मोठ्या आशेने काँग्रेसच्या मार्गदर्शनाकडे पाहूं लागली एप्रिल १९४२ मध्ये क्रिप्स वाटाघाटी झाल्या. त्यानंतर दोन महिन्यान्या आंतच काँग्रेस वर्किंग कमिटीने गांधीजींनी ब्रिटिशाना अनुलक्षून केलेल्या 'चले जाव' (Quit India) च्या घोषणेला मान्यता दिली. १९४२ च्या ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या सप्ताहात अंतिम निर्णयासाठी आल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा बोलाविण्यात आली. दरम्यान मुंबईच्या एका व्याख्यानात सरदार वल्लभभाई पटेल यांनी सिंहनाद केला की, काँग्रेसने जर 'चले जाव' चें आदोलन सुरू केलें तर ब्रि० सरकारला हिंदुस्थानातील एक आठवड्याच्या आत गाशा गुंडाळावा लागेल. विद्युद्वेगाने घटना घडूं लागल्या. कारुण्य व अविश्वासाने ग्रस्त झालेल्या जनतेच्या ठिकाणीं वीर रस सचार करूं लागला. मधून मधून रौद्रहि डोकावू लागला 'चले जाव' ची घोषणा देशभर पसरली. क्रांतीस परिस्थिति पूर्ण शिजून तयार झाली होती. लोकांचा प्रचलित राज्यसंस्थे

याची शंकाच आहे. चर्चिल महाशयांची साम्राज्यविषयक कांही मतें व धोरणें अगदी ठाम ठरलेली होतीं व प्रधानमंत्र्याचा अधिकार हातीं आल्यानंतर त्यांनी त्या मतांचा व धोरणांचा अमल सुरू करावा हेंहि स्वाभाविक होतें. ब्रिटिश पुढाऱ्यांत चर्चिल हे कट्टर साम्राज्यवादी असे गणले गृहस्थ आहेत व म्हणूनच हुजूर पक्ष त्यांना आपला पुढारी मानीत आला आहे हेंहि प्रसिद्धच आहे. तेव्हां, चर्चिल यांची हिंदुस्थानविषयक मतें काय होतीं आणि अधिकारारूढ झाल्यानंतर हीं मतें अंमलांत आणण्याचा प्रयत्न त्यांनी कसा केला हेंहि पाहणें अगत्याचें आहे.

( १ ) महात्मा गांधींना मि० चर्चिल हे ब्रिटिश साम्राज्याचा कट्टर शत्रु मानतात 'नंगा फकीर' या निंदाव्यंजक शब्दानेच ते त्यांचा निर्देश करतात.

( २ ) काँग्रेसच्या मुखानें हिंदी राष्ट्रीयता बोलते असे समजणें म्हणजे थोतांड आहे. मूठभर चळवळ्या लोकांची काँग्रेस ही संस्था असून तिच्या मागे बहुजन समाजाचा मुळीच पाठिंबा नाही, असें आपलें मत मि० चर्चिल यांनी अनेकवेळां बोलून दाखविलें आहे.

( ३ ) अस्पृश्य, मुसलमान, संस्थानिक व बहुजन समाज यांना मि० शासनामुळे अतिशय फायदा झाला आहे आणि ते कांही झालें तरी मि० सरकारची साथ सोडण्यास तयार नाहीत असाहि मि० चर्चिल यांचा दावा आहे.

( ४.) मि० सरकारच्या सांस्कृतिक श्रेष्ठतेचा, हिंदुस्थानचें साम्राज्य हा विजय होय; मि० तरवारींचा न हे; असेंहि चर्चिल यांचें म्हणणें आहे.

( ५ ) मि० सरकारच्या नरम धोरणामुळेच काँग्रेस शेफारली आहे. निश्चयात्मक व कणखर धोरणाचा अवलंब केल्यास काँग्रेस काय किंवा म० गांधी काय, यांचें कंबरडें मोडण्यास व त्यांना नेस्तनाबूद करून टाकण्यास मुळीच विलंब लागणार नाही असें चर्चिल यांनी अनेकदा बोलून दाखविलें आहे.

( ६ ) जालियनवाला बागेंतील गोळीबाराचा मि० चर्चिल यांनी जोरदार निषेध केला होता, आणि जनरल डायर याची घोर निंदा त्यांनी केली

होती. हेंहि या ठिकाणीं ध्यानांत ठेवावयास पाहिजे कारण जी सत्ता गोळीबार करून टिकवावी लागते तिचीं मुळें आधीच उखडलेलीं असतात, असें मि० चर्चिल यांचें मत आहे म्हणूनच हिंदुस्थानांतील ब्रि० सत्तेचें अधिष्ठान बंदुक अथवा तरवार हें नसून सांस्कृतिक वर्चस्व हें आहे असें चर्चिल यांना वाटतें

अधिकारारूढ झाल्यानंतर आपल्या मतानुसार साम्राज्य सरकारचें निश्चित धोरण ठरविणें व त्यादरहुकूम हिंदुस्थानचा कारभार चालविण्याचा प्रयत्न करणें हें चर्चिल यांना अपरिहार्य होतें परंतु ते ज्या मंत्रिमंडळाचे पंतप्रधान बनले होते तें केवळ एकाच्या हुजूरपक्षीय लोकांचेंच मंत्रिमंडळ नव्हतें तर युद्धकालांतील विशेष आवश्यकता म्हणून मजूर, उदार इ० पक्षांतील पुढाऱ्यांना बरोबर घेऊन त्यांना समिश्र मंत्रिमंडळ बनवावें लागलें होतें. या मंत्रिमंडळावर प्रारंभीं त्यांची निरंकुश सत्ता न चालणें स्वाभाविक होतें परंतु युद्धपरिस्थिति जसजशी बिकट होत गेली दोस्तांचे जसजसे पराजयामागून पराजय होत गेले, आणि इतर सर्व गोष्टींपेक्षा युद्ध जिंकण्याची निकड ब्रि० जनतेला जसजशी भासूं लागली तसतशी मंत्रिमंडळावरील मि० चर्चिल यांची पकड अधिक मजबूत होत गेली युद्धप्रयत्नाच्या नांवाखालीं अधिकाधिक निरंकुश अधिकार त्यांना स्वतःच्या हातीं घेतां आले इतुरटूं व्यवहारतः चर्चिल हे ब्रिटनचे हुकूमशहा बनत गेले म्हणून युद्धपरिस्थिति जेव्हां सर्वात बिकट झाली तेव्हांच चर्चिल यांचे हात स्वतःचीं साम्राज्य विषयक धोरणें ठामपणें अमलांत आणण्यासाठीं बळकट झाले. याच कारणासाठीं सुमारें तीन वर्षें त्यांना आपलें धोरण पुरेपणीं हिंदुस्थानांत अमलांत आणतां आलें नाहीं.

प्रधानमंडळांतील आपल्या सहकाऱ्यांच्या व ब्रिटिश जनतेच्या दबावास बळी पडून मि० चर्चिल यांनी सर स्टॅफर्ड क्रिप्स यांना शिष्टाईसाठीं हिंदुस्थानांत पाठविलें खरें; पण हिंदुस्थानांतील ब्रि० नोकरशाहीला हाताशीं धरून शिष्टाई विफल व्हावी, अशा कारवाया ते करीतच राहिले अखेरीस त्यांनी स्वतःच क्रिप्स यांना तांतडीनें परत बोलाविलें हीहि गोष्ट आतां उघड झाली आहे. सेन्स क्रिप्सना परत बोलावीन असतांना आपल्या मताची व धोरणांची एकदा

दृढपणें अमलबजावणी करण्याचा त्याचा निश्चय पक्का झाला होता हें स्पष्ट आहे. कोणतेंहि निमित्त उकरून काढून काँग्रेस व म० गांधी याना नेस्तनाबूद करण्याचा त्याचा निश्चय झाला होता यात शंका नाही म० गांधींनाहि मि० चर्चिल यांच्या या निश्चयाचा पत्ता लागला होता आणि म्हणूनच त्यानीहि एकदा चर्चिल यांच्याशींच जुळी लढत घेण्याचा निर्धार केला असला पाहिजे. ऑगस्ट आंदोलनापूर्वी म० गांधींनी चर्चिल याना पाठविलेली एक दोन वोटाची चिट्ठी आता प्रसिद्ध झाली आहे तींत गांधीजींनी स्वच्छ लिहिल्याचें प्रसिद्ध झालें आहे कीं, *"मला चिरडून टाकण्याची ( Crush ) तुमची इच्छा असल्याचें मला समजलें आहे माझा हा अस्थिपंजर देह तुमच्या स्वाधीन आहे तुम्ही याला चिरडूनहि टाकू शकाल पण माझ्या आत्म्याला तुम्ही कधीच चिरडू शकणार नाही "* गांधीजींनीं हें एक प्रकारचें प्रति आव्हानच चर्चिल याना दिलें होत

क्रिप्स शिष्टाई विफल झाल्यापासूनच चर्चिल यांच्या नेतृत्वाखाली हिंदुस्थानातील मि० नोकरशाहीने व तिच्या हस्तकानी हिंदी राष्ट्रीयत्वेवर एक निर्णायक आघात करण्याचें योजलें होत किंबहुना, क्रिप्स याना, शिष्टाई तशीच टाकून, तातडीनें परत बोलाविणें हा त्या योजनेचाच एक महत्वाचा भाग असला पाहिजे काँग्रेसला नेस्तनाबूद करावयाची म्हणजे मि० चर्चिल यांच्या मताप्रमाणें काँग्रेसच्या लाख पन्नास हजार चळवळ्या कार्यकर्त्यांना दडपून टाकणें होय बहुजनसमाजाचा काँग्रेसच्या चळवळीला पाठिंबा नाही अशी चर्चिल यांची पक्की धारणा होती. पण यदाकदाचित् कांही भागात बहुजनसमाजच्या उठावण्या झाल्यास. तर तयारी असावी म्हणून बंदुका, तोफा व विमानें याचीहि सज्जता करण्यात आली होती अर्थात् त्याचा प्रत्यक्ष उपयोग करण्यापेक्षा भयप्रदर्शनार्थच या तयारीचा मतलब होता. त्याच्या नुसत्या देखाव्यानेंहि क्वचित् ठिकाणीं उठू पहाणारी जनता दबून जाईल व काँग्रेसची साथ सोडून देईल. वरील युद्धविषयक उपकरणाचा प्रत्यक्ष उपयोग करण्याचा प्रसंगच सहसा येणार नाही, किंबहुना, तो येऊं नये, अशीहि चर्चिल यांची अपेक्षा असली पाहिजे त्याची मुख्य मदार काँग्रेसच्या चळवळ्या कार्यकर्त्यांना दडपून टाकण्यावरच होती. आणि ब्रिटिशाचं सांस्कृतिक वर्चस्व हिंदी जनतेला मान्यच

आहे, तेव्हा कॉंग्रेसच्या चळवळ्या पुढाऱ्यांना अकस्मात् झडप घालून दडपून टाकलें आणि आपल्या कणखर धोरणाचा प्रत्यय जनतेला आणून दिला की, एवढ्यानेच कार्यभाग होईल अशी सुसगतपणें मि० चर्चिल यांची समजूत असली पाहिजे.

हें धोरण अंमलांत आणण्याची सर्व प्रकारची तयारी कसोशीने सुरू करण्यांत आली लहान मोठ्या सर्व कॉंग्रेसकर्त्यांच्या व चळवळ्यांच्या तपशील-वार याद्या बनविण्यांत आल्या. ठराविक दिवशीं त्या सर्वांवर एकाच क्षणीं अक-स्मात व अनपेक्षितपणें झडप घालण्यासाठीं लागणाऱ्या अधिकाऱ्यांची सघटना तयार करण्यात आली व त्यांना आवश्यक ते अधिकारहि देण्यात आले. पकडलेले पुढारी व कार्यकर्ते लावलांबच्या तुरुंगांत फेकावयाचे, त्यांच्या तुरुगजीवनावर अतिशय कडक निर्बंध लादावयाचे, जनतेचाच काय पण त्यांच्या आप्तांचाहि त्यांच्याशीं संबंध येऊं द्यावयाचा नाही, शक्य तोंवर मोठे पुढारी कोठे आहेत याचा थांगपत्ताहि लागूं द्यावयाचा नाही. आणि कारभाराचें अतिशय कठोर व कडक धोरण पदोपदीं राबवावयाचें; असें या नवीन धोरणाचें स्वरूप होतें. हिंदु-स्थानसारख्या खंडप्राय देशांत हें धोरण अमलांत आणावयाचें म्हणजे केवढी प्रचंड तयारी करावयास पाहिजे याची वाचकांनी आपल्या मनाशीं कल्पना करावयास पाहिजे।

अस्तु, अशा रीतीने दोन्ही पक्ष आपापल्यापरीने अखेरची लढत घेण्यास सज्ज झालेले होते या अखेरच्या निर्णायक लढ्यात चर्चिल याचा विजय होणें म्हणजे हिंदी राष्ट्रीयतेचा कायमचा खात्मा होणें होय, म० गांधी व कॉंग्रेस ही कायमची नेस्तानाबूद होणें होय; आणि मुसलमान, अस्पृश्य व संस्थानिक याना हाताशीं धरून यापुढें शे दोनशें वर्षे तरी हिंदुस्थानचा कारभार मि० लोक चालवू शकतील अशी निश्चिति प्राप्त होणें होय. हें सर्व न घडणें म्हणजे चर्चिल याचा पराजय होणें होय. हिंदी राष्ट्रीयतेचा खात्मा जर न झाला, म० गांधी व कॉंग्रेस याच्याविषयीं जनतेच्या मनातली भक्ति जर तशीच कायम राहिली; मुसलमान, अस्पृश्य व संस्थानिक याना हाताशीं धरून हिंदुस्थानचा राज्यकारभार यापुढे शे दोनशेच काय पण पाचपचेवीस वर्षेसुद्धा चालविणें अशक्य आहे, असें जर निश्चितपणें दिसून आलें, तर चर्चिल याचा पराभव झाला व कॉंग्रेस व म० गांधी

विजयी झाले असें हें निःसंदिग्ध समीकरण होतें चर्चिलसारख्या हिटलर व मुसोलिनीचाहि पराभव करणाऱ्या पुढाऱ्याच्या आघातानेहि जर हिंदी राष्ट्रीयता दडपं शकली नाही, आणि काँग्रेस व महात्मा गांधी नेस्तनाबूद झाले नाहीत, तर जगांतील कोणतीहि शक्ति त्यांना दाबू शकणार नाही हें सिद्ध होणार होतें. म्हणून ब्रि० साम्राज्य सरकारशी काँग्रेसने यापूर्वी जे लढे दिले त्यांत ४२ ऑगस्टच्या लढ्याला निर्णायक व अखेरचें स्वरूप आहे असें मानण्यांत येत होतें. म्हणूनच या खेपेस काँग्रेस, म० गांधी व हिंदी राष्ट्रीयता यांच्यावर करावयाचा आघात हा वज्राघातच ठरला पाहिजे याची सर्व प्रकारची तयारी साम्राज्यवाद्यांकडून कसोशीनें व अत्यंत दक्षतापूर्वक करण्यांत आली होती हिटलरविरुद्ध लढण्यासाठी जितक्या कसोशीनें ब्रि० सरकार प्रयत्न करीत होतें, तितक्याच कसोशीनें हिंदुस्थानांतील दडपशाहीचाहि प्रयत्न चालू होता कारण त्यांच्या साम्राज्यशाही युद्धप्रयत्नाचाच हा एक महत्वाचा भाग होता. ब्रि० सम्राटाच्या मुकुटांतील कोहिनूर हिरा जो हिंदुस्थान तो आपणास कायमचा पचेल की, लवकरच गमवावा लागेल याचा निर्णय हिंदुस्थानच्याच रणभूमीवर लावून घेण्याचा चर्चिल यांचा निर्धार होता ।

उलटपक्षी काँग्रेसच्या विजयाचें स्वरूप बाह्य दृष्टीनें अकरणात्मक व नैतिक दृष्टीनें विधायक राहणार असल्यानें तिला तयारीची अशी फारशी गरज नव्हती. हिंदी राष्ट्रीयता मूठभर काँग्रेस पुढाऱ्यांत समाविष्ट झालेली नाही तो सबंध राष्ट्राचा अंगभूत गुण असावयाला पाहिजे, आणि तसा जर तो असेल तर लाख पन्नास हजार कार्यकर्ते दडपले व तोफा विमानांचेंहि भय दाखविलें तरी तो नष्ट होणें शक्य नाहीं, आणि हिंदी राष्ट्रीयता जर एवढी प्रबळ असेल तर नृसिंहाच्या मांडीवर बसलेल्या प्रल्हादाप्रमाणे काँग्रेस व म० गांधी यांचेंहि स्थान अढळ आहे त्यांना कोणतीहि भौतिक शक्ति नेस्तनाबूत करूं शकत नाही हा विश्वास हेंच काँग्रेसचें मुख्य शस्त्र होतें काँग्रेसची नैतिक भूमिका ही अशी होती. १९४२ च्या ऑगस्टच्या लढ्याचें हें स्वरूप ध्यानांत घेतल्याशिवाय गांधीजींनी 'उघड लढा'चा पुकारा कां केला व 'करा अथवा मरा'चा अखेरचा आदेश कां दिला याचें रहस्य उलगडणार नाही.

---

## प्रकरण ७ वें

# शक्तिसंग्रहाचा कार्यक्रम



इ० स० १९३२ ते ४२ चा कालखंड यावलीच्या जीवनात अतिशय महत्त्वाचा समजला पाहिजे. ४२ च्या ऑगस्ट महिन्यात यावलीस जे जे काही घडलें त्याची पूर्वतयारी याच कालखंडात चालू असली पाहिजे हें उघड आहे. १९३० च्या अग्निदिव्यात जे अनेक यावलीकर तापले त्यांनी ४२ च्या लढ्यासाठी स्फूर्ति दिली असली पाहिजे. विशेषत या काळातील उदयोन्मुख कर्तृत्ववीर पंजाबराव यांच्याकडेच दिलें पाहिजे. कै. हुतात्मा लक्ष्मणराव पाचघरे यांच्या जीवनाचा त्यांच्यावर अतिशय परिणाम झाला असे. पंजाबराव हे एक तरुण आहेत. लक्ष्मणरावांच्या शिष्य होते. त्यानंतर यावली येथील राष्ट्रकार्याची ध्वजा पंजाबराव यांनीच आपल्या हातीं घेतली. १९३० च्या जंगल सत्याग्रहाच्या वेळीं सत्याग्रही या नात्याने त्यांनी आपलें नांव नोंदविलें होतें. पण त्यांच्या वडिलांनी जबरदस्तीनें त्यांना दुसऱ्या गावीं नेऊन डांबून ठेवलें व अशा तऱ्हेनें नाइलाज झाल्यामुळे त्यावेळीं त्यांना सत्याग्रहात भाग घेता आला नाही. या गोष्टीची त्यांना अतिशय खंत वाटली आणि तेव्हाच पुढील चळवळींत आपलें सर्वस्व पणास लावण्याचा त्यांनी संकल्प केला.

व्यायामशाळा, वाचनालय व औषधालय यांच्यासारख्या संस्था चालवून ते या काळात लोकसंग्रह करीत राहिले. व्यायामशाळेत तरुण मुलांना गोळा करून त्यांना कुस्ती, लाठी, काठी इत्यादि संरक्षक कलांचें शिक्षण त्यांनी दिलें आणि त्यांच्या ठिकाणीं आत्मसंरक्षणाचें सामर्थ्य व प्रतिकारक्षमता त्यांनी निर्माण केली. पंजाबरावांचा विशेष हा की, बाहेरच्या राजकारणात जातिवादाचा सैतान थैमान घालीत असूनहि त्याचा प्रवेश त्यांनी यावलींत होऊं दिला नाही. ब्राम्हणब्राम्हणेतर किंवा स्पृश्यास्पृश्य या भेदाला स्पर्श ज्याप्रमाणें त्यांनी आपल्या स्वत:च्या चित्तास कधी होऊं दिला नाही, त्याचप्रमाणें आपल्या अनुयायांनाहि

त्यांनी या अमलच्या भेदापासून सर्वथा अलिप्त ठेवलें इतकेंच नव्हे तर, हिंदुमुसलमान हा भेददेखील त्यांनी यावलीच्या चतुःसीमेंत शिरू दिला नाही त्यांच्या व्यायामशाळेंत स्पृश्यास्पृश्य , हिंदुमुसलमान सर्वच वर्गाचें व जातींचे तरुण येत असत व समान भावनेने आत्मसंरक्षणाचें शिक्षण घेऊन आपलें शरीरसामर्थ्य, आरोग्य, धैर्य व प्रतिकारक्षमता यांची जोपासना करीत असत भेदातीतपणा हे व्यापक लोकसंग्रह हाच त्यांच्या कार्याचा फार महत्वाचा विशेष समजला पाहिजे.

व्यायामशाळा व औषधालय चालवून ज्याप्रमाणें पजाबरावांनी यावलीच शारीरिक आरोग्य व सामर्थ्य वाढविलें त्याचप्रमाणे सार्वजनिक वाचनालय चालवून आपल्या ग्रामबांधवांची मनेंहि त्यांनी मजबूत केलीं हळुहळू राष्ट्रीय वृत्तीचा परिपोष करणाऱ्या आणि क्रांतिकारकांची माहिती देणाऱ्या वाङ्मयाचें संकलन त्यांनी सुरू केलें राष्ट्रीय वर्तमानपत्रे बोलावून आणि तीं आपल्या ग्रामबांधवांना वाचून दाखवून देशांत व जगात चालू असलेल्या राजकीय, सामाजिक व आर्थिक विचारांचा परिचय ते करून देत आणि स्वातंत्र्यवादी व क्रांतिवादी वाङ्मयाच्या वाचनाने त्यांच्या ठिकाणीं राष्ट्रीय वृत्तीची जोपासना करीत. आज या गावांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुष स्पृश्यास्पृश्य, हिंदुमुसलमान या सर्व नागरिकांचें लक्ष त्यांनी स्वदेश स्वातंत्र्याच्या एकाच चिरंजीव ध्येयावर केंद्रीभूत करून ठेवण्यात अतिशय यश संपादन केलें आणि म्हणून जेव्हा ४२ ऑगस्टच्या संग्रामाचा निर्वाणीचा क्षण येऊन ठेपला तेव्हा स्पृश्य व अस्पृश्य, हिंदु व मुसलमान असे सर्वच लोक आपल्या गावाच्या संरक्षणासाठी आणि कॉंग्रेसच्या तिरंगी ध्वजाची इभ्रत सांभाळण्यासाठी एक दिलाने कंबर कसून तयार होऊं शकले

१९३० च्या पोलिस दलाच्या निर्घृण आक्रमणाच्या वेळीं त्या वेळचा प्रतिकार ग्रामस्थ लोकांनी केला नाही याची त्यांना मनस्वी खंत वाटत होती पुन केव्हांहि प्रसंग आला तर लाजिरवाण्याप्रमाणे अत्याचार सहन करावयाचे नव्हेत, असा निर्धार आपल्या ग्रामबांधवांच्या ठिकाणी ते निर्माण करीत होते १९३० च्या घटनांचें वारंवार स्मरण देऊन, त्यांच्या ठिकाणचा प्रतिकारवृत्तीला ते आवाहन करीत होते. पुन्हा म्हणून कोणाचें —मग तो कोणी मोठा सरकारी

अधिकारी का असेना—आपल्या गावातील मुलांच्या व महिलांच्या अगाला स्पर्श करू देणार नाही. अशा मनोमन प्रतिज्ञा ते ग्रामस्थ लोकांकडून घेववीत होते. पुन म्हणून, आपल्या गावातील कोणतेंहि दुकान अथवा मालमत्ता लुटीस जाणार नाही अशी निश्चयात्मक सरक्षणक्षमता ते गावात निर्माण करीत होते. पुन म्हणून, कोणाचेंहि व केवढेंहि आक्रमण झालें तरी तें पाहून नामर्द व भ्याड माणसासारखे आपण पळून जाणार नाही, नव्हे—त्या आक्रमणाचा प्राणपणानें प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाही, अशा निर्धाराची ठिणगी प्रत्येक तरुणाच्या व वृद्धाच्या मनात ते पाडीत होते इतकेंच नव्हे तर पुरुष अशा आणीबाणीच्या वेळीं यदाकदाचित् भ्याड बनले व पळूनहि गेले, तरी स्त्रियानी मात्र स्वत च्या सरक्षणासाठी सज्ज राहिलेंच पाहिजे आणि प्रसग पडलाच तर आपल्या प्राणाचेंहि बलिदान देऊन आपल्या शीलाचें, पावित्र्याचें आणि गावाच्या इभ्रतीचें रक्षण केलें पाहिजे. अशी स्फूर्ति यावलीकर महिलांच्या ठिकाणीं ते निर्माण करीत होते.

सावकाश पण पद्धतशीर रीतीने पुढील लढ्यासाठी ग्रामस्थ स्त्रीपुरुषाना तयार करणें, त्याची मनोवृत्ति चेतवीत राहाणें, विशुद्ध राष्ट्रीयत्वाच्या रगांत त्याना रगवून सोडणें, क्रातीची आतुरता त्यांच्या ठिकाणीं वाढवीत नेणें, त्याचें शरीरसामर्थ्य व आरोग्य सुधारत राहणें आणि त्य ची शारीरिक व मानसिक उन्नति करीत राहणें, हा कार्यक्रम पजाबराव व त्याचे अनुयायी कळत वा नकळत १९३२ त ४२ च्या कालखडांत आचरीत राहिले. खादीचा प्रचार करणें, गांव साफ व स्वच्छ ठेवणें, आरोग्यविघातक सार्वजनिक घाण गावातून नष्ट करणें सासर्गिक साथीच्या उपद्रवापासून वेळींच प्रतिबधक उपाय योजून गावाचें सरक्षण करणें, अन्नधान्य व कापडादि इ० जीवनोपयोगी वस्तूंचा पुरवठा गावात नियमित रूपाने होत राहील यासाठीं खटपट करणें, आणि आरती मडळासारख्या सस्था काढून व सार्वजनिक प्रार्थना सुरू करून सामाजिक विषमतेच्या मुळावर कुऱ्हाड चालविणें इ० प्रकारचे उद्योग ते करीत राहिले.

हा सर्व विधायक कार्यक्रम चालू असतांहि भावी आदोलनावरून त्यानी आपली दृष्टि ढळू दिली नाही. विधायक कार्यक्रमाच्या रूपाने केवढा शक्तिसंग्रह

होऊ शकतो, याचें यावली हें मूर्तिमंत उदाहरण होय लवकरच एक देशव्यापी आंदोलन येणार याबद्दल कोणालाहि शंका नव्हती किंबहुना, क्रिप्स शिष्टाई विफल झाल्यापासून तशी सर्वांची खात्रीच पटली होती, असें म्हटलें तरी चालेल मागील सर्व आंदोलनापेक्षा हें आंदोलन अधिक भीषण होणार असेंहि सर्वत्र बोललें जात होतें १९४२ च्या जुलै महिन्यांत वर्धेला वर्किंग कमिटीचा ठराव पास झाल्यानंतर तर संदेहाला कोणतीच जागा उरली नव्हती वर्धेचा वर्किंग कमिटीचा ठराव यावलीकर ग्रामस्थांनी वाचला व ते पुढील मार्गदर्शनाची प्रतीक्षा करू लागले.

या ठिकाणीं आणखी हीहि गोष्ट ध्यानात ठेवावयास पाहिजे की, कॉंग्रेसची नैतिक भूमिका आणि म० गांधींच्या अहिंसेच्या स्थूल मर्यादा याहि यावलीच्या कार्यकर्त्यांनी आत्मसात् केल्या होत्या सत्याग्रहाचा तात्त्विक, नैतिक, प्रतिकारात्मक व व्यावहारिक अशा चतुर्विध स्वरूपाचा आविष्कार १९३० सालींच त्यांनी अनुभवला होता. आपली नैतिक भूमिका ढळू न देणें आणि अहिंसेच्या सर्व स्थूल मर्यादा पाळणें या दोन्ही गोष्टींची आवश्यकता त्यांना पक्की पटलेली होती, हें पुढील प्रकरणावरून ध्यानात येणार आहे या ठिकाणीं हा मुद्दा उपस्थित करण्याचा हेतु इतकाच की, यावलीच्या लोकांनी ४२ च्या ऑगस्टमध्यें जें काही केलें, तें केवळ चळवळीच्या धावपळींत सापडून, माथे भडकल्यासारखें केलें नाहीं, तर त्या कृत्यांच्या मागे पद्धतशीर शिक्षण होती, विचार विनिमय होता नैतिक अधिष्ठान होतें आणि अहिंसेच्या मर्यादा पालन करण्याची प्रामाणिक इच्छा होती, हें ध्यानांत घेतल्याशिवाय यावलीच्या घटनाचें यथार्थ मूल्यमापन करणें शक्य होणार नाही

अस्तु. अशा रीतीने एका बाजूने यावलीची जनता विधायक कार्यक्रमाच्या शिस्तीतून पद्धतशीरपणे शक्तिसंग्रह करीत होती, तर दुसऱ्या बाजूने कॉंग्रेसच्या अंतिम मार्गदर्शनाकडे तिचे सर्व लक्ष केंद्रित झालेलें होतें आणि आगामी लढ्यांत सर्वपणें भाग घेण्याचा ठाम निर्धार तिने केलेला होता सत्याग्रहाचा कोणताहि कार्यक्रम कॉंग्रेसने स्वीकारला आणि जर तो कार्यक्रम खेड्यांतील लोक जिद्दीने, चिकाटीने आणि सहिष्णुतेने पार पाडू लागले, तर सरकारी

दडपशाहीची केवढी भयकर कुन्हाड त्याच्यावर कोसळते याचा यावलीने १९३० साली पूर्ण अनुभव घेतला होता. शहरातल्या चळवळींचा बदोबस्त करताना नि० शासनाधिकारी एकवेळ नरमपणे वागतील, पण, खेड्यापाड्यात हे असान-कार्चे—नव्हे स्वातंत्र्याचें लोण पोहोचले असता आपल्या सत्तेला धोका उत्पन्न होईल, हें त्याना पक्के माहित असल्यामुळे, खेड्यातील चळवळीवर त्याची अतिशय करडी नजर असे आणि कोणतीहि दयामाया न दाखविता ती भरडून टाकण्याचा प्रयत्न करीत. म्हणून शहरापेक्षा चळवळ्या खेड्यावर सरकारी अधिकाऱ्याचे अत्याचार नेहमीच अधिक होत आले, याचा प्रत्यय यावलीच्या लोकाना पूर्वीच येऊन चुकला होता. सरकारी अत्याचाराचें तत्र व स्वरूप दोन्ही त्यानी पुरेपूर भोगलीं होती, आणि इतकें असून देखील पुढील आदोलनात भाग घेण्याची आतुरता यावलीची जनता दाखवीत होती. इतकेंच नव्हे तर सरकारी अत्याचाराचा कोणत्या प्रकारे प्रतिकार करावयाचा याच्याहि योजना ती ठरवीत होती. या योजना कोणत्या होत्या आणि काँग्रेसची नैतिक भूमिका आणि म० गांधींची अहिंसा यान्या मर्यादेन्या कक्षत कशा होत्या याच विवरण पुढे यथाक्रम येणारच आहे. येथे एवढेच नमूद करावे याचे आहे की, आदोलनात भाग घेणें म्हणजे नि० अधिकाऱ्याच्या अत्याचाराना निमंत्रण देणेंच होय; आणि अशी अत्याचार परपरा जरी कोसळली तरी तिलाहि पद्धतशीरपणें तोंड देणे शक्य झाले पाहिजे या सर्व गोष्टींची जाणीव ठेवूनच, काँग्रेसच्या मार्गदर्शनाची प्रतीक्षा यावलीकर करीत राहिले.

काँग्रेस वर्किंग कमिटीच्या वर्धा येथील ठरावानतर ऑगस्ट महिन्यात मुंबईस भरणार असलेल्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या ठरावाकडे व त्याच्या माध्यमातून होणाऱ्या मार्गदर्शनाकडे डोळे लावून यावलीचे लोक बसले

# प्रकरण ८ वें

## उघड बंडाचा पुकारा

मुंबईस भरणार असलेल्या अ. इ. कॉं. क.च्या बैठकीच्या आधींच गांधीजी 'उघड बंडा' चा पुकारा करूं लागले होते. या संबंधींचे आपले विचार हरिजन-मधून मोठ्या जोरदार रीतीने ते मांडूं लागले होते. परदेशीय वार्ताहरांना दिलेल्या मुलाखतींतूनहि सर्व जगाला व विशेषतः ब्रिटन, अमेरिका व रशिया या दोस्त राष्ट्रांना—खास करून अमेरिकेला—ते ऊर्ध्व बाहू करून आक्रंदून सांगत होते कीं, आपणास युद्धकालांतच या 'उघड बंडा' चा पुकारा हिंदुस्थानांत कां करावा लागत आहे ? फॅसिझम व नाझीवादाचा विरोध, लोकशाहीचें संरक्षण, दलित राष्ट्रांचें स्वातंत्र्यसंस्थापन इ० दोस्तांच्या घोषणा जर प्रामाणिक असतील तर त्याचा निकष हिंदुस्थान हाच आहे. सर्व कृष्णवर्णीय दलित राष्ट्रांचें प्रतीक हिंदुस्थान बनला आहे. त्याला जर तुम्हीं स्वखुषीनें सांप्रतच्या युद्धकालांतच स्वातंत्र्य दिलें तर बाकीच्या दलित राष्ट्रांना, युद्धोत्तर कालांत आपणासहि स्वतंत्र्य मिळणार आहे, असा विश्वास वाटूं लागेल आणि त्या सर्वांचा नैतिक पाठिंबा तुम्हाला मिळेल. दलित राष्ट्रांतून—विशेषतः हिंदु-स्थानांतून आज जें युद्धाला सैनिकांच्या व द्रव्याच्या रूपानें होत आहे, त्या-पेक्षाहि फार मोठी किंमत हिंदुस्थानच्या व इतर दलित राष्ट्रांच्या नैतिक पाठिंब्याला आहे. म्हणून हिंदुस्थानांतून इंग्रजांनी चालते होणेंच दोस्तांच्या हिताचें आहे. आपण जाण्यास तयार आहोंत, एवढें जरी आज त्यांनी मान्य केलें, तरी शिस्तीने व पद्धतशीर रीतीने त्यांना कसें जातां येईल याचा तपशील उभयपक्षीय विचार-विनिमयाने ठरविण्यास कॉंग्रेस तयार होईल. परंतु येथून निघून जाण्याची गोष्टच जर इंग्रज कबूल करणार नाहींत, तर नाइलाजानें कॉंग्रेसला उघड बंडाचा पुकारा करावा लागेल आणि इंग्रजांना या देशांतून बाहेर घालविण्याचा प्रयत्न दोस्तांच्या हितदृष्टीनेंच करावा लागेल.

गांधीप्रणीत चळवळींच्या तंत्राचा एक महत्वाचा विशेष असा आहे की, प्रतिपक्षाला अगदी उघड आव्हान द्यावयाचें, कोंडींत धरून मारण्याचा गुप्त कारस्थानी प्रयत्न कधी करावयाचा नाही, आपल्या चळवळीची पूर्व सूचना त्याला बरीच अगोदर द्यावयाची, बेसावध स्थितींत त्याला कधी पकडावयाचें नाही. अशा रीतीने आपली नैतिक भूमिका विशुद्ध ठेवून बहुजनसमाजाच्या पाठिंब्याने व नैतिक बळाने त्याच्यावर मात करावयाची. म्हणूनच मुंबई येथे भरणाऱ्या आ इं. कॉं. क च्या सभेच्या बरेच आधीपासून 'उघड बंड' चा पुकारा गांधीजी करू लागले होते बंड तर करावयाचें, पण ते गुप्त कटाच्या सहाय्याने नव्हे, चोरून पितवापितवी करून नव्हे ! तर अगदी उघड, राजरोसपणें सांगून सवरून करावयाचें !! आणि असें उघड बंड करावयाचें म्हणजे तें अहिंसकच असलें पाहिजे, बहुजनसमाजाचें —जनतेचें— असले पाहिजे मूठभर लोकांनी गुप्त कटाच्या रूपाने केलेल्या क्रांतीसारखे त्याचें स्वरूप असता कामा नये आणि त्यांत हिंसेला, सुडाला, अमानुष कत्तलींना स्थान असता कामा नये, आणि ही आपली भूमिका गांधीजींनी वारंवार विशद केली होती

'उघड बंड' चा व 'चले जाव' घोषणेचा पुकारा करून देखील आपल्या नित्याच्या शिरस्त्याप्रमाणें समेटाचा आणखी एक प्रयत्न ते करून पाहणार होते देशातील भयानक स्थितीचें, अंत करण थरारून सोडणाऱ्या शब्दांत ते वर्णन करीत होते कष्ट, जुलुम, जबरदस्ती, उपासमार व उपमर्द यांनी त्रस्त झालेली जनता जर प्रक्षुब्ध झाली, तर काय काय प्रकार देशात घडवील याचाहि इशारा ते सरकारला देत होते इकडे जपान दरवाजाशीं येऊन ठेपला होता, तिकडे दुष्काळ आ वासून उभा होता. लोकांच्या उपजीविकेचीं व वाहतुकीचीं साधनें नि० सरकार बुद्धिपुरःसर हिरावून नेत होतें आणि या गोष्टींचें संभाव्य असे भयानक परिणाम जणु काय, आताच डोळ्यांनी दिसत आहेत अशा नि -संदिग्ध भाषेंत गांधीजी जगापुढे मांडित होते. दुष्काळ पडला तर लोकांनी कसे वागावें, जपान आपल्या देशांत शिरलाच तर त्याचा अहिंसात्मक प्रतिकार कसा करावयाचा, दळणवळणाचीं व वाहतुकीचीं साधनें नाहीशीं झालीं तर काय करावें, आणि सरकारच्या जुलूम

जबरदस्तीचा विरोध कसा करावा याचाहि उपदेश ते आपल्या प्रार्थनेनतरच्या भाषणातून, वार्ताहराना दिलेल्या मुलाखतींतून आणि हरिजनमधील लेखतून प्रत्यही करीत होते एकदर वातावरण कसें तापलें, परिस्थिति आटोक्याबाहेर जाण्याइतकी कशी बिघडली, जनतेच्या प्रक्षोभाचा पारा कसा सारखा चढत आहे आणि सरकारी अधिकाऱ्याचा मूर्खपणा युद्ध प्रयत्नाच्या नावाखाली कसा परमावधीस पोहचू लागला आहे याविषयीं त्रि० सरकारला व दोस्त राष्ट्राना गांधीजींनी फार आगाऊपासून क्षणक्षणीत जाणीव करून देण्यास प्रारभ केला होता त्याच्या लेखातील, भाषणातील व मुलाखतींतील एकएक शब्द वाचणाराचें अथवा ऐकणाराचें हृदय कापीत जात असे पण त्रि० साम्राज्यशाही हें एक हृदयशून्य असें यत्र आहे ती एक पोलादी चौकट आहे तिला हृदय कोठून असणार! गांधीजींची भाषा हृदय भेदणारी खरी!! पण ज्याला हृदयच नाही त्याचें ती तरी हृदय भेदन कसें करणार!!!

अशा रीतीने दिवसामागून दिवस व रात्रीमागून रात्र जात होती मुंबईच्या ऑ इ कॉं.क.च्या सभेकडे देशातील प्राणिमात्राचें लक्ष लागलेलें होतें. क्षणा क्षणाने व पळापळाने लोक काळ मोजीत होते भारत वर्षातील समस्त स्थावर जग माची, जडाजडाची व वस्तुमात्राची चिच्छक्ति जागृत होत होती देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत ग्रामग्रामातरातून चैतन्याचा एक अभूतपूर्व असा महावेगशाली व प्रबळ प्रवाह वाहात असल्याचें स्पष्ट भासू लागलें होतें जडात व अचेतनातहि चैतन्याचा, सामर्थ्याचा, जीवनाचा अनिरुद्ध संचार होऊ लागला होता. निराशा, दैन्य, कारुण्य, अविश्वास, असहायता याचा त्याग करून जनता आशा, आत्मविश्वास, वीर्य पराक्रम व स्वावलबन यांनी भारली जाऊ लागली होती भारतवर्षाच्या प्रत्येक अणुरेणूचें प्रचड मथन सुरू झालें होतें स्वातत्र्याचा अमृतकुभ हस्तगत केल्याशिवाय आता हें मथन थाब णार नाही असें जाहीरपणें बोलून दाखविण्याइतक्या आत्मप्रत्ययाने सामान्या तला सामान्य मनुष्य देखील उत्स्फूर्त झाला होता

ऑगस्ट महिना सुरू झाला आठवी तारीख उजाडली समस्त देशातील लक्षावधि लोक काँग्रेसचा अतिम निर्णय श्रवण करण्यासाठी आतुरतेने मुंबईस

जमा झाले. मुंबईस ने जाऊ शकले नाहीत ते आकाशवाणीकडे एकसारखे कान लावून बसले खेड्यापाड्यातून नभोवाणीची निर्जीव यंत्र कोठून असणार! पण वाऱ्यावर संदेश येईल आकाशाच्या गडगडाटातून तो ऐकू यईल, विद्युल्लतेच्या लखलखाटात त्यांचे दर्शन होईल म्हणून खेड्यातला माणूसन् माणूस आपले सर्व हृदय एकवटून, अंतःकरणाचे कान करून संदेश एकण्यासाठी उत्कंठित झाला होता !!!

ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचा सभामंडप प्रेक्षकांनी चिकार भरून गेला होता देशी व विदेशी वार्ताहराची अभूतपूर्व गर्दी जमली होती. मंडपाच्या आत असलेला जनसमर्द काहीच नव्हे खरी लोकगंगा मंडपाच्या बाहेरच लोटली होती बाहेराल लोकांना एकू जावें म्हणून सभामंडपाच्या बाहेर देखील दूरध्वनिक्षेपकायत्रें लावण्यात आली होती आपल्या जिवाचा कान करून प्रत्येकजण सभामंडपात होणारी भाषणें ऐकत होता हिंदुस्थानीत किंवा उर्दूत चाललेल्या भाषणांचे शब्दार्थ विदेशी वार्ताहाराच्या कानांना कळत नसले तरी त्यांतला भावार्थ त्या या हृदयाना जाणवत होता, त्यातील तेजस्विनेची चमक त्यांच्या डोळ्यासमोर लकाकत होती त्यातील गांभीर्याचा प्रभाव त्यांच्या अंतःकरणावर पडत होता वस्तुस्थिति अशी होती की मित्र राष्ट्राच्यापैकी बहुतेक सर्व राष्ट्रातील प्रमुख वृत्तपत्रांनी आपापले वार्ताहर काँग्रेसच्या या ऐतिहासिक सभेला पाठविले होते परदेशस्थ वार्ताहराचा एवढा प्रचंड मेळावा यापूर्वी हिंदुस्थानातल्या कोणत्याहि एका सभेला उपस्थित राहिला नसेल ?

आगस्टचा ऐतिहासिक व संस्मरणीय ठराव टाळ्यांच्या प्रचंड गडगडाट्यात मंजूर झाला. हाताच्या बोटावर मोजण्याइतके कम्युनिस्ट वगळले, तर प्रचंड जनगंगेचा ठरावाला पाठिंबाच मिळाला उघड वडाच्या रणभेरीं या गगनभेरी निनादापुढे विरोधक कॅम्युनिस्टांच्या पुंगीचा आवाज, श्रवण करण्या इतक्या किंमतीचाहि कोणास वाटला नाही ठराव मंजूर झाल्यानंतर राष्ट्रपति मौलाना आझाद यांचे समारोपादाखल भाषण झाले त्यांचे भाषण सपल्यानंतर अखंड आठ तास अविश्रांत बसलेले लोक जाण्यासाठी उठले थकल्या

भागलेल्या वार्ताहरांनी आपल्या लेखण्या आवरल्या व कागदपत्रें गुंडाळल इतक्यात राष्ट्रपति आझाद यांनी घोषणा केली 'आता गांधीजी बोलण आहेत' पुन सर्व समाज खाली बसला चित्रासारख्या तटस्थतेने गांधीजी भाषण तो ऐकू लागला गांधीजी प्रथम पस्तीस चाळीस मिनिट इंग्रजी व नंतर सुमारें तासभर हिंदुस्थानींतून बोलले गांधीजींचे हें वचनाम आपल्या हृदयाच्या ओंजळी करून सर्व लोकांनी एकाग्र चित्तानें व नित भक्तिभावानें प्राशन केलें

गांधीजी म्हणाले,— "लढ्याचा निर्णय आज कॉंग्रेसने घेतला आ लढा कसा चालवावयाचा केव्हा सुरू करावयाचा त्याचे स्वरूप कोण राहिल, कार्यक्रम काय असेल इत्यादि बाबतींचा सर्वाधिकार कॉंग्रेसने म दिला आहे लढा अगदीच अपरिहार्य आहे असें मला अद्यापि वाटत नाह हिंदुस्थानचे व्हाईसराय लॉर्ड लिनलिथगो हे माझे परममित्र आहेत, त्याच पुन एकदा भेट घेऊन समेटाचा अखेरचा प्रयत्न मी करून पहाणार आ तोंपर्यंत लढ्याचा आदेश मी तुम्हाला देऊ शकत नाहीं —कार्यक्रम साग शकत नाहीं

"माझ्याकडे अत्युच्च पदावरील काही न्यायाधिकारी व सेनाधिकार येऊन गेले 'लढा सुरू झाला तर आम्ही कसें वागावें' म्हणून त्यांनी माझ आदेश मागितला मी त्यांना सांगितलें—'तुम्हाला देण्यासाठी आज मज जवळ कोणताच आदेश नाही आज मी तुम्हाला इतकेंच सांगू शकतो की आपल्याच देशबांधवांवर गोळ्या झाडू नका आणि कायद्याच्या अन्याय्य अं कोणाचाहि दडपणाने करू नका!

—" लढा अपरिहार्य आहे अशी माझी खात्री पटली म्हणजे मी कार्य क्रम सांगेन पण आज मला एवढें सांगून ठेवणे आवश्यक वाटतें कीं, मागील लढ्याप्रमाणें केवळ तुरुंग भरण्याचा काळ आता राहिलेला नाही लढ्यात सामील होणाऱ्या लोकांनी एक तर केलं तरी पाहिजे अथवा मेलं तरी पाहिजे, हें उघड बंड आहे. म्हणून या क्षणापासूनच आपण स्वतंत्र झालों आहोत असा म

प्रत्येक हिंदी मनुष्य वागला पाहिजे कोणत्याहि प्रतिरोधाला न जुमानता आपण स्वतंत्र असल्याची भावना त्याने प्रत्यक्ष व्यवहारात आणली पाहिजे. साराश, झालाच तर, हा लढा अंतिम व निर्णायक स्वरूपाचा असल्यामुळें प्रत्येकाने 'करा अथवा मरा' हा महामंत्र निरंतर समोर ठेवला पाहिजे. या महामंत्राने प्रेरित होऊन तुम्ही वागूं लागल्यानंतर कोणतीहि पाशवी शक्ति तुम्हाला गुलाम गिरींत डांबून ठेवण्यास असमर्थच ठरेल "

## प्रकरण ९ वे

# जनतेवरील वज्राघात

लोक मोठ्या उत्साहाने, आशेने व उत्कंठेने ऑ. इं. कॉं. कच्या सभागृहातून परतले समेटाची आशा अद्यापहि संपली नाही, गांधीजी व्हॉईसराय लार्ड लिनलिथगो यांच्या भेटीस जाणार आहेत, लढा टाळण्याचा ते प्रयत्न करणार आहेत पुन प्रतीक्षा! पुन उत्कंठा!! गांधीजी कधी दिल्लीस जाणार? या अखेरच्या क्षणाला तरी ब्रि० सरकारला सद्‌बुद्धि सुचेल का! —लोक बोलत होते—छे! कसली सद्‌बुद्धि!! दगडाला कधी पाझर फुटला आहे का? ब्रि० सरकारने दगा दिल्याशिवाय आजपर्यंत कधी तरी कांही केलें आहे काय? स्वार्थांध साम्राज्यशाहीच्या हातून मरणाची घटका येऊन ठेपली तरी, सत्कृत्य घडणें शक्य नाही तो हिटलरच यांना वस्ताद भेटला आहे. त्याच्या बॅम्बगोळ्याची भाषा यांना लवकर समजते. जपान्यानी यांची हड्डी चांगली नरम केली आहे यांच्याशीं अशीच वागणूक पाहिजे आपल्या गौरवर्णीय वर्चस्वाचा मोठा दिमाख येथल्यांना चढला होता जपान्यांच्या दररोज लाथा खात आहेत, पण अजून धुंदी उतरत नाही क्रिप्सला पाठविण्याचें काय पण नाटक रचलें मायावी कॅबिनेट कमिटीला बनविण्याचा प्रयत्न केला. बनला नाही एक म्हाताराच गांधीजींनी क्रिप्सची भेट झाल्यावर पहिल्याच दिवशीं सांगून टाकलें नव्हतें काय की, क्रिप्स हा अप्रामाणिक इसम आहे!" त्याने

आणलेली हुंडी पुढील तारखेची आहे. अहो, बुडीत पेढीवरची हुंडी कोण स्वीकारणार!

—जें मनात येईल तें लोक बोलत होते. कांहीं म्हणत होते—गांधीजींची आशा वेडी आहे. एक सत्याग्रही या नात्याने प्रतिपक्षाला अखेरची संधि द्यावी, असें त्याना वाटणें रास्तहि असेल. पण लाथाचा देव कधी बातांनी पावला आहे काय? आपण तयारीला लागलेंच पाहिजे. आता येथे थांबण्यांत अर्थ नाही आपापल्या गांवीं परत जाण्यांतच स्वारस्य आहे. गांधीजींचा कार्यक्रम कळेल तेव्हा कळो. व्हाईसरॉयच्या भेटींत काय होणार असेल तें होवो, पण 'करा अथवा मरा' या गांधीजींच्या आदेशांत सर्व कांही आलें यापेक्षा अधिक सांगण्याची व समजण्याची जरूरच काय आहे?'

हजारो लोक त्या दिवशींच परतले हजारो दुसऱ्या दिवशींच्या जाहीर सभेसाठी थांबले वातावरणातील अस्थिरता सर्वांनाच जाणवत होती

घड्याळाचे काटे फिरत होते, तशी ८ ऑगस्टची रात्र ही काळ रात्र ठरत होती नि० नोकरशाहीचें महावेगवान् यंत्र झपाट्याने फिरू लागलें होतें. पतप्रधान चर्चिल यानी करड्या हाताने व दृढनिश्चयाने त्याला गति दिलेली होती. सर्व योजना आगाऊच शिजून तयार झाल्या होत्या. मारेकऱ्यांची संघटना बारीकसारीक तपशीलासह सज्ज झाली होती हत्यारें पाजळून तयार ठेवण्यात आलीं होतीं. नीतिमत्ता, कायदा माणुसकी व शिष्टाचार यांना केव्हाच फाटा देण्यांत आला होता दरोडेखोराच्या मनोवृत्तीचा पूर्ण अवलंब करण्यात आला होता [.]दिवसभर लढून थकून शिबिरात झोपलेल्या पांडवपक्षीयांवर अश्वत्थाम्याने झोपेंतच नाही का वार केले व त्यांची कत्तल केली? नीतिबाह्य कृत्यानाहि इतिहासात काही कमी दाखले नाहीत!!!

वस्तुत लढ्याचा ठराव पास करणें म्हणजे काही प्रत्यक्ष लढा पुकारणें नव्हे साक्षात् इति घडल्याशिवाय युद्ध होत नाही प्रामाणिक मतप्रदर्शन म्हणजे युद्ध नव्हे युद्धकार्याशी प्रामाणिक मतभेद असणाराना आपलें युद्धविरोधी मत प्रदर्शित करण्याची मुभा इंग्लंडमध्ये देण्यांत आली होती Conscientic

नाही, मुंबईस न आलेल्या व आपापल्या गावीं दबा धरून बसलेल्या कार्यकर्त्यांचीहि गय करण्यात अर्थ नाही. ब्रि० कारभाराचा पोलादी पंजा किती बळकट आहे हें दाखवून देण्याची हीच संधि आहे, त्या पंजाचा पाश एका झपाट्यात मारून गांधीसकट सर्व काँग्रेसवाल्यांचा गळा दाबणें अवश्य आहे; आपल्या पोलादी पंजानें एकदा सफाईदार मजबुतीनें काँग्रेसची गर्दन दाबली की, मग देशांत सर्वत्र सामसूम होईल. अशा मजबुतीनें ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील यंत्र फिरत होतें. रात्रीच्या हल्ल्याची योजना परिपक्व करण्यात आली होती

९ ऑगस्टला सकाळीं मुंबई व सर्व देश जागा झाला न झाला तोंच विद्युद्वेगानें प्रत्येकाला कळून चुकलें कीं, रात्रींच घाला पडला मारेकऱ्यांनी आपला वार केला. म० गांधी व त्यांचा परिवार काँग्रेस वर्किंग कमिटीचे सदस्य आणि ऑ. इं. का. क. चे सांपडतील ते सदस्य यांना अटक झाली. अटक झालेल्यांना अज्ञात स्थळीं हालविण्यात आलें. युद्धतंत्रातील स्तैमित्य व तडितगति या हिटलरी गुणांचें, महायुद्धाच्या युरोपांतील अथवा महादेशांतील रणांगणावर नव्हे, तर नि शस्त्र हिंदुस्थानच्या भूमीवर, वाद्राघातीस तयार असलेल्या गांधींवर व काँग्रेसवर प्रदर्शन करण्यात ब्रि० सरकार यशस्वी झालें

पण, ब्रि० नोकरशाहीचें यंत्रहि अखेरीस माणसांचेंच बनलें आहे. भाडोत्री मुलकी गुलामांनी लष्करी डावपेचांची कितीहि ऐट आणली तरी अस्सल तें अस्सल व कम अस्सल तें कम अस्सलच. नक्कल्याचें काम करू पाहणारा गावंढेकर अखेरीस उघडा पडल्याच कीं नाही ? नोकरशाहीच्या सफाईच्या वारानें कैक सुटले आठ दिवसांत ब्रि० राज्य खलास करतों, असे सरदार पटेल म्हणाले होते ना ! हा पट्टाभिसितारामय्या यांनी चळवळीचा कार्यक्रम तयार केला होता ना ? नोकरशाहीचा एवढा जबरदस्त वार ज्यांनी सफाईची हूल मारून चुकविला ते दुसऱ्याच दिवशीं मुंबईत पुन एकत्र जमले काँग्रेसनें अधिकृत रीत्या कांहीं निश्चित कार्यक्रम दिला नव्हता हें तर खरेंच ! पण काँग्रेस अधिकृत पुढारी बहुजन समाजांतून नाहीसे झाल्यानंतर, प्रत्येक हिंदी मनुष्य काँग्रेस बनला पाहिजे असें गांधीजींनी अनेक वेळां बोलून दाखविलें

नव्हतें काय ? मग कॉंग्रेसचे इतक्या दिवसाचे कार्यकर्ते जे आम्ही तेच कॉंग्रेस बनलों तर काय बिघडलें ? आमच्या प्रिय पुढाऱ्यावर व संस्थेवर झालेला हा स्वैमित्यपूर्ण आघात खाली मान घालून सहन करणें कसें शक्य आहे ? सरदार पटेलाची भविष्यवाणी आम्ही खरी करून दाखवूं पट्टाभींचा कार्यक्रमच आम्ही देशभर पसरवूं. 'करा वा मरा' या गांधीमंत्रानें आम्ही दशदिशा निनादून सोडू—ब्रिटिश नोकरशाहीच्या नाकासमोर मुंबई शहरांतच निर्णय घेण्यांत आला.

गांधीजींचें भाषण छापून काढण्यात आलें कार्यक्रमपत्रिका तयार करण्यांत आल्या. पुढाऱ्यांवर झालेल्या आघाताचा प्रतिकार करण्याचा वज्र-कठोर निर्णय घोषित करण्यात आला.

वाहतुकीचीं साधनें ब्रि०सरकारच्या ताब्यात होतीं. कागद व छापखाने याच्यावर कडक नियंत्रण होतें-अमका अमक्या ठिकाणीं दिसला की गिरफ्तार करावयाचाच, याविषयींच्या हुकमानी पोलीस अधिकारी व मॅजिस्ट्रेट सुसज्ज होते. बिनतारी संदेशयंत्रें त्यांच्या साह्याला होतीं. ब्रि० सरकारच्या परवानगी शिवाय देशांतील चीटपाखरूंहि जागचें हलूं शकणार नाही, इतकी अनिर्बंध सत्ता नोकरशाहीच्या हातात काळ्या कायद्याच्या रूपाने देण्यात आली होती.

पण इतकें असूनहि हजारो कार्यकर्त्यांनी सफाईदार डूब मारली. म० गांधींच्या भाषणाच्या व मुंबईच्या दुसऱ्या दिवशींच्या सभेंत तयार झालेल्या कार्यक्रमाच्या लक्षावधि प्रती छापून तयार झाल्या. वाऱ्याबरोबर त्या देशभर संचार करू लागल्या. खेड्यापाड्यातून लोण पोहचू लागलें. पुढाऱ्यांवर अकस्मात् झालेल्या कठोर आघातामुळे क्षणभर दिङ्मूढ झालेल्या जनतेला सजीवन मिळूं लागलें. कर्तव्याचा प्रबोध होऊं लागला. कार्यक्रमाची जाणीव होऊं लागली. 'करा वा मरा' हा एकच घोष सर्व देशभर दुमदुमूं लागला.

बहुजनसमाजाच्या प्रतिकारसामर्थ्याची पहिली, पण क्षणक्षणीत चुणुक मुंबईनेच दाखविली. सांस्कृतिक वर्चस्वाच्या गुणावर हिंदुस्थानला आम्ही ताब्यात ठेवला आहे हा चर्चिलचा दर्प मुंबईनच बावडा ठरविला. लाठीमार, अश्रुधूर व गोळीबार यानीहि जनता दबूं शकत नाही हें अवघे बारा तासाच्या

अवधीत मुंबईने दाखवून दिलें वाहतुकीच्या साधनावर ब्रि० सरकारचे कायदे शीर नियंत्रण असेल, पण तीं लोकांचीं साधनें आहेत, लोक स्वेच्छेनुसार तीं चालू देतील तोंपर्यंतच तीं चालू शकतील ज्याक्षणीं लोकांची इच्छा होईल की हीं साधनें बंद पडलीं पाहिजेत त्याक्षणीं ती बंद पडतील, हें मुंबईनें दाखवून दिलें मुंबई स्वातंत्र्याच्या भावनेने भारून गेली मुंबईतील स्त्रियाहि आपणांस स्वतंत्र समजून वावरू लागल्या पोलिस बंदोबस्त, सभाबंदी, लाठीमार, अश्रुधूर यांना न जुमानता आझाद मुंबईकर सभा करून 'चले जाव'ची घोषणा करू लागले. ब्रि० सरकारचें राज्य मूठभर पोलिस व लष्करात असेल पण मुंबईतील सर्व मुलकी सत्ता धुळीस मिळाली स्वातंत्र्याचा व चैतन्याचा अभूतपूर्व डोंब मुंबईस उसळला

अजून हजारों देशवासी मुंबईत होते त्यानी मुंबईच्या जडाजडाच्या व अणुरेणूच्या ठिकाणीं संचरलेलें हें नवचैतन्य पाहिलें, अनुभवलें. त्यांचेहि बाहू स्फुरण पावू लागले मुंबईच्या चैतन्यदीक्षेने दीक्षित झालेले हे हजारो लोक मुंबईच्या प्रतिकाराच्या अद्भुत कथा बरोबर घेऊन परत फिरले १२।१३ तारखेपर्यंत मुंबईचा प्रतिकार देशभर निनादला अकर्मण्याला आता वाव नव्हता शैथिल्याला जागा नव्हती स्वस्थ बसायला पुरसत नव्हती काय करायला हवें याचा मुंबईने प्रत्यक्ष पाठ घालून दिला होता. मुंबई म्हणजे भारतवर्ष एकवेळ 'नवखंड पृथ्वी व दहावा खंड काशी' अशी म्हण होती पण आता तो मान मुंबईने घेतला आहे भारतवर्षाच्या आधुनिक इतिहासाचें प्रतीक मुंबईच बनली आहे. मग मुंबईने जें केलें त्याच्याच आवृत्त्या देशभर पडल्या तर नवल काय ?

दडपशाहीचा नंगा नाच देशभर सुरू झाला होता. जागोजागीं कॉं कार्यकर्त्यांना अटक करण्यांत येत होती. वऱ्हाडऱ्या हद्दींत प्रवेश करताच वऱ्हाडचे कार्यकर्ते पकडले गेले वर्धा नदी ओलांडताच नागपूरच्या कार्यकर्त्यांना अटक झाली स्टेशनोंस्टेशनीं ब्रि नोकरशाहीचे काळे डगलेवाले हस्तक आपापले पिंजरे सज्ज करून बसले होते आला कार्यकर्ता, गवसला कॉंग्रेसवाला की, दडपला पिंजऱ्यात. कॉंग्रेस वार्किंग कमिटी, ऑ इं कॉं. क, प्रांतिक-

कमिट्या, जिल्हा कमिट्या, नगर कमिट्या बेकायदा ठरविण्यात आल्या. देशभर कॉं० कार्यालयांच्या झडत्यांचा व मुद्रित स्थळांच्या छाप्यांचा धुमाकूळ सुरू झाला काँग्रेस कार्यकर्त्यांनी हवाई हल्ल्यांच्या प्रतिकारासाठी व उपचारासाठी काढलेलीं स्वयंसेवक दलेंहि बेकायदा ठरविण्यात आलीं. त्यांचींहि कागदपत्रें जप्त करण्यात आलीं कॉंग्रेसचें नामोनिशाण शिल्लक राहू द्यावयाचें नाही अशा निर्धाराने नोकरशाही धुमाकूळ घालित होती चर्चिली हुग्यांचें व लोहदंडाचें भयानक स्वरूप सर्व प्रकारांनी प्रदर्शित करण्यात येत होतें

इकडे अशा रीतीने भयानक दडपशाहीचा अवलंब सरकार करीत होतें, तर तिकडे 'करा वा मरा'चा संदेश गावोगाव पोहोंचत होता. प्रतिकाराचा चैतन्यप्रवाह साऱ्या देशभर खेळू लागला होता. आठ दिवसात ब्रि० राज्ययंत्र उखडून पाडण्याचा प्रयत्न सर्वत्र सुरू झाला होता

इतक्यात, हिंदुस्थानात सुरू झालेल्या दडपशाहीचें समर्थन करण्यासाठी भारतमंत्री मि० लिओपोल्ड अमेरी यांना नभोवाणीवरून भाषण करण्याची दुर्बुद्धि सुचली त्यांनी आपल्या भाषणात असें सांगितलें कीं, कॉंग्रेसने ब्रि० राज्ययंत्र उलथून पाडण्याचा कार्यक्रम देशाला दिला आहे. आमच्या हातीं लागलेल्या कागदपत्रावरून हें स्पष्ट दिसून येत आहे की, तारा तोडणें पूल पाडणें, दळणवळणाचीं साधनें बंद पाडणे, सरकारी इमारतींचा ताबा घेणें, लष्करातल्या व पोलिसातल्या शिपायांना फितवणें, सरकारी नोकरांना फितूर करणें, सारांश ज्या ज्या उपायांनी ब्रि० सरकारचें राज्य नाहीसें करता येईल त्या त्या सर्व उपायांचा अवलंब करणें हाच कॉंग्रेसचा कार्यक्रम होता अशा भयंकर गोष्टी करण्यास कॉंग्रेस प्रवृत्त झाल्यामुळे सरकारला दडपशाहीचा अवलंब केल्यावांचून गत्यंतर उरलें नव्हतें मि० अमेरी यांनी आपल्या दडपशाहीच्या समर्थनार्थ कॉंग्रेसचा म्हणून हा जो कार्यक्रम सांगितला तो अनायासेच लोकांना कळला इकडे मुबईस तयार झालेली पत्रकें देशभर प्रवास करीत होतीं, तर तिकडे त्या पत्रकांची विश्वसनीयता वाटण्यास मि० अमेरी यांचें भाषण कारणीभूत होत होतें जनतेला कॉंग्रेसकडून अधिकृत कार्यक्रम कळला नसला तरी, भारतमंत्र्यासारख्या जबाबदार अधिकाऱ्याच्या मुखातून वरीलप्रमाणें एक कार्य

क्रम ऐकण्यास मिळाला होता आणि 'चले जाव' ची घोषणा अमलांत आणण्याचें सामर्थ्य या कार्यक्रमाचे ठिकाणीं आहे हें निश्चितपणें जनतेला दिसत होतें. अनायासेंच आकाशवाणीरूपानें कार्यक्रम देशभर पसरला होता. पुढाऱ्यावर झालेल्या आघाताचा प्रतिकार करण्यासाठीं उत्कंठित झालेल्या जनतेने भारत-मंत्र्यानी दिलेल्या याच कार्यक्रमाचें स्वागत केलें असल्यास नवल काय?

मुंबईच्या घटनाचे प्रतिध्वनी जसे देशभर सर्व मोठमोठ्या शहरीं उमटले तसेच ते विदर्भांतही उमटले. उमरावती शहरांत कडकडीत हरताळ पडला, शाळा कॉलेजेस बंद पडलीं विद्यार्थ्यांनीं प्रचंड मिरवणुकी काढल्या, पोस्टाच्या पेट्या फोडण्यांत आल्या आणि तारा तोटण्यात आल्या इंपिरियल बँक आणि तहसिल कचेरी यांचा ताबा घेण्यासाठींहि लोक धडपडूं लागले. उमरावतीच्या या घटनामुळे आंदोलनाचें लोण यावलीच्या फारच जवळ येऊन पोहोंचलें होतें

## प्रकरण १० वें

# यावलीची अहिंसक क्रांति

---

अमरावतीचें वारें यावलीस वाहूं लागले देशांतल्या बातम्या यावलीस जाऊन पोहोंचूं लागल्या. ९ ऑगस्टला ब्रि० सरकारने कॅंग्रेसवर जो वज्राघात केला त्याच्या प्रतिकारार्थ यावेळीं आसपास अमरावतीतील रोष जळूं लागला. नांदगाव, यावली, माहुली, वेनोडा, इत्तमगाव, मोर्शी, वरूड, सुल्तानपूर, बैतुल याप्रमाणें गावोगावीं सरकारी सत्तेचें जें जे म्हणून प्रतीक असेल त्यावर जनतेने हल्ला करण्याचा प्रयत्न केला अथवा त्याचा विध्वंस करून टाकला. पाटील, पटवारी व रेव्हिन्यू इन्स्पेक्टस यांचीं दप्तरें लोकांनी ताब्यात घेतलीं. पोलिसठाणीं, शाळा, डाकघरें, तहसिल कचेऱ्या यांचेवर तिरंगी ध्वज फडकूं लागले. कैक ठिकाणीं तहसिलदार, पोलिस सब इन्स्पेक्टर्स, रेव्हिन्यू इन्स्पेक्टर्स इत्यादि सरकारी अधिकारी डोस्यावर गांधी टोप्या घालून व हातांत तिरंगी झेंडे घेऊन लोक समुदायाच्या मिरवणुकींत सामील झाले. जेथे सरकारी

अधिकाऱ्यानी सरकारी मालमत्तेवर जनतेचा ताबा होऊ देण्यास प्रतिरोध केला, तेथे लोकाना थोडा फार बलप्रयोगहि करावा लागला. या चकमकींत जनतेलाहि बलिदान द्यावें लागलें 'पण काही 'झालें तरी, एवढें निश्चितपणें म्हणतां येईल की, अवघ्या दोन तीन दिवसाच्या सुपास्यात अमरावती ते वरुड पर्यंतच्या सुमारें ५५-६० मैलाच्या टापूंत ब्रि० सत्ता नेस्तनाबूद झाली होती. अमरावतीचे जिल्हाधिकारी हकाबक्का झाले होते. कायद्याचें तर त्याना भान उरलेंच नव्हतें माथें भडकलेल्या पिसाटाप्रमाणें मेटेल त्या मॅजिस्ट्रेटला व पोलिस अधिकाऱ्याला ' गोळीबार करा, ' गोळीबार करा ' एवढा एकच हुकूम ते देत होते. त्याचे छक्केपजे निश्चितपणें सुटले होते मेंदूवर त्याचा यत्किंचित ताबा उरला नव्हता

एका तालुक्याच्या ठिकाणीं एक बडे अधिकारी जाऊन पोहचले, तेव्हा त्या ठिकाणीं अद्यापि गोळीबार झाला नसल्याचें त्यांना आढळून आलें अजून येथे गोळीबार का केला नाही, त्याबद्दल त्यानी तेथील पोलिसठाणेदाराची व मॅजिस्ट्रेटची हजेरी घेतली. वरील दोन्ही अधिकाऱ्यांनी जेव्हा सांगितलें कीं, परिस्थिती काबूंत असल्यामुळे गोळीबार करण्याचें कारण उद्‌भवलें नाही; तेव्हा ते बडे अधिकारी एवढेंच म्हणाले कीं, 'तुम्हीहि फितूर दिसता.'

वाऱ्यावर येणाऱ्या वातम्या, आकाशात फिरणारे संदेश, सरकारने केलेल्या प्रासंगिक आघाताची चीड यामुळे इतर अनेक ठिकाणचे लोक उठले असले, तरी यावलीची स्थिति तशी नव्हती. निश्चित कार्यक्रम हातीं पडला म्हणजे तदनुसार पद्धतशीर रीतीने कार्य करण्यास यावली पूर्वीपासूनच सज्ज बसली होती. अशा स्थितींत मुंबईहून प्रवास करून येत असलेले, पी. के. देशमुख याचेजवळून कार्यक्रमपत्रिका एके दिवशीं यावलीस अमृतराव पहेलवानाचे मार्फत येऊन पोहोंचली.

ही कार्यक्रमपत्रिका ब्रि. सरकारचे अनेक पहारे चुकवून तिच्या प्रतीक्ष्र प्रती होत अवघ्या तीन चार दिवसात यावलीसारख्या दूरच्या खेड्यांत जाऊन पोहचली यावरून तिचा प्रवास कसा झपाट्याने होत असला पाहिजे याची

कल्पना येण्यासारखी आहे. १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या वेळीं त्या संग्रामाचें प्रतीक जी 'कमल व चपाती' याचा प्रसार हिंदुस्थानभर ज्या वायुवेगाने घडला, त्याच वायुवेगाने मुंबईस सफाईदार ड्रुव मारलेल्या कॉंग्रेस कार्यकर्त्यांची ही पत्रिका यावलीस येऊन पोहचली. कार्यक्रम-पत्रिका पूर्वनिर्दिष्ट पंजाबराव यावलीकर यांच्या समक्ष हातीं नेऊन देण्यात आली.

याप्रमाणें पत्रिका हातीं आल्यावर पंजाबराव यांनी गावातील प्रतिष्ठित मंडळीची एक सभा बोलावली. 'उघड बंड' व कॉंग्रेसची नैतिक भूमिका याविषयीं म० गांधींचे सर्व विचार यावलीच्या कार्यकर्त्यांनी आत्मसात् केले होते त्यामुळे जें काही करावयाचें तें सर्वांच्या विचारविनिमयाने उघडपणें करावयाचें, त्यात कोणतीहि गोष्ट, कोणतीहि योजना झाकून ठेवायची नाही-लपवून ठेवायची नाही, आत एक बाहेर एक असें कोणतेंहि आचरण करावयाचें नाही हा पक्का संकल्प होता.

ता० १४ ऑगस्ट हा दिवस यावलीच्या इतिहासांत १९४२ च्या लढ्याचा प्रारंभ दिन म्हणून नोंदला जाईल. अखिल भारतीय कॉंग्रेसच्या इतिहासांत जें महत्व ८ ऑगस्ट १९४२ या दिवसाला आहे, तेंच महत्व यावलीच्या इतिहासात १४ ऑगस्ट १९४२ या दिवसाला आहे. जरी सभेसाठी प्रतिष्ठित मंडळीलाच निमंत्रण करण्यात आलें होतें, तरी काळाची जादू अशी काही विलक्षण होती की, सगळा गावच सभेला लोटला होता स्पृश्या-स्पृश्य, हिंदुमुसलमान, सर्व प्रकारचे लोक सभेला मोठ्या उत्सुकतेने हजर होते सभेंत पंजाबराव यावलीकर यांनी आलेली कार्यक्रम पत्रिका वाचून दाखविली आणि भाषण करून वर्तमान परिस्थितीचें समालोचन केलें. गांधीजी व कॉंग्रेस यांच्यावर नि. सरकारने केलेल्या निर्दय हल्ल्याने लोकांची क्षत करणें गार्‍हेवरून आलीं. आता लढा सुरू झाला आहे आणि यावलीने त्यांत आपला भाग घेतलाच पाहिजे असें लोक बोलू लागले.

आता यावलीसहि स्वातंत्र्य यज्ञ सुरू होणार म्हणून जनतेच्या ठिकाणी अवर्णनीय उत्साह दिसूं लागला इतके दिवस केलेला सत्याग्रह अखेरीस

आपल्या मातृभूमीच्या कारणीं लागणार म्हणून त्यांना अतिशय आनंद झाला अण्णासाहेब मदगे व राजाराम हिंगाजी काडल्कर हे सभेंत उठून उभे राहिले व पहिले सत्याग्रही वीर म्हणून त्यांनी आपलीं नावें नोंदविलीं. त्यांच्या या कृत्यामुळे लोकांच्या उत्साहाला अधिकच भरतें आलें पंजाबराव यांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहाला प्रारंभ करून, सरकारनें आपल्या परमप्रिय पुढाऱ्यावर केलेल्या आघाताला जबाब देण्याचा निर्णय सभेत घेण्यांत आला

१४ ऑगस्टची यावलीची ही सभा अनेक दृष्टींनी संस्मरणीय झाली सत्य हें परमेश्वराचेंच स्वरूप असल्यानें त्या सत्याच्या उपासनेसाठीं ज्या अर्थी गांधीजी आजन्म कष्टत आले, त्याअर्थी उपासनेच्या-भजनाच्या द्वारांच आजचा प्रतिकारनिर्णयाचा-स्वातंत्र्य संग्रामांत उडी घेण्याचा-हा प्रसंग साजरा केला पाहिजे असें ठरवून रात्रीं ९ वाजतां भजनी मंडळीचा फड लागला पुन समस्त ग्रामवासी जमा झाले त्या रात्रीच्या भजनाला खूपच रंग चढला होता तल्लीन अंतःकरणानें गाणारे गात होते व श्रोते श्रवण करीत होते जणु काय आपल्या हृदयाची आर्तता दूर गुहेंत असलेल्या परमेश्वराला ते एकवीत होते आपल्या भजनांतील कडव्या कडव्यांतून व अभंगाअभंगांतून भारतमातेची हाक ते अणुरेणूपर्यंत पोंचवीत होते या अखेरच्या निर्णायक हरिनामसंकीर्तनानें अभूतपूर्व शक्ति आपल्या ठिकाणीं निर्माण होत असल्याचा आत्मप्रत्यय प्रत्येकाला येत होता आश्चर्य हें की, या भजनानें यावलीचे समस्त ग्रामबांधव आपलीं दीर्घकालीन वैरें देखील विसरले त्यांची एक मूठ बनली सर्वांच्या ठिकाणीं समान बंधुभाव जागृत झाला विनिर्मुक्त हृदयानें कित्येकांनी अश्रुमोचन केलें खरोखर अंतःकरणपूर्वक केलेल्या भजनांचें सामर्थ्य अपार आहे !

या दृश्यामुळे लोकांची भावना दृढ झाली की, परमेश्वरानें आपल्या तर्फे कौल दिला आहे त्यांना विश्वास पटला की, आगामी लढ्यांत कितीहि घोर संकटें आला, तरी त्यांना आपण तोंड देऊं शकूं आत्मप्रत्ययानें ते बोलू लागले की, कोणताहि त्याग करण्याचा प्रसंग आला तरी आम्ही तो करून दाखवूं, पण ग्रामदेवतेची इभ्रत जाऊं देणार नाही, स्त्रियांच्या शीलाला

घण्ट लागू देणार नाही, काँग्रेसच्या ध्वजाचा उपमर्द सहन करणार नाही, मालमत्तेच्या अन्याय्य लुटीचा प्रतिकार केल्याविना राहणार नाही.

उद्यापासून म्हणजे १५ ऑगस्टपासूनच कार्याला सुरवात करावयाचे ठरले कार्यक्रम मुंबईहून आलेलाच पार पाडावयाचा, पण सत्याग्रहाच्या पद्धतीने-शांतता, सहिष्णुता, अहिंसा व प्रकटपणा याचा त्याग न करता !! ब्रि० सरकारच्या मालकीची म्हणून जी जी वस्तू असेल व दिसेल-आपल्या गावात वा आसमंतात-त्या प्रत्येक वस्तूवर जनतेचा ताबा प्रस्थापित करावयाचा हा निर्णय घेऊन लोक दुसऱ्या दिवशीच्या सत्याग्रहाच्या तयारीला लागले. लगेच रात्रीतून उद्याच्या सत्याग्रहाच्या रणभेऱ्या वाजविण्यात आल्या. दौंड्या देऊन सत्याग्रहाचा कार्यक्रम जाहीर करण्यात आला. सत्याग्रहींना आशीर्वाद देण्यासाठी सर्व वृद्धाना, माताना व भगिनींना आवाहन करण्यात आले. सर्व तरुणाना या सत्याग्रहाच्या प्रथम दिनीं उपस्थित राहण्याचें सुचविण्यात आलें त्या रात्रीं लोकाना झोप म्हणून आलीच नाही उद्याचा दिवस उजाडण्याची जो तो प्रतीक्षा करू लागला. उषेचा उदय झाल्या पासूनच लोक घराबाहेर पडू लागले

भगवान सूर्यनारायणाचें १५ ऑगस्टच्या प्रभातींचें दर्शन यावलीकर लोकांना मोठें स्पृहणीय वाटलें. सुप्रभातीचे आपले कुंकुमवर्णाचे किरण फेकून प्रत्यक्ष आदित्यच आपल्या सत्याग्रहींना आशीर्वाद देण्यास अवतरला आहे असे त्याना वाटू लागलें भक्तिभावाने त्यानी त्याला नमस्कार केला. प्रातःकालचा मंद समीरण सत्याग्रहींचा निःश्वास बनून यावलीतील स्वातंत्र्य-संग्रामाची वार्ता आसपासच्या गावांतून पसरवीत होता. शेजारपाजारच्या गावचेहि लोक यावलीचा सत्याग्रह पहाण्यास जमा होऊ लागले पुन: बिगुल, ढोल इत्यादि वाद्यें वाजवून सत्याग्रहाचें आवाहन करण्यात आलें. कोन्याकोपऱ्यात दवंडी देण्यात आली. या दवंड्याचा व वाद्याचा एवढा प्रचंड निनाद झाला कीं, त्याने यावलीचें व आसमंतातील सर्व नभोमंडळ दुमदुमून निघालें. उद्घोषक सदाशिवराव मडवे दवंडी देताना सांगत होता—" आज सकाळीं बरोबर ८ वाजता पंजाबराव, राजाराम कोंडलकर व अण्णाजी मडवे सत्याग्रह करणार

आहेत सत्याग्रहाचा प्रारंभ गांधी चौकातून होणार आहे"—आणि गावकरी लोक आपापल्या घरातून दारातून–खिडक्यातून–रस्त्यावरून म० गांधींचा जय-जयकार करून आपली समति दर्शवीत होते.

घड्याळाचा काटा आठाकडे झुकू लागला. सर्वांच्या आघाडीवर गावांतील वानरसेना जमा झाली. तिने कार्तिगीतें गात गांधी चौकांत ठाण मांडले. मोहल्ल्या–मोहल्ल्यांतील थवेच्या थवे त्यांच्या मागून गांधी चौकाकडे लोटूं लागले आठ वाजण्याच्या आधींच सारा गाव रिकामा झाला. गांधी चौक स्त्रीपुरुषांनी व बालगोपालांनी फुलून निघाला. रणसंग्रामाला जावयाचें आहे म्हणून जो तो तयारीनेच आला. मातांनी व पत्नींनी आपल्या पुत्रांना व पतींना एवढ्या सकाळींच स्वयंपाक करून जेऊ घातलें होतें. सर्वत्र उत्साहच उत्साह भरलेला दिसत होता

गांधी चौकाची त्या दिवशींची शोभाहि मोठी विलोभनीय होती १९३० साली तेथे पहिल्यादा तिरंगी ध्वज फडकविण्यात आला. आजही तो मोठ्या डौलाने फडफडत होता गुढ्या, तोरणें, पताका यांनी सर्व चौक सुशोभित करण्यात आला होता. भारताच्या साऱ्या आशा–आकांक्षा त्या ध्वजाच्या रूपानें उंच उडत होत्या यावलीकर ग्रामस्थांच्या साऱ्या इभ्रतीचें कर्तृत्वाचें व पराक्रमाच तो केवळ केंद्रस्थानच बनला होता ध्वजाकडे पाहणाऱ्या प्रत्येक इसमाला एक अपूर्व संवेदना होत होती याच ध्वजाच्या संरक्षणासाठी आणखी तीन दिवसानी आपणास रक्ताचे पाट वाहवावे लागतील हें दृश्य त्यांना याच वेळीं दिसत होतें काय! भीमाच्या बळाने व अर्जुनाच्या वीर्याने आपण याच्यासाठी लढत आहोत असे त्या १५ तारखेच्या प्रभातींच त्यांना वाटत होतें काय! तें काही असो। पण एवढी गोष्ट खरी की, गांधी चौकाच्या मधोमध, उंच ध्वजस्तंभावर फडफडणारें आपल्या राष्ट्राचें तें निशाण, स्वातंत्र्य देवीचें तें प्रतीक, भारतमातेचा तो आशाकिरण पाहून त्यावेळीं तेथे जमलेल्या सर्व आबाल वृद्धांना व हिंदुमुसलमानांना अपूर्व संवेदना होत होत्या यात शंका नाही त्यांचें तें केवळ दिवास्वप्न नव्हतें आता इतिहासानें हें दाखवून दिलें आहे की, तीन दिवसानंतरचें भविष्यच त्यांच्या चक्षूसमोर मूर्तिमंत उभें राहिलें होतें

त्या सकाळच्या समुदायाची भावना अनेक रसानी मिश्र होती. वीर रस तर तेथे साक्षात होताच पण, प्रतिपक्षी काय करणार, सत्याग्रहींना कोणत्या प्रसंगाला तोंड द्यावें लागणार या चिंतेने करुणाचाहि उत्कट प्रादुर्भाव तेथ झालेला होता. एका परीने आपल्या पराक्रमाने आपण स्वातन्त्र्य जवळ आणीत आहोंत म्हणून लोक हर्षोत्फुल्ल झालेले होते पण तितकीच भावी संकटाच्या आशंकेने विषण्णता त्यांना घेरीत होती

*सत्याग्रह-दर्शनार्थ जमलेल्या लोकांच्या हृदयसागरावर जर इतक्या विविध* भावनांच्या लाटा उसळत होत्या तर खुद्द सत्याग्रहींच्या भावना कशा उचंबळत असतील याची कल्पनाच केलेली बरी ! 'करा अथवा मरा' या महामन्त्राचा जप करीत आपण घराबाहेर पडणार आहोंत, करून यशस्वी झालों तर स्वात त्र्याचा उपभोग घेण्यास मिळेल, करतां करता मरण आलें तर तें मरणहि उदात्त मरण ठरेल। पण घराबाहेर पडावयाचें तें मनाची सर्व तयारी ठेवूनच पडावयाचें, कोणत्याहि विकटातल्या विकट प्रसंगातून मागे हटावयाचें नाही हा त्याचा निर्धार होता. सकाळींच त्यांनीहि आपलीं जेवणें आटोपलीं. अन्न-देवतेचा अखेरचा प्रसाद म्हणून कसेबसे दोन घास खाल्ले सांप्रतचा लढा स्वातंत्र्यासाठी म्हणजे अन्नासाठीच आहे, स्वातंत्र्य आहे तर अन्न आहे, स्वातन्त्र्य नाही तर अन्नहि नाही. म्हणून लढून एकदा स्वातन्त्र्य मिळालें म्हणजे स्वस्थपणे पोटभर जेवतां येईल, आज अन्नदेवतेचा अनादर करता येत नाही म्हणून दोन घास खाणें प्राप्त आहे, अशा विचारलहरींनी त्यांच्या मनात दाटी चालविली होती अक्षरशः दोन दोन घास खाऊनच सत्याग्रहींनी आपलीं जेवणें आटोपलीं.

सत्याग्रही कपडे घालून सज्ज झाले. घरच्या स्त्रियांनी मंगलारतीपूर्वक त्यांना ओवाळलें शेजारपाजारच्या भगिनीहि त्यांच्या स्वागतार्थ धावून आल्या. यावलीच्या माता व भगिनी एकीकडे मोठ्या उत्कट भावानें सत्या-ग्रहींना कुंकुमतिलक लावून त्यांच्या गळ्यांत निरोपाच्या पुष्पमाला समर्पण करीत होत्या, तर दुसरीकडे त्यांच्या नेत्रांतून निघणारीं अश्रुपुष्पें टपटप भूमातेच्या चरणावर टपकत होतीं. जणुं काय त्या भूमातेला आळवून हेंच सांगत होत्या

की, 'माते ! धरित्री ! ! आजपासून हे आमचे बाळ आम्ही तुझ्या स्वाधीन केले आहेत. यापुढील स्वातंत्र्य संग्रामात त्यांचें संरक्षण करण्यास तूंच समर्थ आहेस ' त्यावेळचें एकूण दृश्यच मोठें करुणमनोहर होतें तेथे उपस्थित असलेलें हृदयन् हृदय पाझरू लागलें होतें. त्याच्या नेत्रातून निघणाऱ्या द्रवात हृदयातील सारें रक्त समाविष्ट झालें होतें. हृदयद्रावकता तेथे मूर्तिमंत अवतरल्याचें दिसत होतें

आठ वाजायला आता फारच थोडा अवधि उरला होता स्वातंत्र्याची घडी चुकू नये म्हणून सत्याग्रही आतुरतेने सत्याग्रह स्थानाकडे जाण्यास निघाले होते. वेळेचें महत्व त्याना अतिशय वाटत होतें गांधी चौकाच्या दिशेने ते जसजसे पाऊल टाकीत होते, तसतशा घराघरातून माता व भगिनी मंगल-आरत्या हातीं घेऊन त्याना ओवाळीत होत्या व प्रेमाचा निरोप अश्रुपूर्ण लोचनांनी देत होत्या. दारादारात आरत्या व फुलवातींचे दीप घेऊन सुहासिनी उभ्या होत्या. विशुद्ध अंत.करणाने व सहोदराच्या भावनेने आपल्या माताची, भगिनींची ओवाळणी घेत सत्याग्रहींचें हें पथक सत्याग्रह स्थानाकडे गमन करित होतें. गावातील मातृवर्गाने चालविलेला हा सत्कार पाहून त्याचें अंतःकरण वारंवार भरून येत होतें. प्राचीन व ऐतिहासिक काळांत रणांगणावर जाणाऱ्या आपल्या पुत्राना, पतींना व बंधूना निरोप देण्यापूर्वी ओवाळणी करणाऱ्या आर्य स्त्रियांचें व राजपुत महिलांचें चारित्र्य त्याच्या दृष्टीसमोर उभें राहात होतें. जणु काय त्या महिला आपल्या पुत्राना व पतींना बजावून सागत होत्या की, "समरांगणातून पाठ फिरवणें हें आपल्या कुलात मोठें लांछन मानलें गेलें आहे. विजय मिळवून तुम्ही परत या. पराजयाने कलंकित होऊन जर परत याल, तर आम्ही तुमचें मुखावलोकनहि करणार नाही, घराचीं दारें बंद करून घेऊ व तुम्हाला घरात प्रवेश करूं देणार नाही." इतिहासातील तेजस्वी अशा रजपूत रमणींचे हे उद्गार जरी यावलीच्या महिलागणाच्या मुखातून प्रकटपणें बाहेर पडत नसले, तरी इतिहास वाचनाने सुबुद्ध बनलेल्या सत्याग्रहींना त्याची मनोमन प्रतीति येतच होती आणि या प्रतीतीमुळे स्वत.च्या जबाबदारीची त्याची जाणीवहि पदोपदीं वृद्धिंगत होत होती.

आठ वाजायला दोन तीन मिनिटांचा अवधि असतानाच सत्याग्रहींचें पथक गांधी चौकांत येऊन दाखल झालें. त्यासरशीं 'महात्मा गांधी की जय' 'तिरंगी झेंडे की जय' 'राष्ट्रपति आझाद की जय,' 'जवाहरलाल नेहरू की जय' इत्यादि प्रचंड जयजयकारांनी जनतेने त्यांचें स्वागत केलें. राष्ट्रध्वजाखाली एक मेज ठेवण्यांत आला होता त्यावर सत्याग्रहींचे प्रमुख पंजाबराव यावलीकर यांनी चढून लोकांना सूचना दिली की, आतां ध्वजगीत म्हटलें जाईल. सारा समुदाय एकदम शांतपणे व गंभीरपणे उभा राहिला. ध्वजगीताच्या स्वर्गीय वातावरणांत आवश्यक ती शांति व गांभीर्य निर्माण झाल्यानंतर पंजाबराव यांनी भाषणास प्रारंभ केला. त्यांनी सत्याग्रहाचा उद्देश व सत्याग्रहाचें तंत्र विशद करून सांगितलें ते म्हणाले-"सत्याग्रहाचें हें अभिनव शस्त्र आमच्या हातीं देऊन म० गांधींनी या निःशस्त्र देशांतहि प्रबल सामर्थ्य निर्माण केलें आहे. गांधीजी याच शस्त्राच्या साह्यानें आज क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. इतिहासाने हें दाखवून दिलें आहे की, निःशस्त्र जनतेला स्वातंत्र्य, संपादनासाठीं सत्याग्रह-शस्त्राचा अवलंब केल्याशिवाय तरणोपाय नाही. सत्याग्रहाचें सामर्थ्य अतिशय मोठें आहे आणि बलाढ्य साम्राज्यशाहीचा प्रतिकार करण्याचें तें अतिशय प्रभावी साधन आहे आज याच अभिनव शस्त्राचा आश्रय करून आम्ही यावलीकर सत्याग्रही क्रांतीच्या लढ्यांत उडी घेत आहोत."—याप्रमाणें सत्याग्रहाचें महत्व प्रथम निवेदन करून व नंतर आज आपण कोणत्या क्रमाने कोणता सत्याग्रह करणार आहोत याची माहिती देऊन त्यांनी आपलें भाषण संपविलें लोकांनी टाळ्यांचा कडकडाट केला

याप्रमाणें प्रास्ताविक विधि उरकवून पंजाबराव आपल्या दोन साथीदारांसह शाळेकडे वळले. शाळा हीच सत्याग्रहाचें पहिलें मंतव्य होती. या शाळेच्या माध्यमांतूनच सुशिक्षित गुलामांची परंपरा नि० सरकारने हिंदुस्थानांत निर्माण केली होती. या शाळेवर आपण आपला ताबा करू आणि नंतर तिच्याच माध्यमांतून स्वातंत्र्याचें पाईक निर्माण करूं, या उद्देशाने त्यांनी शाळेचा ताबा घेण्याचें ठरविलें ताबा घेण्याचें प्रतीक म्हणून त्यांनी हातांत एक कुऱ्हाड घेऊन तिचा नाममात्र घाव शाळेच्या बहिर्द्वारावर मारला कोणीहि

विरोध करण्यास समोर आलां नाही. शाळेला लागूनच पोस्टाची पेटी ठेवण्यात आली होती. हिंदुस्थानातील पोस्टखातें ब्रि० सरकारने लोकांच्या सुखसोईपेक्षा आपल्या राज्यकारभाराच्या सोईसाठीच उत्पन्न केलें आहे. आमच्या गुलामगिरीचा म्हणजे ब्रि० राजमुकुटाचा छाप असलेली पत्रें पोस्टाच्या याच पेटींत पडतात ही पेटी देखील ब्रि० राजसत्तेचें एक प्रतीकच होय, असें म्हणून ती फोडण्यांत आली आणि ब्रि० राजसत्तेचें यावलींतील दुसरें राजचिन्ह नष्ट करण्यात आलें. तेथून सत्याग्रही पुढे चालू लागले व त्यांच्या मागे जयघोष व गर्जना करीत ग्रामस्थ समुदाय चालू लागला शिस्तीने रांगा करून लोक चालत होते.

त्याचा मोर्चा आता कामकर्त्या पाटलाच्या घराकडे वळला होता पाटील हा ब्रि० सरकारचा खेड्यातला मोठा घटक. प्रांताचा गव्हर्नर, जिल्ह्याचा डेप्युटी कमिश्नर तसा खेड्याचा पाटील ! तेवढ्या खेड्यापुरती सारी ब्रि०सत्ता त्याच्यांत सामावलेली !! तो नाही तर ब्रि० राज्य नाही. तो आहे म्हणूनच ब्रि० राज्य आहे. हा पाटील कॉंग्रेसचा बनला पाहिजे. सत्याग्रहींचा माणसाशीं विरोध नाही. द्वेष नाही सारा विरोध सारा विद्वेष मनोवृत्तीचा, गुलामी जिण्याचा !!! म्हणून निर्विकार व शांत चित्ताने सत्याग्रहींनी पाटलाच्या घरांत प्रवेश केला गावांत चाललेल्या या घडामोडी अगदी उघड होत्या 'उघड वंडा' चाच जर पुकारा झालेला होता, तर त्याचा पाटलाला पत्ता नसेल असें कसें होईल ! पाटील सर्व काही जाणीत होता. पण गुलामी रोमरोमीं खिळली होती. पिढ्यान्‌पिढ्या गुलामींत व कुलेखासींत गेल्या होत्या. निर्भयता हा स्वातंत्र्याचा गुण आहे. 'अभयंहि वै ब्रम्ह 'असेंच श्रुतिहि बोलली आहे. पण भेकडपणा हा गुलामीचा गुण आहे त्यामुळे पाटील महाशय बावरले. त्याच्या अंगास दरदरून घाम सुटूं लागला.

त्याची ही विकल स्थिति पाहून सत्याग्रहींनी त्याचें सांत्वन केलें. आपल्या सत्याग्रहाची प्रतीकात्मक व अहिंसात्मक भूमिका त्याना समजून सांगितली. राजसत्तेच्या प्रतीकाच्या ताबा घेण्याचा आपला निर्धार त्याना निवेदन केला. एक हिंदी माणूस या नात्याने या पवित्र स्वातंत्र्याच्या कार्यात सहाय्यक होण्याची विनती केली. सत्याग्रही वीर पंजाबराव यांचें हें सांत्वनपर भाषण ऐकून पाट-

त्यास धीर आला हे लोक कोणतेंहि अत्याचाराचें-हिंसेचें कृत्य करणार नाहीत, व आपल्या कुटुंबियाच्या जिवाला धोका नाही याची त्याला खात्री वाटली

त्यानंतर सत्याग्रहींनी पाटलाजवळ सरकारी दप्तराची मागणी केली. पटवारी, कामगार महार व जागलेहि त्यावेळीं पाटलाच्या वाड्यातच बसले होते कोणीं हूं का चूं केलें नाही. दप्तर आणून देण्यात आलें. पुन दप्तर ताब्यांत घेण्याचें प्रतीक करण्यात आलें. कांही वह्यांची कोरी पानें फाडण्यांत आलीं व काही निरोपयोगी कागदपत्र जाळण्यांत आल. दप्तरावर काँग्रेसचा ताबा झाला आपल्या इच्छेप्रमाणे दप्तराची विल्हेवाट लावण्यास त्यास कोणी विरोध केला नाही. बाकीचें दप्तर पुन पाटलाच्या ताब्यात देण्यात आलें आणि हें काँग्रेस सरकारचें दप्तर सांभाळण्याचा त्यास आदेश देण्यांत आला. गावांतील मुख्य सरकार नेस्तनाबूद झालें यावलींतील नि. सत्तेचा हा विनाश सत्याग्रहींनी शांतपणें, नासधुसीच्या विध्वसक मनोवृत्तीचा आश्रय न करता प्रक्षोभाला कोणतेंही कारण न देता घडवून आणला. यावलींतील नि. सत्ता संपुष्टांत आल्याची घोषणा करण्यात आली. ती ऐकून पुन अफाट जनसमूहाने प्रचड विजयघोष करून नभोमंडल दुमदुमून सोडलें मोठ्या शांतपणानें, काही वाकडातिकडा प्रकार न घडता यावलींतील नि. सत्तेचा बालेकिल्ला सर झाला. यामुळे लोक आनदानें उड्या मारू लागले. सत्याग्रहींनी प्रेमाने पाटील पटवारी व इतर कामगारांचा हसत हसत निरोप घेतला

आता गावात नि सत्तेच एकच चिन्ह उरलें होतें. तें म्हणजे जंगल खात्याचें नाकें व दप्तर जगल खात्याचा अन्याय वऱ्हाडांतील खेडुताच्या हृदयात अगदी शल्यासारखा बसला आहे एकवेळ स्वत स खावयास न मिळालें तरी चालेल, परंतु आपल्या गाई म्हशींना, आपल्या पिवळ्या-ढवळ्यांना शेतकरी पोटभर खाऊ घातल्याविना राहणार नाही; परंतु मुक्या जनावराना–शेतींत राबणाऱ्या आपल्या या पचप्राणाना पोटभर खाऊ घालण्याच्या मार्गांतहि सरकारचें जंगल खातें आडवें येत वनचराईचा कायदा करून व निसर्गनिर्मित गवतावरहि कर बसवून सरकारने वऱ्हाडच्या शेतकऱ्याच्या गुराढोरांची जी उपासमार केली आहे तीमुळे स्वत च्या उपासमारीपेक्षाहि, तो अधिक सतप्त आहे. १९३०

चा जंगल सत्याग्रह याच जुलमाचा निषेध म्हणून आरंभ केला होता याची आठवण यावलीकर विसरले नव्हते, विसरू शकत नव्हते. म्हणून जंगल खात्याचें नाकें व दप्तर दिसल्याबरोबर लोक किंचित प्रक्षुब्ध झाले. सत्याग्रहानी प्रथम नाक्यावें बंद असलेलें दार आपल्या कुऱ्हाडींनी फोडून त्यावर ताबा घेतला कोणीहि विरोध केला नाही नंतर सर्व कागदपत्रें बाहेर काढण्यात आलीं व जाळून टाकण्यात आलीं दरम्यान जनसमुदायाने सर्वच्या सर्व इमारत उध्वस्त करून टाकली व सर्व लाकूडफाटा एकत्र करून जाळून टाकला जंगलकायद्याच्या विरुद्ध असलेल्या गान्हाण्याचा आपला क्षोभ याप्रमाणे प्रकट करून लोकसमुदाय शांत झाला यावलींत आता ब्रि सत्तेचें एकहि चिन्ह उरलें नाहीं. यावली खरोखरी स्वतंत्र झाली काँग्रेसचें अधिराज्य स्थापन झालें अवघ्या तीन तासात संपूर्णपणें आहसक अशी क्रांति घडून आली

## प्रकरण ११ वें

# माहोली पोलीस ठाण्यावरील सत्याग्रह



या प्रमाणे एक लढाई सरली, एक विजय प्राप्त झाला. दुपारचे अकरा वाजले. विजयी सत्याग्रहींनी सर्व लोकाना गांधी चौकाकडे चालण्याची आज्ञा देली विजयोत्फुल्ल जनता शिस्तीने गांधी चौकाच्या मार्गाने चालू लागली. ग्रामदेवतेची एक प्रदक्षिणा पूर्ण झाली गांधी चौकातूनच सत्याग्रहाच्या द्वारा क्रांतीस प्रारंभ झाला होता क्रांति पूर्ण झाली प्रदक्षिणा आटोपून क्रांतिरत जनता फिरून गांधीचौकातच एकत्र झाली राष्ट्रध्वज डौलाने फडफडत होता. यावलीपुरता तरी आता तो खराखुरा क्रांतीचा—स्वातंत्र्याचा—ध्वज बनला होता. जनतेची त्यावरील श्रद्धा आज पटींनी वृद्धिंगत झाली होती

पुनरपि गांधी चौकाला सभेचें गंभीर स्वरूप प्राप्त झालें. घडलेल्या घटनांचें समालोचन करण्यात आलें. पुढील कार्यक्रमाची जाणीव देण्यात

आली. शिस्त व शांतता याच्या सूचना देण्यात आल्या. एकटी यावली स्वतंत्र होऊन भागणार नाही. अहिंसक क्रांतिसेनेला इतर भाग स्वतंत्र करण्यासाठीहि चाल करून गेलें पाहिजे. या स्वातंत्र्याच्या मोहिमेची तयारी केली पाहिजे. उपकरणें जमा केलीं पाहिजेत काळ वाया जाऊ देता उपयोगी नाही. एकेक क्षण मोलाचा आहे, असे सांगून पुढील कार्यांच्या तपशीलवार सुचना देऊन जनतेला भोजनादि आटोपण्यासाठी व तयारीसाठी घरोघर जाण्याची अनुज्ञा देण्यात आली

पुढील हल्ला माहुली जहागीरच्या पोलिसठाण्यावर जावयाचा होता सुमारे ५०,६० खेड्याना गुलामगिरींत डाबून ठेवण्यासाठी उभारलेले नि० सरकारचें हे पोलिसठाणे सर केल्याशिवाय एकेका खेड्याच्या स्वातंत्र्याला सुरक्षिति नव्हती. यावलीचे स्वातंत्र्य अबाधित राहू शकत नव्हत आणि विलंब करण्यात व विजयोत्सवांत कालहरण करण्यात मतलब नव्हता म्हणून फक्त एक तासाचाच अवधि देण्यात आला होता. बरोबर दुपारीं बारा वाजता माहुलावर चाल करून जाण्याचें घोषित करण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें वेळेचें, नियमितपणाचें व शिस्तीचें महत्व जाणून सर्व लोक पुन बारा वाजण्याच्या सुमारासच गांधी-चौकात सम्मीलित झाले.

यावकरी आपापल्या घरीं गेले असले, तरी संपूर्ण कार्यभाग आटोपल्या-शिवाय घरीं परत जावयाचें नाही अशी सत्याग्रहींची प्रतिज्ञा होती म्हणून ते गांधीचौकातच बसून राहिले दरम्यान माहुलीच्या सत्याग्रहासाठी आणखी लोकांनी नावें नोंदविली. बारा वाजण्यापूर्वीच सत्याग्रहींच्या अधिकृत व दीक्षित सेनेंत भर पडू लागली आता त्याची संख्या पूर्ण दहा झाली होती लोकहि जमा होऊ लागले होते.

माहुली पोलिस ठाण्याचा एक हेडकान्स्टेबल यावलीस आपलें कर्तव्य बजावण्यास आला होता तो आतापर्यंत उपाशीच होता. क्रांतीच्या या उठा-वणींत व्यक्तिद्वेष अथवा हिंसेचा लेशहि नव्हता. गांवकरी लोकांनी, स्वतंत्र यावलीच्या छायेंत, शत्रूच्या-नि० सरकारच्या या गुलामालाहि मोठ्या प्रेमाने भोजन

घातलें. सर्वांनी त्याला प्रेमानें व शांतीनेच वागविलें. गुलामीच्या रंगात हाडें रंगलेला तो हेडकान्स्टेबल सत्याग्रहींना आपल्या पुढील विचारापासून परावृत्त करण्यासाठी त्याची मनधरणी करूं लागला. क्षणभर त्याचेंहि अंतःकरण विरघळलें होतें. यावलीच्या क्रांतीचें स्वरुपच तसें प्रभावी होतें. त्याचें भेकड व गुलाम मन भावी संकटांना भीत होतें. पंजाबरावादि यावलीच्या कार्यकर्त्यांच्याविषयी त्याच्याहि मनात आदर व श्रद्धा वास करीत होती. एवढ्या या सत्कार्यकर्त्यांवर अतिप्रसंगाला तोंड देण्याचा प्रसंग येऊं नये, अशा कळकळीनेच तो बोलला. सत्याग्रहींना आपल्या निर्धारापासून मागे फिरवण्याचा त्याचा हा प्रयास वृथा ठरला. तेजस्वी सत्याग्रही आपलें प्रतिज्ञापालन करण्यासाठी वेळच आली, तर स्वप्राणांचेंहि बलिदान करील, पण सत्य हेंच त्याचें मत असल्यानें तो आपल्या प्रतिज्ञेपासून रेसभरहि मागे ढळणार नाही, या सिद्धांताची प्रतीति त्यालाहि आली. परतु स्वातंत्र्याच्या निराकार भावनेसाठी हे इतके लोक आपल्या सर्वस्वाची आहुति देण्यास का तयार होतात हें कोडें त्याला उलगडलें नव्हतें—तयार होतात हें तो प्रत्यक्ष पहात होता. त्याना परावृत्त करण्याची कळकळीने खटपट करीत होता. त्याच्यावरील संभाव्य संकटानी त्याचेंहि हृदय व्यथित होत होतें. एका बाजूनें आपल्या त्यागी बांधवांची उत्कटता पाहून त्याचें चित्त हेलावत होतें; तर दुसरीकडे, आपण ब्रि० सरकारचें अन्न खातों या भ्रामक समजुतीनें नियोजित कर्तव्याकडे त्याचें गुलाम मन ओढ घेत होतें. चालू असलेला प्रकार तो निमूटपणें अवलोकन करीत होता. यावलींत उठलेला स्वातंत्र्याच्या झुळकीबरोबर त्याच्या ठिकाणी असलेला ब्रि० साम्राज्यसत्तेचा सारा दरारा, सारा रुबाब, सारी शान उडून गेली होती. कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं ब्रि० साम्राज्याचा हा हस्तक—ज्याला एकट्याला एरे वेळीं पाचपन्नास गावावर दबाव चालविता येत असे, आणि त्याच्या एका हुकुमानेंहि इकडचें गाव तिकडे हालत असे—आज अगदी गोगलगाय बनला होता. यावलींतील मनुष्यच काय, पण गवताची काडी देखील हलविण्याचें सामर्थ्य आपल्या अगात उरलें नाही हें त्याला जाणवत होतें. हें सामर्थ्य ज्या ब्रि० सत्तेच्या दराऱ्यामुळे आजपर्यंत कार्य करीत होतें, तो दराराच आता नष्ट झाला होता. त्याचें अधिष्ठान लोकांचें दुर्बल मन हें होतें. पण आता तें मन क्रांतीच्या रसांत डुबून, स्वतंत्र झालें होतें, निर्भय बनलें होतें, आणि त्यासरशी ब्रि० हुकुमतीचा हा ठेकेदार अविनय, केविलवाणा, दुर्बल बनला होता.

दुपारचे बारा वाजले सर्व सत्याग्रही आपापले शुभ्र खादीचे गणवेष व गांधीटोप्यांची शिरस्त्राणें घालून सज्ज झाले. प्रत्येकाने एका हातात तिरंगी ध्वज व दुसऱ्या हातात कुऱ्हाड घेतली. १९४२ च्या लढ्यात यावलीकरानी कुऱ्हाड हीच आपल्या निर्धाराचें प्रतीक बनविली होती सत्याग्रहींनी माहुलीच्या रस्त्याने कूच केलें. म० गांधींचा प्रचंड जयजयकार झाला. दीडहजाराचा जनसमुदाय सत्याग्रहींच्या मागे चालू लागला शेकडो कुऱ्हाडी तळपू लागल्या, शेकडो कंठातून वीर निनाद निघूं लागले, शेकडो लोक सत्याग्रहाशीं तादात्म्य झाले. क्रांतीचा डोंबच उसळला होता. दुसऱ्या दिवशींच बेनोड्यास क्रांति झाली होती. इत्तमगाव स्वतंत्र झाला होता वरुडवर जनतेचा ताबा झाला होता. मोर्शीचा तालुकाधिकारी जनतेचा गुलाम बनला होता. क्रांतीचा वणवा बातम्यांच्या झंझावाताबरोबर झराझ्याने भडकत होता गावोगांवच्या क्रांतिसेना बाहेर पडत होत्या. इकडे ही यावलीची क्रांतीची सेना बाहेर पडली. तिकडे इत्तमगावची अशीच ४०० सैनिकाची टोळी बाहेर पडली होती व बेनोड्याच्या १०० सैनिकाना ती मिळाली होती. विनागणवेशाच्या, विनाशस्त्राच्या, खेड्डताच्या ह्या सेना ठिकठिकाणाहून निघून मोठ्या गावाच्या व शहराच्या रोखाने रवाना होऊं लागल्या होत्या. रस्ते तोडण्यात येत होते—अहविण्यात येत होते. ग्रामीण जनतेला अंधुकपणें हें कळत होतें की, क्रांति करण्याचें सामर्थ्य आपल्यांतच आहे. पाश्चात्य देशात शहरानी क्रांति केली असेल. फ्रान्सची क्रांति पॅरिसच्या नागरिकानी घडवून आणली असेल. रशियाची क्रांति मास्को व पेट्रोग्राडच्या कामगारानी केली असेल पण, भारताची क्रांति भारतीय पद्धतीनेच झाली पाहिजे. ग्रामीणांनीच तिचा पुढाकार घेतला पाहिजे गांवें स्वतंत्र करून शहरावर मोर्चे नेले पाहिजेत व तींहि स्वतंत्र करण्यासाठी तेथील आपल्या कॉंग्रेस बंधूंना मदत केली पाहिजे ग्रामीणांचे हे मेळावेच्या मेळावे आपापल्या गावातून बाहेर का पडले आणि शहराच्या रोखाने का चालू लागले, यातील हें रहस्य ध्यानात ठेवलें पाहिजे. भारतीय क्रांतीचा हा क्रमविकास इतिहासात महत्वाचा ठरेल. त्यामुळेच येथील क्रांतीला अन्यनिरपेक्ष-वैशिष्ट्य प्राप्त होईल.

जवळच्या रस्त्यानें यावलीहून माहुलीजहागीर तीन मैल आहे. पण यावलीच्या क्रांतिसेनेला वन्ही चेतवावयाचा होता. आजच्या एका क्रांतिवीरावर

अनेक ठिकाणच क्रांतिदाप पेटवावयाचे होते त्यांनी वाघोलीच्या मागे कूच केले वाघोलीस जाऊन क्रांतीचा शंख फुंकावयाचा आणि नंतर जवळची सडक गाठून राजमार्गाने माहुलीस जावयाचे असा क्रम त्यांनी आखला. यावलीची क्रांतिसेना आपल्याच गावाकडे येत आहे हें पाहून वाघोलीकरांना अत्यानंद झाला. यावलीकरां या स्वागत सत्काराची त्यांनी तातडीने तयारी केली पंजाबराव प्रभृति यावलीच्या सत्याग्रहाचें पथक व त्याच्या मागोमाग दीड हजार समुदाय वाघोलीस पोहोचला राष्ट्रीय गर्जनांनी वाघोलेकरांनी त्यांचें स्वागत केलें व मोठ्या प्रेमाने पुष्पहार त्यांच्या गळ्यात घातले

वाघोली ओलांडल्यावर ज्या शेतातून रस्ता सडकेकडे जातो त्यात ब्रि० सरकारच्या तारखांबाच तारेचे खांब उभे होते. या तारा कसल्या ! हिंदी जनतेच्या मानेभोंवती आवळलेले ते पाशच होते. हे पाश तोडले पाहिजेत भारताचा गळा मुक्त केला पाहिजे एक कुऱ्हाड पंजाबराव यांनी एका खबवर मारली दुसरीकडून दुसऱ्या कुऱ्हाडीचा आघात शरीफ बेग मिर्झा यांनी केला खांब कोसळून पडला कोणी तरी तारेवर दोर फेकला दोराची दोन्ही टोकें धरून तार खाली ओढण्यात आली तारहि तुटली त्यानंतर सर्वच कुऱ्हाडींत चैतन्य आले. सुमारें एक दाड मैल टापूत—वाघोलीपासून माहुली पर्यंत असलेले ब्रि० सरकारचे हे तारस्तम्भ हां हां म्हणता धराशायी झाले खांबच कोसळल्यावर इमारत कशी टिकणार ? फक्त दोर की ओढ तार. मार कुऱ्हाडीचे घाव की पाड खांब खाली असा प्रकार सुरू झाला ब्रि० सरकारचे हे खांब किती पोकळ आहेत, दोन घावातच ते कसे कोमळतात हें पाहून लोकांना मोठें आश्चर्य वाटलं — या पोकळ खांबानाच का आपण इतके दिवस भ्यालें ? या पोकळ खांबाइतकेंच ब्रिटिश साम्राज्यहि पोकळ नाही काय ? भारतीय जनतेने निर्धार करून दोनच घाव मारण्याचा अवकाश की, तेंहि ह्या खांबा सारखेंच कोसळून पडणार नाही काय? जनतेची स्फूर्ति व पराक्रम वाढत चालला. आत्मविश्वास बहरास येऊ लागला

इतका वेळ क्रांतिसेनेच्या ओघात वाहणारा आणि यावलीसारख्या क्रांतिग्रामांतील अन्न खाल्लेला मघाचा तो हेडकान्स्टेबल शेकडो कुऱ्हाडींचा व

दोराचा हंसत हंसत चाललेला खेळ पाहून अधिकच भेदरला. त्याने हळूच जनसमुदायातून पोबारा केला. जवळच्या मार्गाने तो माहोलीस जाऊन पोहोचला. ठाणेदार सब्‌इन्स्पेक्टरला त्याने सकाळपासून यात्रेंत आता पावेतों झालेल्या प्रकारांची खबर दिली क्रांतिसेनेचें बळाबल सांगितलें आणि माहुलीच्या पोलिस ठाण्यावर ताबा करण्याच्या उद्देशानें ही सेना थोड्याच वेळांत येथे येऊन थडकणार आहे हेंहि निवेदन केलें.

एकदर बातमी ऐकून ठाणेदारसाहेब मनात तर घाबरले. पण वरून धैर्य धरून पुन: सर्व प्रकार पाहून येण्यास त्यानी आपले दूत पाठविले. किती राव पडले, किती तारांच्या भेंडोळ्या झाल्या, क्रांतिसेना किती दूर आहे, तींत कोण प्रमुख मंडळी आहेत इ० तपशीलवार बातमी दूतानी आणल्यावर सब्‌इन्स्पेक्टर-साहेब आपल्या व्यवस्थेस लागले ठाण्यात असले या बंदुकी त्यानी बाहेर काढल्या. एक बंदूक हातीं घेतली. बाकीच्या इतर काही शिपायाना दिल्या. उरलेल्या सर्व शिपायाच्या हातात लाठ्या दिल्या. कागदपत्रांचीं सर्व दफ्तरें लोखंडी पेटींत कोंबून तिला लठ्ठ कुलूप ठोकलें. नंतर ठाण्यांचीं सर्व खिडक्या व दारें बंद करण्यात आलीं. बाहेरचा दरवाजाहि कुलूप लावून बंद करण्यात आला. किल्ल्यांचें जुडगें त्यानी आपल्या ताब्यात घेतलें आणि ठाणेदारसाहेब आपल्या शिपायासह सशस्त्र होऊन ब्रि० सरकारच्या मिठाचे इमानदार राहण्यासाठी सज्ज बसले

बलप्रयोग करण्याचा त्यांचा निर्धार पक्का झाला होता. गोळ्यांचे काही बार उडताच गेंड्यातले हे भेकड दाणादाण होतील अशी त्यानी आपली मिथ्या कल्पना करून घेतली बार तरी काढण्याचें प्रयोजन काय? नुसत्या बंदुकी दिसल्या तरी काम भागेल! पण त्या मूर्ख ठाणेदाराला—ब्रि. सरकारच्या त्या इमानदार रखवालदाराला—भारतमातेच्या व स्वातंत्र्यदेवीच्या त्या विद्रोही इसमाला क्रांतिसेनेच्या निर्धाराची काहीच कल्पना न होती. त्यागाच्या कोणत्या कमाल मर्यादेपर्यंत श्रावलीचें क्रांतिवीर जाऊ शकतात याची अटकळ त्याला येऊ शकली नाही पंजाबराव आपल्या निश्चयाचा आहे. दोन धमक्या देऊ. दोन समजुतीच्या गोष्टी सांगून पाहू. नच ऐकलें तर, दोन बार काढ,

आणि काम फत्ते करू. या मूर्ख समजुतींत तो क्रांतिसेनेच्या आगमनाची वाट पहात बसला.

गावातले कामदार महारहि त्याने एकत्र केले सर्वांच्या हातात लाठ्या दिल्या व वेळप्रसंग पडल्यास कसोसीने बलप्रयोग करण्याची त्याना सूचना दिली सब इन्सपेक्टर, पोलिस शिपाई आणि कामदार महार याप्रमाणे त्रि. साम्राज्याच्या सरक्षणासाठी एकत्र झाले. स्टेशन हौसच्या बाहेरील आवारा-जवळील सडकेवरील दरवाजात त्यानी आपला तळ ठोकला.

माहोलीचें पोलिस ठाणें हें दक्षिणेच्या बाजूला अमरावती सडकेवर माहोली गांवापासून सुमारे फर्लागभर अंतरावर बाघण्यात आलें आहे. पंजाबरावच्या नेतृत्वाखाली क्रांतिसेना उत्तरेकडून येत होती. माहोलीकर ग्रामस्थाना ठाणेदाराने केलेली तयारी कळली होती. त्यानी क्रांतिसेनेला सामोरे जाऊन सत्याग्रहींचें स्वागत केलें. परीस्थितीची जाणीवहि दिली

आता क्रांतिसेनेचा प्रवाह अधिकच मोठा झाला होता. गांवोगावचे लोक येऊन मिळूं लागले होते. यावलीचे लोक तर होतेच. पण नरसिंगपुर, वाघोली, माहुली येथील लोक त्यात्यात येऊन मिसळले माहुलीकरानी स्वागत केल्यावर पुनः एकवार जयजयकारानी आकाश दुमदुमून गेलें. आता हा सर्व जनप्रवाह मोठ्या सडकेने पोलीस ठाण्याच्या दिशेने वाहू लागला.

त्रि सरकारच्या माहुली येथील ठाण्याच रखवालदार रखवालीसाठी लाठ्या व बंदुकी घेऊन उभे आहेत आणि वेळप्रसगच पडला तर गोळीबार करण्यासहि ते मागेपुढे पाहणार नाहीत ही बातमी कळून देखील पंजाबराव प्रभृति सत्याग्रहींचें पथक अथवा जनसमुदाय यातील एकहि इसम परत फिरला नाही हें ध्यानात ठेवण्यासारखे आहे

राजमार्गानें पंजाबराव व त्याचे इतर सत्याग्रही पोलिस ठाण्याच्या मैदानात जाऊन पोहोचले. गेल्याबरोबर ठाण्याच्या अगणातच असलेला जो तारेचा खांब त्यावर कुऱ्हाडीचा आघात करून त्यानी तो जमिनीवर लोळविला. बंदुकी

व लाठ्या यानी सज्ज असलेली सरकारी पोलिस शिपायांची व कामगार महारांची तुकडी त्याच आगणात उभी असताना त्याच्या देखत देखत यावलीच्या सत्याग्रहींनी तो तारेचा खांब हा हा म्हणता जमिनीवर कोसळविला. हें त्याचें शौर्य पाहून जनतेला अधिकच स्फुरण चढलें अधीरपण पुढील घटनाच्याकडे ती पाहूं लागली आपले शिपाई व कामगार यातून सत्याग्रहींना प्रतिरोध करण्यासाठी कोणीच पुढ सरसावत नाही हें पाहून ठाणेदार सब इन्स्पेक्टर स्वत पुढे झाला आणि त्याने पजाबराव याना-'मी तुम्हाला अटक केली आहे-' असें ओरडून सागितलें

त्याच तें म्हणणें ऐकून पजाबराव यानी जबाब दिला की,-'सत्याग्रह अजून अपुरा राहिला आह तो पूर्ण झाला म्हणजे मी व माझे सत्याग्रही सोबती तुमची अटक मान्य करू' हा जबाब ऐकून सब इन्स्पेक्टरने पजाबराव याचेवर बदूक रोखली आणि पुन ओरडून सागितलें की 'पोलिस ठाण्याला यत्किंचित धक्का लागला, तरी मला गोळी झाडावी लागेल' पजाबराव यानी जबाब दिला 'एक गोळी झडो अथवा गोळ्याच्या फैरी झाडोत, पोलिस ठाण्याचा ताबा घेतल्याशिवाय आमचा सत्याग्रह थाबणार नाहीं' सब इन्स्पेक्टर पजाबराव यान्या छातीशी रोखलेली बदूक धरून उभा आहे पजाबराव यत्किंचित न डगमगता छाती ताठ ठेवून उभे आहेत. कव्हा घोडा दबेल, केव्हा गोळी सुटेल आणि केव्हा पजाबराव याच बलिदान घडेल याचा नियम नाही असें हें चित्र त्यावळीं सर्वाऱ्या दृष्टीसमोर होतें. एका निमिषार्धात पजाबरावची आहुति यज्ञकुंडात पडली असती त्याची ती धीर व उदात्त मूर्ति तशीच उभी आहे, सत्याग्रह पूर्ण करण्याचा त्याचा निर्धार कायम आहे आणि आपल्या अहिंसेच्या व नैतिक बळाने त्यानी बदुकधारी पोलिस अधिकाऱ्यच्या व त्याच्या शिपायाच्या सैतानी बळावर मात केली आह,याची जाणीव होतांच, आतापर्यंत प्रतिरुद्ध झालेला जनप्रवाह अकस्मात धो धो वेगानें वाहू लागला हां हा म्हणता पोलीस ठाण्याच्या चारही बाजूला क्रातिसेनेचा गराडा पडला. ठाणेदारसाहेब, त्याचे शिपाई, काम गार महार यान्या बदुकी व लाठ्याऱ्या समोर, ठाण्याच्या मुख्य दरवाज्यावर कुऱ्हाडीचा प्रहार प्रथम राजाराम गोपाळजी काडलकर व विश्वासराव बापुराव बावलीकर आणि सिताराम तुमाजी राऊत यानी केला निमिषार्धात दरवाजा

कोसळून पडला आणि क्रांतिसेनेचा एक लोंढा पाहता पाहता आत घुसला. मागच्या बाजूने त्याचवेळीं इमारतीच्या खिडक्याहि कोसळल्या आणि त्यातूनहि लोक आत घुसले लोखंडी पेटीचें कुलुप तोडण्यात आलें सर्व दप्तरे व कागदपत्रें आणि इमारतींतील लाकडी सामान बाहेर काढण्यात आलें लाकडी सामानाचे तुकडे तुकडे करण्यात आले कागदपत्रें फाडण्यात आलीं. सुमारे दीड तासपर्यंत अत्यंत शांतपणे व निर्विकार चित्ताने ब्रि० राजसत्तेच्या प्रत्येक चिन्हाचा विध्वंस करून जनतेने पोलिस ठाण्याचा पूर्ण ताबा घेतला सत्याग्रह शांतपणे पूर्ण झाला.

बिचारा सब् इन्स्पेक्टर! त्याच्या अंगास दरदरून घाम सुटूं लागला. हातपाय लटलट कापूं लागले. पंजाबरावच्या छातीवर रोखलेली बंदूक जमिनीस टेकली गेली. दीनवाणी मुद्रा करून, लोकाना आवरण्याविषयीं तो पंजाबरावची विनवणी करूं लागला. ब्रि० सरकारच्या दराऱ्याला लोक दबत नाहीत, पोलिसाच्या धमकीचे व लाठ्यांचें भय त्याना वाटत नाही. बंदुकीच्या गोळीची धास्ती त्याना रेसभर देखील मागे हटवू शकत नाही. हा चमत्कार आयुष्यात त्याने पहिल्यादाच अनुभवला. त्यामुळे त्याचा प्रारंभींचा तो उद्दाम दर्प विरघळून गेला. त्याचें सर्व सामर्थ्य नष्ट झालें. सत्याग्रहींच्या आत्मिक बलापुढे व जनतेच्या नैतिक बलापुढे त्याचें पाशवी बल लुळेंपांगळें झालें सैतान माणुसकीवर आला.

सत्याग्रह पूर्ण झाला हें पाहून पंजाबराव यानी लोकाना हाक दिली. त्याबरोबर ती सर्व क्रांतिसेना एका क्षणार्धात पुन्हा पंजाबराव याच्यामागे येऊन शिस्तीने उभी राहिली. जनतेवरील त्याचा काबू विलक्षण होता. त्यांचा एक एक शब्द जादूचें काम करीत होता. लोक पंजाबराव याच्या संपूर्ण कह्यात आहेत आणि पंजाबराव याची हिंसा करण्याची कोणतीहि प्रवृत्ति नाही, हें पाहून ठाणेदारसाहेबाचा धीर थोडाथोडा चेपूं लागला. त्यांनी फिरून पंजाबराव याना सांगितलें की,— ' मीं सत्याग्रहींना अटक केली आहे. जे सत्याग्रही असतील त्यानी ठाण्यात असावें. ' पंजाबराव यानी लोकाना सांगितलें की,— ' सच्चा सत्याग्रही या नात्याने मी या अटकेचा स्वीकार करणें माझें कर्तव्य आहे आता आजचा सत्याग्रहाचा कार्यक्रम संपूर्ण झाला आहे. तेव्हा तुमच्या-

पैकी जे सत्याग्रही असतील त्यांनी येथे थांबावें आणि बाकीच्यांनी आपापल्या गांवीं परत जावें

—" आम्ही सर्व सत्याग्रही आहोंत, आम्ही सर्व थांबणार.—" एक हजार कंठातून एकदम आवाज निघाला. सब्-इन्स्पेक्टर पुन- बावचळला. एक हजार लोकांना अटक करावयाची ? त्यांना कोठे ठेवावयाचें ! त्यांना भोजन कसे घालावयाचें? त्यांना तुरुंगात कसें व कोणाबरोबर पाठवावयाचें ?—त्यानें पुनः पंजाबराव यांना विनंती केली कीं, इतक्या लोकांना अटक करणें अशक्य आहे. तुम्हीच यांतील पाच माणसे निवडून द्या व इतरांना जाण्यास सांगा पंजाबराव यांनी नावें घेऊन पाच सत्याग्रहींना पुकारलें तरी दहा इसम येऊन बसले. जनतेला उद्देशून पंजाबराव यांनी भाषण करून शिस्तीचें महत्व समजून सांगितलें. " संकटें अजून पुढेच आहेत त्यावेळीं शूर पुरुषाची गावाला गरज पडणार आहे. तेव्हा पुढील काळावर नजर देऊन सर्वांनी परत गावीं जाणें चांगलें " पंजाबराव यांच्या वक्तव्यातले तथ्य ध्यानांत असल्यामुळे लोक शिस्तीने व शांतपणे परत फिरले. पंजाबराव प्रभृति दहा सत्याग्रही अटक स्वीकारून तेथेच थांबले. नि० सरकारच्या पाशवी बलात त्यांना अटक करण्याचें सामर्थ्य नव्हतें हें अगदी उघड झालें होतें. सत्याग्रहीचा धर्म म्हणून त्यांनी अटकेचा शांतपणे व अहिंसकपणे स्वीकार केला होता. पंजाबराव यांनी आपल्या सर्व लोकांच्याबरोबर थांबलीसच परत जाण्याचें ठरविलें असतें तर त्यांना कोण धरूं शकणार होता ? पोलीस अधिकाऱ्यात ते सामर्थ्य उरलें होतें का ? त्यांच्या लाठ्या व बंदुकीच्या अगों तरी तो प्रभाव उरला होता का! अर्थात् नाही. अशाहि परिस्थितींत त्यांनी अटक स्वीकारली हाच त्यांच्या विशुद्ध नीतिमत्तेचा, अहिंसकतेचा व आध्यात्मिकतेचा पुरावा होय.

इकडे जें यावलीस, वानोलीस व माहोलीचे सडकेवर घडले तेंच बेनोडा व इत्तमगांवला घडलें. बेनोड्यास गोळीबार झाला. त्यात बेनोड्याच्या व इत्तमगांवच्या शूर क्रांतिवीरांचें बलिदान घडलें. हा वृत्तात पुढील प्रकरणात यावयाचा आहे. प्रस्तुत संदर्भ इतकाच की, सर्वत्र उमरावती मोर्शी–वरुड रस्ता क्रांतीने भडकल्याच्या बातम्या अमरावतीस जिल्हाधिकाऱ्याकडे जाऊन पोहचल्या होत्या.

परिस्थिति समजून पाहण्यासाठी ते जातीने निघाले होते माहोली पोलिस ठाण्या वरील सत्याग्रह पूर्ण करून यावली, ०ानोली, माहोली, नरसिंगपूर इ. ठिकाणची जनता वर सांगितल्याप्रमाणे पंजाबराव यांच्या आदेशानुसार निघून गेल्यावर आणि अटकेचा स्वीकार करून पंजाबराव प्रभृति दहा सत्याग्रही ठाण्यात बसून राहिल्यानंतर काही वेळाने जिल्हाधिकारी मेल्ड्रम तेथे येऊन पोहचले त्यांना पोलिस ठाणें संपूर्ण उध्वस्त झालेलें आढळून आलें लाकडी सामानाचे तुकडे इतस्तत पडले होते कागदपत्रांच्या चिंटोऱ्यांचा तर पोलीस ठाण्यापासून माहोली गावापर्यंत फर्लांगभर सडला साडला होता वेळ निघून गेली होती तरी परत जाणाऱ्या क्रांतिसेनेचा पाठलाग करण्याचा मोह डेप्युटी कमिश्नर मेल्ड्रम याला आवरता आला नाही त्याने पाठलाग केलाच पण हताश होऊनच त्यास परत यावें लागलें शेवटीं फगन्या व उकड्या महार यांच्या हस्तें माहोलींत दवंड्या देऊन जाहीर करण्यात आल की, तारा तोडणाराना व सरकारी मालाचें नुकसान करणाराना फासावर दिले जाईल असा डी सी चा हुकूम आहे, दवंडीवरच विचाऱ्यास समाधान मानावें लागलें

सत्याग्रही शांतपणे बसले होते. साहेबमजकुराचा क्रोध अनावर झाला त्यांनी तो सर्व सब इन्स्पेक्टर वर काढला त्याला त्यांनी अद्वातद्वा शिव्या दिल्या. तो बिचारा काय बोलणार ! त्याच्यांतला सैतान क्रांति सेनेच्या नैतिक बलाने केव्हाच धुऊन निघाला होता 'गोळीबार का केला नाही ? लोकाना ठार का मारलें नाही ?'—मूर्ख जिल्हाधिकारी बडबडत होता क्रांतीच्या नीतिबलापुढे लाठी व बंदूक देखील ढिली पडते हें त्याला काय माहिती ? म्हणूनच सब इन्स्पेक्टरला वाटेल तशा अर्वाच्य शिव्या देऊन तो आपल्या संतप्त चित्ताचें समाधान व मूर्खपणाचें प्रदर्शन करीत होता परंतु ईश्वरी सत्तेतहि असा काही मनोदार असतो की बरोबर तीनच दिवसानंतर क्रांतिकारकाच्या नीतिधैर्यासमोर खुद्द मेल्ड्रम महाशयाची बंदूक यावली गावांतच ढिली पडली यावलीच्या नागरिकांनी त्याला कैद केल व तिचा त्यानेहि स्वीकार केला. कैदेंतून ऱ्याडासरसा तो पळाला नात्यात १५ वर्षांचा एक तरुण मेल्ला. त्याची त्याने माफी मागितली व यावलीच्या शौर्याने आपण पराजित झालों याची कबुली दिली. यावली प्रकरण पुढे हायकोर्टात चाललें. त्यांत मेल्ड्रम हा चोर, दरवडे

खोर आहे असें मानण्यापर्यंत एका हायकोर्ट जज्जाचें मत बनलें. सब इन्स्पेक्टरच्या म्याडपणाला शिव्या देणारा हा शूर जिल्हाधिकारी, यावलीचा खटला हाय कोर्टात प्रविष्ट झाल्याबरोबर हिंदुस्थानातून पळाला आणि द. आफ्रिकेंत नोकरीवर गेला. दुसऱ्याचा म्याडपणा काढणारा हा इसम शेवटीं भेकडातला भेकड ठरला यावलीची आठवण तो जन्मभर विसरणार नाही.

अस्तु. सब इन्स्पेक्टरवर शिव्याची लाखोली वाहून मेल्ड्रम साहेब माहुली हून तसेच पुढे मोर्शीस गेले. तेव्हा वाघोलीपर्यंत नि सरकारचें तारखात जमीनदोस्त झालेलें त्याना आढळून आलें. ज्या दिवशीं मेल्ड्रम याची खाजगी रोजनिशी उपलब्ध होईल त्या दिवशीं त्यांच्या यावली प्रकरणातील एकदर भावनाचा फारच चागला उलगडा होऊ शकेल! हा सर्व इतिहास या पुढील प्रकरणातून द्यावयाचा असल्यानें प्रस्तुत प्रकरणाला येथेच पूर्णविराम देऊ

अटक झालेल्या पजाबराव प्रभृति यावलीकर सत्याग्रहींना रातोरात अमरावतीच्या तुरुगात रवाना करण्यात आलें

## प्रकरण १२ वें

# धवलगिरीचा गोळीबार

मागील प्रकरणांत जिचा निर्देश केला ती बेनोडा येथील गोळीबाराची अद्भुत कथा आता आपणांस पढावयाची आहे बेनोडा येथील सग्राम म्हणजे धवलगिरी नदीकाठचा सग्रामच होय

मोर्शी तालुक्यातील धवलगिरी नदीचें नाव १९४२ च्या आगस्ट क्रांतीच्या इतिहासात सस्मरणीय राहील बेनोडा हें गाव मोर्शी–वरुड मुख्य रस्त्यावर याच नदीवर वसलेलें आहे. सबध बेनोडा सर्कल १९३० च्या जगल० पासूनच काँग्रेसच्या निशाणाखाली समरस झालेलें आहे

ता ८ ऑगस्ट १९४२ चा मुंबईचा ऑ इ कॉं क चा ठराव, ९ ता स मुंबईस झालेली राष्ट्रीय नेत्यांची धरपकड व नतर देशभर पसरलेला आंदोलनाचा कार्यक्रम यांच्या बातम्या व पत्रकें इत्यादि १२ ऑगस्टपर्यंत बेनोडा सर्कलमध्यें जाऊन पोहोंचलीं लोणी, इत्तमगाव, पळसगाडा, बेलोरा, सावगा इत्यादि गावीं क्रातीचें वारें वाहू लागलें जागोजागीं सभा होऊन "चले जाव" ची कॉंग्रेसची घोषणा अमलात आणण्याचें ठरलें सर्कलमधील कार्यकर्त्यांची १५ आगस्टला लोणी येथ एक सभा होऊन दुसरे दिवशीं बेनोडा येथील पोलीस ठाण्यावर ताबा स्थापन करण्याचा कार्यक्रम निश्चित करण्यांत आला

पुढ बेनोडाहि स्वस्थ बसलेला नव्हता सरकारी आक्रमणाच्या नियोजित योजनेप्रमाणे तेथील कार्यकर्ते श्री बळीरामजी फरकाडे व श्री यादवराव खांडपासोळे यांना अटक करण्याचा प्रयत्न तेथील पोलीस स्टेशन हौसचा अधिकारी सब् इन्स्पेक्टर निंबाळकर याने १३ ऑगस्टलाच करून पाहिला पण त्यांचेबरोबर १०० प्रतिष्ठित गावकरी पोलिस ठाण्यावर गेल्यामुळे हा प्रयत्न निष्फळ झाला त्याने सर्वांनाच घरीं जाण्यास सागितलें

ता० १४ आगस्टला सकाळीं गांधी चौकातून १००० लोकाची प्रभात फेरी निघाली दे भ बळीरामजी फरकाडे यादवराव खाडपासोळे व शेषराव मुधोळकर यांचीं भाषणें झालीं सभा आटोपल्यावर त्या तिघाना निंबाळकर सब-इन्स्पेक्टरने अटक केली लोकानी हरताळ पाडला पोस्ट ऑफीस, फॉरेस्टरचें ऑफिस व पाटील पटवारी यांचें कागदपत्र जाळण्यात आले व टेलिग्राफच्या ताराहि तोडण्यात आल्या या प्रकाराबद्दल श्री केशवराव धारमासे व गणपतराव चिंचामलातपुरे याना अटक करून ठाण्यावर नेण्यांत आलें

सायकाळीं वरील पाच देशभक्ताना अमरावती जेलमध्यें पोंचविण्यासाठीं पोलिसने मोटार सज्ज केली 'आम्ही स्वतत्र आहोत आमच्या पुढाऱ्यांना अटक करण्याचा ब्रिटिश सरकारच्या या पोलिसाना काय अधिकार! —सगळें गाव बोलू लागलें बोलता बोलता लोक पोलिस ठाण्याकडे जमा होऊ लागले त्यांनी पोलिसची मोटार अडवली. पोलिस अधिकाऱ्यांनी शस्त्रानें आपल्या ठाण्यात

परत जावें म्हणून सांगण्यात आलें व पुढाऱ्याची सुटका करण्यांत आली ब्रि० सत्तेचा अधिकार आपणावर व पुढाऱ्यावर चालू शकत नाहीं हें दोन वेळा आपल्या पुढाऱ्याची पोलिसच्या हातून सुटका करून जनतेने सिद्ध करून दाखविलें जनतेचा स्वातंत्र्याचा झेंडा उच्च आकाशात फडकू लागला व स्वातंत्र्याच्या जयजयकाराने आकाश मंडळ दुमदुमू लागलें दोनदा पराभूत झालेला सब्‌इन्स्पेक्टर जागच्या जागीं दात, ओंठ खात बसला

ता १५ ८ ४२ला पुन अधिक मोठी प्रभातफेरी निघाली आठवडे बाजारात प्रचंड जाहीर सभा झाली. जनतेने मुक्त करून आणलेल्या पाचहि पुढाऱ्यांची भाषणें झालीं क्रांतीच्या रंगात जनता अधिकाधिक रंगू लागली या बातम्या अमरावतीस ब्रि० जिल्हाधिकाऱ्याकडे जाऊन पोहोचल्या सायंकाळच्या सुमारास जिल्हाधिकारी मेल्ड्रम, डी एस् पी ग्रँट व पोलिस दल वेणोड्यास येऊन ठेपले आल्याबरोबर त्यांनी दोन वायफार केले बाजारातील एका म्हातारीला लाठीने झोडपण्याचा पराक्रम केला. डि मॅ च्या हत्यारबंद टोळीने पुन मागील पाचहि पुढाऱ्यांना अटक केली डि मॅ ने त्यांना क्रोधसंतप्त होऊन विचारलें–'तुम्हास अटक केल्यानंतर तुम्ही मोटारींतून उतरून का गेलांत?" त्यांना उत्तर मिळालें–'आम्ही स्वतंत्र आहांत. जनतेने आम्हाला मोटारींतून उतरवून घेतलें आमचा निर्णय आम्ही घेतला तुमचें काम तुम्ही करा ' डि मॅजिस्ट्रेट मेल्ड्रम याने गोळीबार न करण्याबद्दल सब्‌इन्स्पेक्टर निंबाळकर याची खूप हजेरी घेतली पुढाऱ्यांना अटक करून व पोलिस ठाण्यात बंद करून मेल्ड्रम, ग्रँट, व त्यांचें दल परत अमरावतीस निघून गेलें

सबंध वेणोरा सर्कल पेटलें आहे आणि काहीं भयंकर घटना घडणार आहेत अशा वार्ता सर्वत्र पसरू लागल्या त्या कानावर आल्यामुळे १५ ८ ४२ त्याच रात्रीं मोर्शीला तहशिलदार, सर्कल इन्स्पेक्टर व वरुडचा सब्‌इन्स्पेक्टर ही मंडळी वेणोड्यास तेथील सब्‌इन्स्पेक्टर निंबाळकर यांच्या मदतीसाठी आली. त्यांनी रातोरात गावात धरपकड सुरू केली पोलिस ठाण्यात आणून लोकांना बेदम मार देण्यात आला, गिरफ्तार लोकांना वेणोड्याहून वरुडच्या

पोलीस ठाण्यात पाठविण्यांत आलें धरपकडीचें सत्र चालूच राहिलें वेनोड्याचें आंदोलन आपण दाबून टाकलें अशी गुमा अधिकाऱ्याना चढू लागली

परंतु पायाखाली काय जळत आहे याची त्याना कल्पना नव्हती वेनोडा सर्कलमधील कार्यकर्त्यांची १५ ता च्या रात्रीच्या सभेंत जी योजना ठरली तिचें पुढारीपण श्री वामनराव बळीरामजी पाटील यांना देण्यात आलें होतें त्यानी १६ तारखेला नागपचमीच्या दिवशीं क्रांतिसेनेचा मोर्चा इत्तमगावाहून बाहेर काढला वाटेंत लोणी येथील कार्यकर्ते पाटील महादेवराव हे त्याना मिळाले, *लोणी येथील क्रांतिसेना इत्तमगावच्या क्रांतिसेनेला मिळाली तद्वत बेलोरा* पळसवाडा, सावगा येथील क्रांतिसैनिकहि त्याना येऊन मिळाले लोणींत प्रचंड मिरवणूक निघाली गोलबाजारांत सभा झाली वीर वामनराव यानी सर्व क्रांति-सेनेला सवाल टाकला—'छातीवर गोळ्या झेलण्याची ज्याची तयारी असेल त्यानीच आमच्याबरोबर यावें' सर्व सभा चालू लागली वाटेंत वेनोड्याच्या अलीकडे एक जंगल आहे त्यांत वामनराव यानी आपल्या सैनिकाना उभे केले त्यानी भाषण केलें व पुन सवाल टाकला—'ज्याला मरणाची भीति वाटत असेल त्याने परत जावें'—वामनराव पुढे चालू लागले एकहि सैनिक परत फिरला नाही वेनोड्याच्या मोटार स्टँडवर क्रांतिसेना येऊन पोहचली क्रांतीच्या जयजयकारांनी वेनोड्याचें आकाश दुमदुमू लागलें जलालुद्दीन नांवाचा एक पोलीस कान्स्टेबल मोटरस्टँडवर उभा होता त्याचा पोषाख काढून घेण्यात आला त्याला खादीचा पोषाख चढविण्यात आला व जनतेचा स्वयंसेवक बनवून त्याला इत्तमगावाला रवाना करण्यात आलें

क्रांतिसेना मोटारस्टँडपर्यंत येऊन पोहोचल्याचें कळताच स इ निंबाळकर हा नचहत्यारांनी सुसज्ज झाला डि मॅ मेल्डमने त्याची घेतलेली हजेरी त्याला बोचली होती त्याने येत असलेल्या जमावाचा प्रतिकार करण्या साठी पोलीसची एक तुकडी पुढे पाठविली व स्वत पोलीस ठाण्याच्या समोर बंदूक व तरवार घेऊन उभा राहिला क्रांतिसैनिक मोटरस्टँडवरून पोलीस ठाण्याकडे यऊ लागले वाटेंत धनलागिरी नदीचा पूल लागला आता समाज पुलावरून चालू लागला अग्रभागां असलेले पुढारी पुलाच्या दुसऱ्या टोका पर्यंत जाऊन पोहचले असतील नसतील तोंच पोलिसाने गोळीबार सुरू केला.

क्रांतिसेना चांगलीच कोंडीत पकडली गेली. पूल नदीपासून सुमारें २५ फूट उंच असल्याने पांगण्यासहि अवकाश नव्हता. गोळीबार सुरू होताच महादेवराव वाघमारे व महादेवराव फडाडे यांनी पहिल्या गोळ्या आपल्या छातीवर झेलल्या. दोघेहि वीर धराशायी झाले पुनः गोळ्या आल्या त्या उत्तमराव मानकर,यांना हातावर व पुंडलिकराव वानखेडे यास पायावर लागून दोघेहि जखमी होऊन पडले.

चार वीर पडले तरी क्रांतिसेना पुढेच चाल करून जाऊ लागली पुन: गोळ्या झाडण्यात आल्या. महादेवराव बारमासे, विनायकराव यानले, पांडुरंगजी मालपे यांनी गोळ्यांचा मुकाबला केला. तिघेहि धारातीर्थी मरण पावले गोळीबार चालूच होता. लोक पुढेच सरकत होते. लोणीचे उदेभानजी वारी, गोपाळ देववरे, मारोती लिखितकार, नत्थूजी मालपे,माणिक सखाराम आगरकर, बाजीराव चांभार, किसनजी नेरकर, पुंजाजी कुणबी, गंगाधर ब्राम्हण आणि इत्तमपारचे श्रीराम पाटील, संतोष बोरकर, शंकर धोबी, बाबूराव कुलार, माणिक न्हावी मिळून आणखी १४ वीर जखमी होऊन पडले. पडता पडता त्यांनी लोकांना आदेश दिला —'कर्तव्याला चुकूं नका' 'माघार घेऊ नका.'

जखमी होऊन पडलेल्या लोकांना तावडतोब उचलून नेण्यात आले. त्यांना पाणी पाजण्यात आलें व त्यांच्या जखमा बांधण्यात आल्या. आतापर्यंत एकून २१ वीर पडले, तरी क्रांति सेना डगमगली नाही. ती वीर वामनराव पाटील यांच्या नेतृत्वाखाली पुढेपुढेच जात राहिली जरी ती कोंडीत सापडली होती व तिची अतिशय हानि झाली होती, तरी तिने धैर्य सोडलें नाही तिची ती निर्भयवृत्ति पाहून पोलिस तुकडीची हिंमत खच्ची झाली आता तिने माघार घेण्यास प्रारंभ केला पोलिस माघार घेत होते. क्रांतिसेना पुढे सरकत होती स. इ. निंबाळकर हें सर्व दृश्य पहात होता. आता त्याने आपल्या जवळच्या राखीव पोलीसास मागे हटणाऱ्या पोलीस तुकडीच्या मदतीसाठी पाठविलें. पुन पोलिस दलाने पवित्रा टाणला

क्रांतिसेना थबकली. वामनराव पाटील व महादेवराव पावडे अग्रभागी होते. वामनराव हीच क्रांतिसेनेची स्फूर्तिदेवता होती त्याचे पुनः 'आगे बढो'चें

स्फुरण पाहून पोलिस दलाने पुनः गोळीबारास प्रारंभ केला. एक गोळी वामनरावच्या हातावर लागली. परंतु तरीहि त्याचें पाऊल पुढेच. हें पाहून पुनः बंदुकी डागण्यात आल्या निशाण साधलें. वामनराव व महादेवराव पावडे गोळ्या लागून धराशायी झाले. सेनापति पडला हें पाहून लोकांनी कच खाल्ली त्याना माघार घेताना जखमी लोकाना उचलून नेलें. त्याना पट्या वगैरे बांधून खाटेवर घालून त्याच्या त्याच्या गावीं रवाना करण्यांत आलें. वामनरावसाठी मेणा मागविण्यांत आला पण तो येण्यास विलंब लागला. इतक्यात पोलिस अधिकाऱ्याची आणखी एक तुकडी तेथे येऊन पोहोचली. त्यानी वामनराव व पावडे याना आपल्या ताब्यात घेऊन बऱ्याच लोकांना अटक केली दहा दिवसानंतर अमरावतीच्या इर्विन हॉस्पिटलमध्ये वामनराव पाटील याचा देहान्त झाला. धवलगिरी नदीच्या तीरावर झालेल्या या संग्रामात ५१ गोळ्या झाडण्यात आल्या. त्यामुळे ५वीर शहीद झाले व २२ जखमी झाले.

१. शहीद–वामनराव बळीरामजी पाटील, इत्तमगांव—वय वर्षे २८, श्रीमंत व कुलीन घराण्यातला जन्म लहानपणापासून धाडसी. वडील बंधु आनंदराव यानी १९३० च्या जंगल सत्याग्रहात भाग घेतलेला. १९४० पासून वामनराव यानी राष्ट्रकार्याची धुरा शिरावर घेतली. वेनोडा सर्कलमध्ये क्रांतीचा वणवा पेटविण्याचे श्रेय वामनराव यांनाच दिलें पाहिजे. इत्तमगाव, लोणी, बेलोरा, सावगा इ० भागात क्रांति घडवून आणून व प्रबळ क्रांति सेना बरोबर घेऊन त्यानी वेनोडा पोलिस ठाण्यावर कशी चाल केली याचें विवरण पूर्वी आलेंच आहे त्याच्याबरोबर त्याच धाकटे बंधु श्रीराम पाटील हेहि क्रांतिसेनेंत होते, त्यांनाहि गोळी लागली व नंतर पोलिसानी बंधु आनंदराव यांना अटक करून २ वर्षांची शिक्षा दिली एकाच कुटुंबांतील या तीन बंधूंनी क्रांति आंदोलनात भाग घेतला वामनरावं याचें शौर्य, त्याग, देशभक्ति व संघटनाकुशलता याची छाप वेनोडा सर्कलवर पडली आहे.

२ शहीद–महादेवराव आत्मारामजी फदाडे, इत्तमगांव—वय वर्षे २०. शहीद वामनराव इत्तमगांवकर यांच्या नेतृत्वाखाली जी क्रांतिसेना वेनोड्याच्या पोलिस ठाण्यावर चाल करून गेली, तींत हा तरुण वीर अगदी

आघाडीवर होता. धवलगिरि नदीच्या पुलावर कातिसेनेला फौजेत धरून पोलिस दलाने जो गोळीबार केला त्यांतली पहिली गोळी आपल्या छातीवर झेलून राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी आत्मबलिदान करणारा पहिला वीर म्हणून यांचें स्मरण नित्य करावें लागेल

३ शहीद्-महादेवराव जागोबा वाघमारे, इत्तमगांव—वय वर्षे २२. लहानपणापासून व्यायामाचा नाद. कुस्तींत चांगलें प्राविण्य मिळविलेलें. महादेवराव फंदाडे यांच्याबरोबरच धवलगिरीच्या संग्रामात हे आघाडीवर होते. पोलीसची दुसरी गोळी यानी आपल्या वक्षःस्थलावर धारण केली.

८. शहीद डिगरजी लक्ष्मणजी मालपे, लाणी—वय वर्षे २९. कुलीन घराण्यात जन्म. दारिद्र्यात दिवस काढले. १९२३ पासून राष्ट्रीय चळवळीशीं समरस झाले धवलगिरीच्या संग्रामात डोळ्यावर गोळी लागून हे पडलें पडता पडताहि 'देशाला स्वतंत्र करा' 'इंग्रजानो चालते व्हा' हा एकच घोष ते करीत होते

५. शहीद्-महादेवराव भगवानजी वाघमारे, वेनोडा—वय वर्षे २३. गरीब घराण्यातला जन्म. १९३०च्या चळवळीपासून राष्ट्रीय कार्याशीं समरस झाले. धवलगिरीच्या संग्रामांत गोळी लागून पडल्यावर 'वंदेमातरम्'चा जयघोष करीत यानी प्राण सोडर।

६. शहीद्-विनायकराव दौलतराव यावले, वेनोडा—वय वर्षे २६ लहानपणापासून कष्टमय पण स्वतंत्र जीवन घालविलें. धवलगिरीच्या संग्रामांत आपल्या बरोबरचे सोबती गोळ्या लागून पडत आहेत हें पाहून हे पुढे सरसावले आणि अखेरीस स्वतःहि गोळी खाऊन शहीद झाले; पण आपलें पाऊल त्यांनी मागे घेतलें नाही.

धवलगिरीच्या संग्रामात गोळ्या खाऊन मातृभूमीच्या चरणीं ज्यांनी आपल्या प्राणांच्या आहुती दिल्या अशा वरील सहा शहीदांशिवाय १९४२च्या

आंदोलनाच्या फलस्वरूप, ज्याना आपलें जीवन समाप्त करावें लागलें अशा बेनोडा सर्कलमधील पुढील वीरांचें सादर स्मरण करणें आवश्यक आहे.

७. शहीद-रामराव लक्ष्मण गोहाड, इत्तमगांव—शिल्पकलेंत व रागोळ्याचे साचे बनविण्यात निष्णात. उत्तम कुस्तीगीर व मल्ल म्हणून प्रसिद्ध. १९३० च्या जंगलसत्याग्रहात ६ महिन्यांची स. म शिक्षा भोगलेली. १६ ऑगस्ट १९४२ च्या चळवळीच्या संग्रामात कामगिरी बजावून भूमिगत झाले. त्यानतर अटक होऊन ३ वर्षें स. म. शिक्षा झाली. तुरुगात क्षयाचा विकार जडून तो विकोपास गेल्यावर त्यांची सुटका करण्यात आली; परतु थोड्याच दिवसात त्याचा अंत झाला.

८. शहीद-शेषराव नथ्थूजी मुधोळकर, इत्तमगांव-वय वर्षें ४५. शेषराव यानी १९३० साली तळेगाव येथे जंगल सत्याग्रहात भाग घेतला होता. त्याबद्दल ६ महिने स. म. व १५० रु दंड इतकी शिक्षा भोगली होती. १९४२ ऑगस्ट आंदोलनात ता. १४ ला अटक. जनतेकडून सुटका. पुनः १६ तारखेस अटक. एक वर्ष कारावास तुरुंगात कॅन्सरचा विकार जडला. तुरुगांतून सुटल्यावर अतिशय आर्थिक विपन्नता भोगली. रोग वाढतच गेला. ता. १-४-१९४४ला देहान्त झाला. लोकप्रिय देशभक्त म्हणून लौकिक मिळविलेला.

९. शहीद-केशवराव तायोंडे, येलोरा—वय वर्षें २८. सुखवस्तु पाटील घराण्यातील जन्म. एम्. ए., एल्‌एल्. बी. पर्यंत शिक्षण. खेळ व व्यायाम यात प्रवीण. १९३६ पासून 'श्रीराम सेवा संघ' स्थापन करून त्याच्या द्वारा देशकार्यास प्रारंभ. रात्रीची शाळा, राष्ट्रीय सेवादल इ. चळवळी केल्या. १९४२ ऑगस्ट आंदोलनांत, बेनोडा सर्कलमधील जागृतींत व संघटनेंत प्रमुख सर्कलमधील १५ खेडीं स्वतंत्र करण्याची मोहीम. १६ ऑगस्ट नतर भूमिगत. तशा स्थितींत प्रकृति बिघडली. उपचारासाठी मुंबईस गेले. तेथे विषमज्वर होऊन ता. १६-४-१९४३ रोजीं मृत्यु झाला. बेनोडा सर्कलला भूषण-भूत होणारा तरुण विद्वान अशा रीतीने भूमिगत स्थितींत कालवश झाला सारी जनता हळहळली

१० शहीद-तुकारामजी रोडवा माणिकपुरे, इत्तमगाव— वामनराव पाटील यांचे हे उजवे हात १९४१ च्या वैयक्तिक सत्याग्रहात एक वर्ष सक्त मजुरीची शिक्षा भोगली १९४२ च्या आगस्ट आंदोलनात अकरा गावातून ब्रि सत्ता नेस्तनाबूद केली १६ ऑगस्टच्या धवलगिरी नदीच्या संग्रामात ठाकार व त्यानंतर अटक व ५ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा तुरुंगात विषमज्वराचा आजार झाला व तो विकोपास गेल्यावर अमरावतीच्या इर्विन हॉस्पिटलमध्ये पाठविण्यांत आलें व तेथेंच त्यांचा देहान्त झाला. हे तुरुगात असताना यांचे दोन्ही धाकटे बंधू घरीं स्वर्गस्थ झाले

बेनोडा सर्कलमधील या सर्व शहीदाच्या बलिदानामुळे इत्तमगाव, लोणी, बेलोरा, बेनोडा हीं गावें राष्ट्रीय तीर्थस्थानें बनलीं आहेत 'चले जाव' घोषणेची, अंमलबजावणी १२-१५ गावांत करून बेनोड्याचें पोलिसठाणें काबीज करण्यासाठी धवलगिरीच्या पुलावर त्यानी जो संग्राम केला तो विदर्भाच्या इतिहासात चिरस्मरणीय राहील

या सर्व शहीदांना प्रणाम ! !

-- — --

प्रकरण १३ वें

# यावलीवरील पहिलें आक्रमण
# व
# त्याचा यशस्वी प्रतिकार

माहुलीचें पोलिसठाणें सर करण्याचा विजय प्राप्त करून, पंजाबराव यांच्या आदेशाप्रमाणे परत फिरलेली जनता गांवीं पोहचली; तेव्हा ती आनंदांत गर्क होती. सकाळपासून तिने विजयामागून विजय मिळविले होते. शेवटचा विजय तर फारच महत्वाचा व बहादुरीने कमाविलेला असा होता. स्वतःच्या धैर्याचा व कर्तृत्वाचा एवढा महान आत्मप्रत्यय तिने प्रथमच अनुभवला होता. राष्ट्रीय गर्जना करीत व विजयानंदाने नाचत वागडत सर्व लोक आपापल्या घरीं पोहचले. गांवांत पोहचल्यावर पुन्हा यावलीकरानी गांधीचौकात सभा घेतली. पंजाबरावचा आदेश सर्वांना निवेदन केला आणि कसलींहि संकटें ओढवलीं तरी यावलीचें नाव जळूं द्यावयाचें नाही, असा निश्चय केला. सभेंत पंजाबरावचे बंधु विश्वासराव, मोतीरामजी लंगडे, व गोविंदराव अंबडकार यांचीं भाषणें झालीं.

ता. १६ ऑगस्टला नागपंचमी होती. सर्पासारख्या विषारी प्राण्याशींहि प्रेमाने कसे वागावें, ही या सणाच्या रूपाने भारतीय संस्कृतीची शिकवण आहे. त्यातून वऱ्हाडच्या ग्रामीणांत तर या सणाचें विशेषच महत्त्व आहे. नागपंचमीच्या दिवशीं कोणी शेतात जाणार नाही. कोणी जमीन नांगरणार नाही. सर्व काम धंदे बंद राहतील. नागोबाच्या पुजेसाठी सुटी मानली जाईल. वारुळा-वारुळातून नागोबाची पूजा होईल. दूध फुटाण्याचा नैवेद्य दाखविला जाईल. बाया नागोबाचीं गाणीं म्हणतील. खेड्यातील जनतेचा हा सणाचा, आनंदाचा दिवस ! जन्मभर वैर बाळगणारा सार !-हवें तेव्हा उलटून विष वमन करणारा

साप !—परंतु आर्यांनी–हिंदूंनी यांनाहि आपल्या प्रेमाने जिंकले. साप व मनुष्य यांचें युद्ध त्या दिवशीं संपलें सर्पराज मानवाच्या घरीं भोजनास आला. मानवानेहि त्याच्या वृत्तींत झालेल्या या पालटाची पूजा केली त्याला जेवू घातलें, आणि हें दाखवून दिलें की, जो आपली विषारी मनोवृत्ति विसरेल, त्याची आम्हीहि पूजा करू, त्याला आम्हीं देवद्वाऱ्यात बसवू

परंतु जो चमत्कार मानवाला प्रत्यक्ष सर्पांच्या बाबतींत करता आला, तो त्याला मानवयोनींतच जे दोन पायांचे साप आहेत, जे विषारी मनोवृत्तीचे प्राणी आहेत, त्यांच्या बाबतींत त्याला करता आला नाही आदल्या दिवशींच्या विजयानंदात दुसऱ्या दिवशींच्या नागपंचमीच्या सणाची भर पडली दुधात साखर पडली. सोन्याला सुगंध सुटला दरसालप्रमाणे कितीतरी आनंदाने यावलीकर ग्रामस्थ नागपंचमीचा उत्सव साजरा करू लागले खरोखरीच्या विषारी सर्पांशीहि ते प्रेमाने वागू लागले

पण गावात काही साप होते त्यांनी दंश धरला होता आदल्या दिवशीं या लढाईंत ते पराभूत झाले होते तो दंश त्यांच्या मनातून नागपंचमीच्या दिवशीहि निघेना त्यांनी आपसात षड्यंत्र रचलें. यावलीच्या या क्रांतिकारकांचा सूड उगवला पाहिजे. त्यांच्या विजयामृतात विष कालवलें पाहिजे त्यांच्या सणाचा व उत्सवाचा विचका केला पाहिजे

क्रांतीच्या प्रतिकारार्थ प्रतिक्रांति अशीच उभी राहते. बहुजनसमाजाच्या हितात प्रतिक्रांतिकारांचें हित नसतें एकाचा विजय तो दुसऱ्याचा पराजय एकाचें सुख तें दुसऱ्याचें दुःख एकाचा लाभ ती दुसऱ्याची हानि यावलीचा पाटील हा याच जातींतला प्रतिक्रांतिकारक ठरला. १९२१ च्या रंगराव बाळाजी पाटलाचा उदात्त आदर्श तो विसरला १९३० च्या यशवंत आक्काजीचेंच मीठ तो खात होता. त्याच स्वजनद्रोही परंपरेस तो जागत होता गावचें दूध तो रोज पीत होता. पण त्याच्या पोटात गेल्यावर त्या दुधाचें पर्यवसान विष निर्माण करण्यातच होत होतें आनंद आक्काजीला आदल्या दिवसाच्या प्रकारापासून चैन पडली नाही सूड बदला–कसा घेता येईल या चिंतेने त्याला घेरलें होतें त्याने मन्सुबा

केला माहोलीस जाऊन तेथील रेव्हेन्यू इन्स्पेक्टर व पोलीस याना त्याने आपल्या मसलतींत घेतलें नागपंचमीच्या दिवशींच विषारी सर्पांची टोळी तयार झाली तिने यावलीवर अकस्मात् हल्ला करण्याचें ठरविलें यावलीचें धन लुटून आपापल्या घरकुलात भरून ठेवण्याचा त्यानी बेत केला

इकडे गावकरीहि तितकेसे बेसावध नव्हते. नागपंचमीचा सण साजरा करीत असतानाहि द्विपाद सर्पांची भयंकरता ते विसरले नव्हते १९३० चा अनुभव त्याच्या हृपटलावर पक्का कोरलेला होता, म्हणून उत्सव साजरा करीत असतानाहि पुढील सावधानीच्या गोष्टी ते चर्चीत होते. पंजाबराव यानी माहोलीहून परत फिरवितांना त्याना दिलेला इषारा अगदी ताजा होता व त्यालाच अनुलक्षून ते सावधगिरीच्या योजना आखीत होते.

पहिली योजना अशी ठरली की, सदा सर्वकाळ सावधान राहिलें पाहिजे. प्रतिपक्षाच्या हालचालीवर विशेषत गावच्या सर्वांवर नजर ठेवली पाहिजे. दुसरी योजना अशी की, संकट आलेंच तर त्याची सूचना सर्वांना मिळाली पाहिजे. तिसरी योजना अशी कीं लहान मोठ्या कोणत्याहि प्रसंगीं सर्वांनी एकमेकाच्या साह्यास एका हाकेने धावून गेले पाहिजे. गावाचें ऐक्य व परस्परपोषकता हीं कायम राखलीं पाहिजेत. चौथी योजना अशी की अन्यायाचा प्रतिकार हा झालाच पाहिजे १९३० प्रमाणें या बाबतींत ढील म्हणून दिसता उपयोगाची नाही. पाचवी योजना अशी की, प्रतिपक्षाच्या प्रक्षोभाला आपण सहसा कारण व्हायचें नाहीं व आपला संयम सोडावयाचा नाही अशा रीतीने त्या अडाणी समजल्या जाणाऱ्या शेतकऱ्याना, आत्मसन्मानाचें रक्षण करण्याच्या वृत्तीमुळे प्रस्तुत परिस्थितीत कसे वागावें याचें ज्ञान प्राप्त होऊं लागलें. हें ज्ञान शिकविण्यास त्यांच्याजवळ कोणी गेला नव्हता. परिस्थितीची जाणीव आणि आत्मसन्मानाच्या संरक्षणाची तळमळ यातूनच त्याना हें ज्ञान प्राप्त होत होतें अड्ड्याअड्ड्यावर याच गोष्टी बोलल्या जात होत्या. भावी संकटाची त्यांनी जागृति ठेवली होती. त्याला तोंड देण्याचा निर्धार ते करीत होते त्यासाठी कराव्या लागणाऱ्या वर्तणुकीचे नियम ते बसवीत होते नकळत मानसशास्त्राचा खल ते करीत होते समुदाय मनाची निर्मिति होत होती. समुदायातच कल्याण आहे, समुदा-

यातच पराक्रम आहे, समुदायांतच व्यक्तीचाही अभ्युदय आहे, हा सिद्वात ते स्वयंप्रेरणेने वसवीत होते.

माहोलीस आदल्या दिवशीं आलेला जिल्हाधिकारी, आपण लौकरच मोठें दल बरोबर घेऊन येऊ, असें बोलून गेला होता. यावलीच्या बडखोरीच्या अनेकवार्ता आजपर्यंत त्याच्या कानावर गेलेल्या होत्याच. तशांत त्याने माहोली पोलीस टाण्याचा विध्वंस समक्ष पाहिला होता हें सगळें सरकारी नुकसान, या लोकांच्याकडून वसूल केलें पाहिजे यांच्यावर सामुदायिक दंड बसविला पाहिजे, असें तो ओझरतें बोलून गेला होता. परंतु तशा तऱ्हेचा लेखी हुकूम त्याने कधीच दिलेला नव्हता, हें पुढें कोर्टांतहि सिद्ध झालें आहे. हा सामुदायिक दंड बसविण्याचा अधिकार त्यालाहि वरिष्ठ अधिकाऱ्याकडून कायद्याने मिळवावा लागतो. तसा अधिकार यावलीच्या बाबतींत आपणास असल्याचेंहि त्याला न्यायालयात सिद्ध करता आलें नाही.

पण अशा तऱ्हेचें काहीतरी जें आदल्या दिवशीं बोलला, त्याचा फायदा घेऊन गावात लूट माजविण्याचं कारस्थान पाटलाने शिजविलें रेव्हेन्यू इन्स्पेक्टर, पटवारी व पोलीस याना त्यात सामील करून घेण्यात आलें. यावेळीं नेलेली यावलीची लूट सहज पचून जाईल व साहेबहि त्यामुळे खुष होईल, असा त्याचा तर्क होता व तो खोटाहि नव्हता. पुढील घटनानी हे दाखवून दिलं आहे की, १९४२ च्या आंदोलनाचा प्रतिकार करीत असतांना नि० नोकरशाहीने आपल्या हस्तकांना, पोलीसांना व खेड्यापाड्यातील अधिकाऱ्यांना, उठावणी करणाऱ्या जनतेची मनमुराद लूट करण्याची जणू काय मुभाच दिली होती.

आनंद पाटील व त्याचे साथीदार यानी आपल्या मनाशीं सहजच असा कयास बांधला की,—' जिल्हासाहेब मोठें दल घेऊन यावलीच्या बंदोबस्त करण्यास येणार आहेत.—" असें सांगितलें की, यावलीकर लोक आता भितील कारण त्यांचा पुढारी पंजाबराव हा पकडला गेला असल्यामुळे त्याना हिंमत देण्यास अथवा बंडखोरी शिकविण्यास तितका जोमदार असा कोणी माणूस यावलींत उरला नाही, म्हणून पुढारीविहीन झालेले लोक या धमकीस बळी

पडतील आणि आपण मागूं तितके पैसे आपणास देतील हे पैसे साहेबाने सामुदायिक दंड बसविला आहे, असें सांगूनच मागावयाचे. रेव्हेन्यू इन्स्पेक्टर व पोलीस बरोबर असले म्हणजे ही गोष्टहि लोकांना सहजच खरी वाटेल अशा हिशेब मनाशीं बांधून ही सर्व मंडळी दुपारीं एक वाजण्याच्या सुमारास यावलीस येऊन पोहचली. गांवकरी लोक टेहेळणीवर होतेच. पण त्यांच्या येण्याचा उद्देश एकाएकीं ध्यानात येण्यासारखा नव्हता किंयेकांची तर अशीच समजून झाली की, कोणाला तरी गिरफदार करण्याकरतां हे लोक आले असावेत. सत्याग्रही या नात्याने गिरफदारीस त्यांचा विरोधहि नव्हता, अथवा तिचा प्रतिकार करण्याचेंहि त्यांनी योजिलें नव्हतें.

त्यांनी योजिलें होतें तें इतकेंच की, १९३० प्रमाणें कोणालाहि स्त्रिया व मुलें यांच्यावर हात घालूं द्यावयाचा नाही कोणाच्याहि मालमत्तेची गैर कायदा लूट होऊं द्यावयाची नाही. अन्यायाचा असा कोणताहि हुकुम मानावयाचा नाही, आणि सर्वांवरी विशेष म्हणजे आपल्या स्वातंत्र्यध्वजाचा अपमान कोणास करूं द्यावयाचा नाही त्यामुळे पाटील, पटवारी, रेव्हेन्यू इन्स्पेक्टर व पोलीस हे जेव्हां दुपारी एक वाजतां गांवांत येऊन पोहचले तेव्हां त्यांच्यावर फक्त नजर ठेवली गांवांत आल्यावर पाटलाने आपल्या साहाय्याकरितां गांवातील कामगार महारहि बोलावून घेतले आणि पहिल्या प्रथम काय करावयाचें हें त्याने ठरविलें पंजाबराव हाच या सर्व प्रकाराच्या मुळाशीं असल्यामुळे त्याच्याच घरीं पहिल्यादा रचक बसविला पाहिजे, म्हणजे मग आपोआप सर्व गांवकरी ताळ्यावर येतील अशा समजुतीने त्याने आपला मोर्चा दलबलासहित पंजाबरावच्या घराकडे वळविला

पंजाबरावच्या घरच्या बैठकींत आधीच थोडेफार लोक जमा झालेले होते. त्याचे वडील विश्वासराव घरींच होते हे विश्वासराव देखील आदल्या दिवशींच्या सत्याग्रहांत सामील होण्यास आतुर होते. माहुलीच्या पोलीस ठाण्यावर तावा होइपर्यंत तेहि जनसमुदायाबरोबर गेले होते पंजाबराव यांना अटक झाल्यानंतर दहा सत्याग्रहींच्या मध्यें आपणासहि अटक व्हावी अशा आग्रह धरून ते बसले होते स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेण्यासाठीं या दोन बपूत झालेली ही अहमहमिका मोठी स्फूर्तिदायक होती. अखेरीस वडील बापूच्या विनंतीस मान देऊन ते घरीं परत आले होते

" सामुदायिक दंडापैकी तुमच्यावर दोन हजार रुपये बसविण्यात आले आहेत. तावडतोब रक्कम देऊन टाका "—रेव्हेन्यू इन्स्पेक्टरच्या मुखाने पाटील आनद भाकाजी बोलत होता. विश्वासराव यानी दड देण्याचें साफ नाकारलें अधिकारी धमक्या देऊ लागले—' जबरीनें दड वसूल करावा लागेल '—असें म्हणू लागले. विश्वासराव यानी पुन्हा तितक्याच निकरानें त्यांना बजावलें.—' एक पैहि मिळणार नाही. मुकाट्याने येथून निघून जा ' हें तेजस्वी उत्तर ऐकून पाटील प्रभृति चमकले. त्याच्या हेंहि लक्षात आलें की, विश्वासरावच्या बैठकींत व तिच्या आसपास असलेल्या लोकाच्या मानाने आपण अल्पसख्य आहोत आणि जोरजबरदस्तीचा उपयोग केल्यास तो आपणावरच उलटण्याचा सभव आहे. त्यापेक्षा येथून काढता पाय घेण्यातच गनीमत आहे असा विचार करून ब्रि० सरकारची ही हस्तक मडळी, स्वजनद्रोहासाठी व स्वदेश बाधवाची लूट करण्यासाठी दुसरें शहाजोग घर पाहू लागली.

विश्वासरावच्या घरीं घडलेल्या वरील प्रकाराची बातमी तावडतोब गावात पसरली. पुन्हा निरनिराळ्या अड्डयांवर निरनिराळ्या चर्चा सुरू झाल्या. लोक निश्चयाने बोलूं लागले की, गांवाची लूट होऊ द्यावयाची नाही. रुपया, पैसा तर हातीं लागूं द्यावयाचा नाहीच, पण अन्नधान्यास देखील हात लावूं द्यावयाचा नाही प्रश्न असा उपस्थित झाला की, चादी, सोनें व नाणें हीं कशीहि दडवून ठेवता येतील. पण अन्नधान्याचें अपहरण टाळणें केवळ युक्तिप्रयोगाने कठीण जाणार आहे पुढे येणारे दिवस अधिकच कठीण आहेत. तेव्हा गावच्या धान्याचा कणहि बाहेर जाऊ देणें म्हणजे गांवकरी लोकाची उपासमार करणेंच होय. जें कांही धान्य गावात असेल, त्याच्या बळावर अर्धी–सगळी सवजण मिळून खाऊ शकू व जगू शकू. पण अन्नधान्यच जर लुटलें गेलें, तर सगळ्या गांवावर उपासमारीचा प्रसग गुजरल्याशिवाय राहणार नाही, असा पोक्त विचार करून, अन्नधान्याच्या बाबतींत प्रसगच पडला तर सर्व तऱ्हेचा प्रतिकार करण्यास गावाने सज्ज असलें पाहिजे आणि ल्हानातल्या ल्हान व गरीबातल्या गरीब माणसाच्या देखील साहाय्यार्थ सर्वांनी धावून गेलें पाहिजे. एका ठिकाणीं सभा भरवून काही ही चर्चा चाललेली नव्हती निरनिराळ्या अड्डयावर विचारविनिमय होत होता. परतु समान सकटाच्या जाणिवेने सर्व ठिकाणीं समान विचारधाराच प्रवाहित

होत होती आणि अंतःकरणाच्या या समसंवेदनेने सर्व गाव, लहानथोर, गरीब श्रीमंत ऐक्याच्या एका प्रबळ सूत्रात ओवला जात होता.

पाटील व त्याचे साथीदार पंजाबरावच्या घरून त्याचे बंधू विश्वासराव याच्याकडून अशा तऱ्हेने थप्पड खाऊन निघाले. यानंतर त्यांनी रामकिसन मारवाडी यास गाठून सांगितलें की, गावावर २००० रु० सामुदायिक दंड बसला असून, त्यापैकीं ५०० रु० तुम्ही भरा. मारवाड्याने चातुर्याने उत्तर दिलें की बाकीचा दंड तुम्ही वसूल करा. माझी रक्कम त्यानंतर घेऊन जा. तेथून पुढे त्यांनी रामराव मराठा याच्या दुकानाकडे मोर्चा वळविला. रामराव मराठे यावलींतील एक मालदार गृहस्थ आहेत. त्यांचें दुकान प्रसिद्ध आहे. केवळ दुकानदारी करून स्वार्थ साधीतच जन्म कंठण्याऐवजीं थोडीफार देशसेवाहि आपल्या हातून घडावी म्हणून १९३० च्या सत्याग्रहांत त्याचे मोठे बंधू गुलाबराव यांनी भाग घेतला होता. अशा रीतीने कांग्रेसच्या तेजस्वी शिकवणुकीचे धडे त्यांनी गिरविले होते, आणि तीच शिकवण त्यांच्याकडून त्यांच्या कुटुंबियांना मिळत होती. पाटील आदि मंडळी दुकानासमोर आली. त्यावेळीं दुकानात गुलाबरावचा धाकटा भाऊ बसलेला होता. त्याच्याजवळ त्यांनी २०० रुपयांची मागणी केली. गावकरी लोक पाळतीवर होतेच. आणि पंजाबराव याच्या घरीं झालेल्या प्रकारामुळे त्याच्या हेंहि लक्षात येऊन चुकलें होतें की, रेव्हेन्यू इन्स्पेक्टर अथवा पाटील पटवारी यांच्या जवळ कोणत्याहि तऱ्हेचा दंड वसुलीचा हुकूम नाही. ते केवळ लुटीच्या उद्देशानेच पैसे मागीत आहेत. अशा तऱ्हेच्या अन्यायाने मागितला जाणारा पैसा मुळीच द्यावयाचा नाही असाहि निश्चय त्यांनी केला होता. पाटील व त्यांचे साथीदार, गुलाबरावचे घरासमोर उभे राहताच सावधगिरी ठेवून व आपलें अस्तित्व फारसें भासू न देतां लोक जवळच दबून बसले.

'दंडाची रक्कम तावडतोब भरा. नाहीतर मोठे साहेब आल्यानंतर ती वाढण्याचा संभव आहे' रेव्हेन्यू इन्स्पेक्टरच्या मुखाने पुनरपि पाटील आनंद आकांनी हाच बोलत होता. गुलाबरावच्या भावानसुद्धा रक्कम देण्यानें नाकारलें.–'जबरदस्तीने दुकान फोडावें लागेल. दुकानांतील माल उचलून न्यावा

लागेल. विनाकारण सगळया दुकानची खराबी होईल ' पुन्हा बजावण्यांत आलें इतक्या अवधींत ग्रामस्थ लोक बऱ्याच प्रमाणांत आसपास येऊन ठेपले होते आणि कांहीं झालें तरी दुकानाची लूट होऊ द्यावयाची नाही असा निश्चय ते करीत होते म्हणून मधून दुकानाकडे डोकावून पाहातहि होते.

बऱ्या बोलाने व सहजासहजीं लूट मिळत नाही, हें पाहून पाटलाने बरो बरीच्या पोलिसांना जबरदस्तीने दुकानांत घुसून माल काढण्याचा इषारा केला आणि तेहि दुकानात घुसण्याचा प्रयत्न करू लागले तोंच दुकानदाराचा कृष्णा पवार नामक भाचा एकदम समोर आला आणि त्याने दोन्ही हातानी दुकानात प्रवेश करण्याच्या दाराचा रस्ता अडवून धरला पोलीस आत जाण्यासाठी जोर करीत होते आणि तो आपली सर्व शक्ति एकवटून त्याचा प्रतिरोध करीत होता अखेरीस अशा तऱ्हेची दादगाई करून, पोलीस आत घुसले न घुसले तोंच मध माशाचे एक पोळें उठलें आणि त्या माशा रेव्हे यू इन्स्पेक्टर, पोलीस आदि जब रीने दुकानात घुसूं पाहणाऱ्या जुलमी लोकांना चाखून चावून जर्जर करू लागल्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी एकटा मनुष्य जरी उभा झाला तरी परमेश्वर त्याच्या मदतीला धावून येतो. जे स्वतः ला साह्य करतात, त्यांना परमेश्वरहि साह्य करू लागतो. पाटील व पोलीस यांच्या बळासमोर आपलें एकट्याचें बळ किती चालेल, ते पुष्कळ, आपण एकटे, ते अधिकारी, आपण खेडूत, असा दुर्बल विचार दुकानावरील त्या कृष्णा तरुणाच्या मनासहि शिवला नाही गावातील लोक मदत करतील वा न करतील, आपण आपलीच मदत केली पाहिजे, ह्या अन्याय्य लुटीचा, या जोर जुलमाचा प्रतिकार हा केलाच पाहिजे, असें ठरवून दृढ निश्चयाने तो प्रतिकारास उभा टाकल्याबरोबर, मधमाशाच्या रूपाने परमेश्वर त्याच्या मदतीस धावून आलाच मधमाशाच्या त्या भयंकर हल्ल्याने आंत घुसलेले ते पोलीस इ० घाबरून गेले व पळतच दुकानाच्या बाहेर पडले

दुकानात जबरदस्तीने घुसण्याचा प्रयत्न पाटलाचे हस्तक करीत आहेत, व दुकानदाराचा एकाकी असलेला भाचा मोठ्या धैर्याने प्रतिकारास उभा झाला आहे, ही बातमी लगेच गावात पसरली क्षणार्धात लोकांचे थवेच्या थवे त्या ठिकाणीं जमा होऊ लागले त्याचा पक्का निर्धार झाला होता की, दुकानातील

मालाचा सुतळीचा सडा देखील बदमाशांच्या व लुटारूंच्या हातीं लागू द्याव-याचा नाही मधमाशा या हल्ल्याने भयभीत होऊन पोलीस व रेव्हेन्यू इन्स्पेक्टर दुकानातून बाहेर पडले तेव्हा त्याना काय दिसले? तीनशें नरसिंह त्या ठिकाणीं उभे आहेत नदींत उतरावें तर मगर खातो, काठावर जावें तर वाघ उभा. थोड्याच वळापूर्वी दुकानदाराच्या एकट्या लहान भावावर आपल्या बलाचा गुमान दाखविणाऱ्या त्या शूर सरकारी अधिकाऱ्यांची गाळणच उडाली त्यांनी नेभूनहि पोबारा करणं दुसरी थप्पड बसली

लोक पुन्हा स्वयंप्रेरणेने पाळत ठेवू लागले कमींत कमी पांच सात हजार रुपयांची लूट तरी आपणास गावातून मिळविता येईल, जोर-डेली करून गांवा तल्या बायाबापड्याना सतावता येईल, विरोध करू पाहणारे चार दोन इसम निघाले तर त्याना पिटून काढता यईल, अशा रातीने आदल्या दिवशींच्या प्रकाराचा सूड घेता येईल, लोकांची मस्ती जिरविता यईल, वरिष्ठ अधिकाऱ्यांची मर्जी संपादन करता यईल आणि आपजाहि तलिराम गार करता येईल, अशीं मनः महमदी मनोराज्यें करीत ते गावात घुसले होते परंतु एक लाथ बसल्या बरोबर मातीच्या भांड्याचा तो ढाराचा ढाराच गन्गडला, भांडीं फुटलीं आणि मनोराज्यें त्या दिवशीं तरी धुळीस मिळाली पूर्णपणे पराजित होऊन ते परत फिरले होते फजितीचें शल्य यांच्या मनांत डाचू लागलं होतें तशात लोक पुन आपली पाळत ठेवत आहेत हें पाहून त्याचा तोल आणखीच सुटू लागला लोक पाळतीवर असल्यामुळे आपसांत बोलून मनसुबा ठरविता येईनात घरीं नावें तर तथेंहि लोक आल्याशिवाय राहाणार नाहीत म्हणून त्यांनी गावाबाहेर जाण्याचा रस्ता धरला रे० इन्स्पेक्टर, पटवारी, पोलीसहि त्याच दिशेने वळले

तरी लोक पाळत सोडीत नाहीत हें पाहून काळ शेळपटपणाच्या यमदूताच्या या सरकारी बगलबच्च्यांचीं माथीं अधिकच भडकू लागलीं पाटील पट वारी यानी दुकानासमोर असतानाच आपल्या निमची दान निवडून घेतली होती आता पोलीस शिपायांच्या जिभेला कढ सुटला त्यानी लोकाना आईच्या भापेंत अचकट विचकट शिव्या देण्यास प्रारंभ केला दुर्बळ व गरीब माणूस पनित झाला हणने त्याच्या जवळ आपला मनस्ताप शमविण्यासाठी दुसऱ्यांना

शिव्या देणें एवढें एकच साधन उरलेलें असतें. मनुष्य शिवीगाळ करण्यावर आला म्हणजे निश्चिन समजावें की त्याची हिंमत नष्ट झाली आहे, कायरतेने त्याच्यावर अंमल चसविला आहे पोलीसाची शिवीगाळ ऐकून, लोकानी सभ्यपणे त्याना शिवीगाळ न करण्यास बजावलें. पोलीसाचा पारा आणखीच गरम झाला. ते अधिकच शिवीगाळ करू लागले. एका शिपायाने उलटून लोकांच्या अंगावर धावण्याचा प्रयत्न केला. १० लोकांनी पुनः हिंदुस्थानींत खणकावले— 'खबरदार कदम उठायगा तो ! शरम नही मालूम होती गालीगलोच करनेको ? आदमी होकर हैवानियतसे पेश आते हो ! जबान बंद करो ! ' ग्याड पोलीस स्तब्ध झाला लोकांच्या स्वाभिमानापुढे व आत्मसन्मान रक्षणाच्या निर्धारापुढे त्यानी नांगी टाकली. मुकाट्याने पाटील व पोलीसदल आपला मार्ग आक्रमूं लागले आजचें प्रकरण एवढ्यावरच निभावलें. जनतेंतून तेजस्वितेचे स्फुलिंगामागून स्फुलिंग उडाले. सरकारी अधिकाऱ्याच्या नीच कारवायाचा हा हल्ला लोकानी धैर्याने परतवून लावला. काल आक्रमक लढाई ते जिंकले. आज सरक्षणात्मक लढाईंतहि ते विजयी झाले आपल्या ऐक्यातील सामर्थ्याचा प्रत्यय व आत्मविश्वास याच्या अभिमानाने त्याची मान पुनः ताठ झाली. यावलीचा अभिमान यथार्थ ठरला. आज पुन्हा क्रांतिप्रवण जनतेने शत्रूला लज्जित-पजित, पराजित करून परत फिरविलें; पण या विजयाने देखील जनतेने आपला सावधपणा सोडला नाही. याहून उग्रतर संकटाची जाणीव त्यानी जागृत ठेवली. याहून तेजस्वी प्रतिकाराच्या तयारीस ते लागले. हा सर्व इतिहास आपणास पुढील काड त पहावयाचा आहे

अत्याचारी दल अशा रीतीने परत गेल्यावर श्री. अजाबराव यांच्या घरीं पुनः सभा घेऊन लोकानी पुढील सभाव्य आक्रमणाच्या तरतुदीच्या योजना आखल्या

उन्हातान्हांत अन्नपाण्याराचून मिरवणुकींत बसलेल्या मुलांना व महिलांना खाण्यासाठी लोकांनी जे पदार्थ आणले ते धुळींत मिळवून देण्यास आणि पिण्या साठी जं पाणी आणलें त्यांत शेण कालविण्यास त्यांनी कमी केलें नाही, त्या नि० नोकरशाहीच्या व तिच्या हस्तकांच्या ठिकाणीं माणुसकीचा लवलेश देखील शिल्लक आहे असें जमेस धरण्यांत काहीच अर्थ नव्हता सर्वस्व गमावण्याची वेळ आली असता आपल्याकडून अत्याचारांची ते पराकाष्टा करतील हें स्वाभाविक होतें

१५ तारखेच्या सत्याग्रहानंतर आपल्यावर अत्याचाराची परंपरा कोसळणार ही यावलीकरांची आशंका रास्त होती यांत शंका नाही, पण अत्याचाराची परंपरा कोसळणार असें वाटून त्यांनी परिस्थितीस पाठ दाखविण्याचा भेडकपणा मुळींच दाखवला नाही गेल्या बारा वर्षांत राष्ट्रीयतेची जी संजीवनी गुटी त्यांनी भक्षिली होती तिच्यामुळे त्यांच्या ठिकाणीं दृढ प्रतिकारसामर्थ्य निर्माण झालें होतें लहानमोठे व गरीबश्रीमंत असा भेदभाव विसरून समान संकटाच्या तयारीस ते लागले होते. गावावर येणारीं संकटें हीं जर गरीबश्रीमंत स्पृश्यास्पृश्य, हिंदुमुसलमान असा भेदभाव मानीत नाहीत, तर त्या संकटाचा परिहार अथवा प्रतिकार करण्याच्या कामांत ग्रामस्थांनी तरी असा भेदभाव का मानावा? गावांत प्लेग येतो महामारी येते, तीं कोठे असा भेदभाव करतात? हा श्रीमंत, हा अस्पृश्य हा मुसलमान हा भेद जसा सांसर्गिक रोगाच्याजवळ असत नाही, तसाच तो अत्याचारास प्रवृत्त झालेल्या ब्रि० शासकाच्याजवळ देखील असत नाही म्हणून प्लेग व महामारी प्रमाणेच, ब्रि० अत्याचाराच्या वेळीं सर्वांनी भेदभाव विसरून, विषमतेला फाटा देऊन संकटाला तोंड देण्यासाठी सज्ज होणें जरूर असतें या दृष्टीने यावलींतील ग्रामीणांनी केलेल्या पूर्व तयारीचें, घेतलेल्या सावधगिरीचें व प्रकट केलेल्या पराक्रमाचें कोणीहि स्वातंत्र्यवादी माणूस कौतुकच करील हाच सर्व इतिहास आपणास आता प्रस्तुत 'हत्याकांड' त पहावयाचा आहे

लुटारू सर्पांची टोळी विफलमनोरथ होऊन परत गेल्यानंतर, १६ तारखेला कोणीहि सूचना न देतां अथवा दवंडी पिटविली गेली नसतांना ग्रामस्थ लोक स्वयंप्रेरणेने गांधी चौकांत समीलित झाले, बोलता बोलतां गांधी चौकाला सभेचें स्वरूप प्राप्त झालें या सभेत नानातऱ्हेचे विचार प्रदर्शित करण्यात

आले. विशेष म्हणजे पुढील आक्रमणापासून बचावाची तयारी कशी करावी याचाच खल झाला दोन चार पोलीस व दोन चार कामदार महार गाठून यावलीचे लोक दबत नाहीत रेव्हिन्यू इन्स्पेक्टर अथवा पाटील यांच्यासारख्या हलक्यासलक्या अधिकाऱ्यांना ते दाद देत नाहीत, म्हणून बंदूकधारी पोलिसाची मोठ्या मरुयेची टोळी गावावर पाठविली जाण्याचा समय आहे. याहि टोळीचा प्रतिकार केला, तर लष्कर येईल. गावचा गाव उध्वस्त करण्यास— नव्हे जमीनदोस्त करण्यास देखील, तें कमी करावयाचें नाहीं. या गोष्टींची कल्पना १९३० च्या अनुभवावरून त्याना येऊन चुकली होती. शिवाय वर्तमान पत्रांतून रोज नव्या व अधिक भीषण बातम्या येत होत्या १५ व १६ तारखाना यावलीस अथवा माहोलीस जरी प्रत्यक्ष गोळीबारासारखी परिस्थिति तर खासच निर्माण झाली होती. तशात सोळा तारखेस मोर्शी तालुक्यात वेनोडा मुक्कामीं गोळीबार झाल्याची बातमी आली त्यात शूर कॉंग्रेस भक्त वामनराव व त्यांचे सहा साथीदार यांच्या आहुत्या पडल्या, तेव्हा वातावरण अतिशय गरम आहे, परिस्थिति फारच तंग आहे दडपशाहीचा नग्न नाच चालू आहे, हें जाणून आपणास आपला मार्ग काढला पाहिजे, हा चर्चेचा साराश होता

परिस्थितीच्या वाढत्या भीषणतेने राखीव हितसंबधाच्या लोकाचा धीर प्रथम खचत असतो. तेच पळवाटीचा मार्ग शोधण्याचा प्रथम प्रयत्न करू लागतात. शरणागतीची भाषा प्रथम त्यांच्या अभद्र मुखांतून बाहेर पडते जो नियम सगळीकडे लागू आहे त्याला यावली तरी कशी अपवाद राहील! यावलीचेहि काही राखीव हितसंबधी अशीच कार्याची भाषा बोलू लागले गांवातील सापाची पूजा करा त्याना लाचलुचपत द्या. सामुदायिक दंड भरून टाका म्हणजे गावावरील संकट टळेल असाहि बदसूर मध्येच निघू लागला. पण वीर पंजाबरावच्या तालमींत तयार झालेले तरुण इतक्या कच्च्या दिलाचे नव्हते. वेळेवर दगा द्यावा म्हणून त्यानी इतक्या दिवसाचें सामर्थ्यप्रसाधन केलेलें नव्हतें. आखाड्यात रगडे खाऊन खाऊन त्यानीं आपलीं शरीरें व मनें पोलादाचीं बनविली होतीं सामुदायिक प्रार्थनेतून ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल त्याच्या ठिकाणीं निर्माण झालेला विश्वास इतका लेचापेचा नव्हता त्यानी हमी दिली की, आम्ही गावाचें संरक्षण करू, आमच्या जिवात जीव असेपर्यंत गावातील

गवताची काडी देखील आम्ही हलवू देणार नाही आमच्याजवळ पिस्तुल नाहीत, बंदुकी नाहीत, ही गोष्ट खरी असली तरी, आमच्याजवळ निर्धार आहे कॉंग्रेसचे नैतिक सामर्थ्य आहे म. गांधींचें आत्मबल आमच्या पाठीशी उभें आहे आत्मा हें शस्त्र आमच्या हातीं आहे साधेल तावर्यंत आम्ही अहिंसा बळानेच लढू, पण जेव्हां हें साध्य होत नाही असें दिसून येईल तेव्हां, पुढा गांधीजी यांचे आदेशाप्रमाणें स्याटासारखें पळून न जाता, ज्या ज्या साधनांचा अवलंब करणें शक्य होईल त्या त्या साधनांचा अवलंब करून आम्ही लढू, पण पाठ फिरविणार नाही. मुलांना व स्त्रियांना शत्रूचा उपसर्ग होऊ देणार नाही. गावाच्या मालमत्तेला दरवडेखोरांचा हात लागू देणार नाही. आमच्यापैकीं एकेक तरुण बळी पडेल अखेरचा तरुण लढत राहील पण पाठ फिरविणार नाही

तरुणांचा हा जोष, आत्मविश्वास, प्रतिकारार्थ आत्मबलिदानाची तयारी आणि शौर्ययुक्त स्फुरण पाहून सामान्य जनतेलाहि धीर आला तिला त्यांच्या करारीपणाचें कौतुक वाटलें त्यांच्या पराक्रमात, प्रतिकारात, धाडसात व आत्म बलिदानात सामील होण्याची भाषा तीहि बोलू लागली शरीर हिंमतबाज झाले जागच्या जागींच गर्चीत झाले गांवगंगेच्या प्रवाहात एकरूप होणे त्यानाहि भाग पडले पुन्हा एकवार सर्व गाव—गरीबश्रीमंत, हिंदु-मुसलमान—एक दिलानें प्रतिकारासाठीं कंबर बांधून सज्ज झाले

मंकरसमय प्राप्त झाला असता ग्रामीण जनांच्या मनावर उठणारे हे तरंग मोठे मजेदार असतात कालचा निश्चय आज उरत नाही अथवा अधिक दृढ होतो. समुदायमनाचें शास्त्रच अजून विकसित व्हावयाचें आहे. एवढी गोष्ट खरी की, समुदायमनाच्या ठिकाणीं अपार असें सुप्त सामर्थ्य वसत असतें व्यक्तिशः भेकड भासणारा मनुष्यहि समुदायात दिगंत पराक्रम करून जातो. एरव्हीं कृपण दिसणारा मनुष्यहि समुदायमनाच्या प्रबळ आवेगात आपल्या सर्व संपत्तीचें दान करून टाकतो एरव्ही, काटा बोचला तरी वेदनेनें विव्हळ होणारा मनुष्यसुद्धा समुदायमनाच्या आवर्तात सापडला म्हणजे रक्ताचे पाट वहात असलेले पहात असूनहि विचलित होत नाही. समुदायमनाचें हें अगाध सामर्थ्य

ओळखून तें राष्ट्राच्या कामी लावणारा एकच महापुरुष आधुनिक भारतात निर्माण झाला. तो म्हणजे महात्मागांधी होय. त्यानेच नि:शस्त्र, निराश व निद्रिस्त झालेल्या भारतीय जनतेच्या समुदायमनाला जागृत करून तिच्या ठिकाणी, महाबलाढ्य अशा ब्रिटिश साम्राज्यविरुद्ध झुंज देण्याचें सामर्थ्य निर्माण केलें. याच समुदायमनाच्या सामर्थ्याचा एक तेजस्वी असा आविष्कार आपणास यावलीच्या, प्रस्तुतच्या स्वातंत्र्य—संग्रामाच्या इतिहासात उत्कटत्वाने पाहण्यास मिळतो.

प्रतिकार करण्याचा निर्धार झाला. गावाची एक मूठ बांधली गेली. एकाचें दुःख तें सर्वांचे दुःख अशी समसंवेदना जागृत झाली बोट कापलें तरी सर्व शरीरास वेदना होत नाहीत काय ? अशा एकशारीरिक सहानुभूतीने सर्व यावली एक झाली. ऐक्याचा स्फूर्तिदायक देखावा दिसताच सर्वांना अवर्णनीय आनंद झाला युद्धाच्या गंभीरतेने पुढील व्यूह रचण्यात आले, योजना ठरविण्यात आल्या, कामगिऱ्या वाटून देण्यात आल्या. सर्वांत प्रथम ही गोष्ट ठरली की, उद्या कोणीहि शेतावर कामास जावयाचें नाही, सर्वांनी गावातच राहावयाचें. दररोजची कमाई हातावर करणाऱ्या मजुरानी जर कामावर जावयाचें नाही, तर पोट कसें भरावयाचें ? लगेच आकडे पडले. अशा तऱ्हेने दररोज मजुरीवर जाऊन हातावर कमाई करणाऱ्या कुटुंबाच्या घरीं दाळ, ज्वारी नेऊन देण्याची व्यवस्था ठरविण्यात आली दुसरी गोष्ट ठरली ती ही की, शत्रूच्या हालचालींचा पत्ता लावला पाहिजे. वित्तंबातमी समजली पाहिजे. लगेच हेरगिरी करण्यासाठी माणसें पुढे आलीं. त्याना घोडीं पुरविण्यात आलीं. या अश्वरोही स्वारांनी भाहुली तें यावलीची रपेट दिवसभर मारीत रहावें. यावलीस येणारे सर्व रस्ते टेहळींत रहावे असें ठरलें. शत्रु धोकेबाज आहे. तो कोणीकडून हल्ला करील याचा नेम नाही. म्हणून चौफेर टेहळणी आवश्यक ठरली. कोठे काही खुट्ट वाजलें, तरी गावच्या युद्ध-कचेरींत बातमी येऊन पोहचेल अशी व्यवस्था करण्यात आली शत्रूचा सुगावा लागताच तावडतोब गावांत सर्वांना इषारा देण्यासाठी विशेष वाद्याची व्यवस्था करण्यात आली

'शख, बिगुल, घण्या, टिन, डबडें जें जें काही वाजविण्यासारखें असेल तें तें वाजवीत रहावयाचें, १५ मिनिटेंपर्यंत हा घोष असाच चालू ठेवावयाचा

आणि तो ऐकताच, जर कोणी काही विशेष कामासाठी शेतीभातीवर गेलाच असेल तर त्याने तावडतोब गावांत येऊन पोहचावें आणि गावकऱ्यांनी मिळणाऱ्या सूचनेप्रमाणें वागावें असें ठरलें.

संयम शांतता व शिस्त याची आवश्यकता पुन्हा प्रतिपादण्यात आली शक्यतोंवर आपणाहून प्रक्षोभास कारण द्यावयाचें नाहीं अहिंसेचें व्रत शक्य तोंवर सोडावयाचें नाहीं पण भ्याडपणा दाखवावयाचा नाही म्हणून, निरुपायास्तव शारीरिक प्रतिकारच करण्याचा प्रसंग आला, तर बंदुकीस उत्तर देण्यासाठी तोड म्हणून गोफणी व गोटे याची योजना करण्यात आली गोट्याचे ढीग कोठे लावावयाचे, कोणत्या मोर्च्यावरून लढणें अधिक सोयीचें होईल हें ठरविण्यात आले गोफणगोट्याशिवाय जवळच्या लढाईसाठी लाठ्या, कुऱ्हाडी व भाले याचीहि योजना करण्यात आली वस्तुत बंदुकीच्या जमान्यात हीं शस्त्रें म्हणजे शस्त्रेंच नव्हत, परंतु भ्याडपणे पळून जाण्यापेक्षा प्रसंग पडला तर हीं शस्त्रें वापरून का होईना, प्रतिकार हा व्हायलाच पाहिजे, हें समजून सागण्यात आलें.

आणखी एक महत्त्वाची—अत्यंत महत्त्वाची बाब म्हणजे स्त्रियांच्या पावित्र्याचें—संरक्षण करण्याची होती स्त्री ही जोंपर्यंत आत्मसंरक्षणक्षम होत नाही, तोंपर्यंत पुरुषाकडून होणारें तिचें संरक्षण हें नेहमी अपुरेंच पडणार. पुरुष पकडले गेले मारले गेले, पळून गेले, तर स्त्रियांनी आपल्या शीलावर, पावित्र्यावर, खुशाल दरवडा पडू द्यावा काय ? शत्रूच्या हातून विटंबना होऊं द्यावी काय ? केवळ आत्मसंरक्षणाच्याच नव्हे, तर ग्रामरक्षणाच्या समान कार्यांतसुद्धा स्त्रियांना आपला वाटा काहीच उचलता येण्यासारखा नाही काय ? आपल्या पुत्रांना, बंधूना व पतींना जेवू घालून तत्परतेने ठेवण्याचें काम तर त्या करतीलच-आपल्या मुलाबाळांचें संगोपन तर त्या करतीलच. पति, पुत्र, भ्राते रणांगणावर गेल्यावर घर तर त्या सांभाळतीलच, पण प्रबळ शत्रु, त्यांनाहि मारून घरावरच चालून आला व लूट करू लागला तर ! तरीहि स्त्रियांनी अन्नपूर्णेचेंच काम करीत रहावयाचें काय ! नाहीं ! स्त्री ही अन्नपूर्णा तर आहेच पण ती दुर्गाहि आहे रणचंडीहि आहे षोडशावधि भुजांत खड्ग

घरून ती प्रहार करू शकते. 'त्वं हि दुर्गा दशप्रहरणधारिणी' हे 'वन्दे-मातरम्' गीतातील उद्गार व्यर्थच आहेत काय ?

यावलीतील महिलांची १६ आगस्टलाच एक स्वतंत्र सभा भरली होती. गावावर येणाऱ्या संकटाची चर्चा त्यांनीहि केली होती. गावाच्या इभ्रतीच्या रक्षणाचा विचार त्याहि करूं लागल्या होत्या. अन्नपूर्णेचें कर्तव्य बजावीत असतांना, रणचंडीचें स्वरूप आपणास कसें धारण करता येईल याचा विचार त्याहि करूं लागल्या होत्या. समस्त यावलीकर महिलांनी निश्चय केला की, प्रतिकार हा केलाच पाहिजे. मरण हें कांही झालें तरी ओढवणारच. पण प्रतिकारशून्य मरण ओढविण्यापेक्षा, आपले शील, पावित्र्य व सन्मान यांना कलंक लागू देण्यापेक्षा प्रतिकार करीत करीतच, सौदामिनीची चमक दाखवीत दाखवीत, दुर्गेचे खड्ग फिरवीत फिरवीत मरण आलेलें पत्करलें. यावलीचें स्त्रीत्व-जागृत झालें. त्यानें उग्र स्वरूप धारण केलें तें शस्त्र शोधूं लागले. तें त्याला चुलीजवळच सापडलें

आत्मसंरक्षणासाठीं तेलास्त्र वापरण्याचा त्यांनी निर्णय केला. कढत—उकळतें तेल नित्य तयार ठेवण्याचें ठरलें. उकळतें तेल हें एक भयंकर—अस्त्र आहे घरात शिरूं पाहणाऱ्या शत्रूला दाराबाहेरच रोखून धरण्यासाठी त्यासारखें घरोघर उपलब्ध असणारें व प्रभावी असे दुसरें साधन नाही. तिखटमिठाच्या पुड्या बांधून ठेवण्यात आल्या. तेलाच्या कढया चुलीवर चढविण्यात आल्या. प्रतिकार-युद्धांत भाग घेण्यासाठी यावलीचा समस्त महिला वर्ग तयार झाला.

हीं सर्व शस्त्रें तयार करण्यात आलीं, तर लढाई अहिंसक कशी ? असा प्रश्न विचारण्यांत येईल. पण लाठी, भाला, तरवार, कुऱ्हाड, गोफणगोटा, तिखट मिठाच्या पुड्या, कढतें तेल हीं शस्त्रेंच नव्हत. ब्रि० सरकारच्या कायद्यानें शस्त्र संज्ञेचा अर्थ केला आहे. आगस्ट युद्धाच्या वेळीं ब्रि० साम्राज्याचे पंतप्रधान असलेले मि. वुइन्स्टन चर्चिल यांनी पूर्वी एके काळीं जालियनवाला बागेतील गोळीबाराचा निषेध करण्यासाठीं पार्लमेंटच्या समारंभात केलेल्या

मापणात शस्त्र या सज्ञेची मोठी स्पष्ट व्याख्या केली आहे. सशस्त्र समाज कोणास म्हणावें ? गोळीबार केव्हा करावा ? याचे कायदे त्यांनी सांगितले त्यात त्यांनी स्पष्टपणें हें सांगितलें की ज्या समाजाच्या हातीं बारुदाच्या साह्याने उडणारें शस्त्र नाही, तो समाज नि शस्त्र समजला पाहिजे. दुसरा कायदा त्यांनी असा सांगितला की, समाज आक्रमण होऊन सरकारी अधिकाऱ्याच्या जिवासच जोपर्यंत धोका उत्पन्न करीत नाही, तोपर्यंत त्यांच्यावर गोळीबार करण्यात येऊ नये यावलीच्या जनतेनें प्रतिकाराची तयारी चालविली होती, आक्रमणाची नव्हे. यावलीच्या क्रांतिसेनेने १५ तारखेलाच आक्रमण केलें होतें व तें सफलहि करून दाखविले होतें. पण १६ तारखेपासून ती बचावाची लढाई लढू लागली होती.—

सयम व शिस्त राखून प्रक्षोभाला कारण द्यावयाचें नाही, असें तिने ठरविलें होतें, त्याचें पालन ती करीत होती. आपल्या बचावाच्या युद्धासाठी तिने जीं उपकरणें गोळा केलीं होतीं त्यात बारुदीच्या साह्याने उडणारें एकहि उपकरण नव्हतें त्यामुळे कायदेशीररीत्या तें शस्त्र या संज्ञेस पात्र होत नव्हतें, शुद्ध चार्चिल याच्या व्याख्येप्रमाणेंच पात्र होऊ शकत नव्हतें. नैतिक दृष्ट्याच विचार केला तर आत्मसरक्षणासाठी आततायी माणसाचा वध करण्याचाहि अधिकार नीतिशास्त्राने, धर्मशास्त्राने कायदेशास्त्राने व गांधीजींच्या अहिंसा शास्त्रानेहि दिलेला आहे म्हणूनच यावलीची ही बचावाची तयारी काँग्रेसची नीति व गांधीजींची अहिंसा याच्या मर्यादांचें उल्लघन करीत नव्हती, असेंच मानावें लागेल

वरीलप्रमाणे योजना ठरल्या. मानसिक तयारी पूर्ण झाली पण त्या सर्व योजना व्यवहारात कोणी आणावयाच्या ? प्रत्येक योजनेबरहुकूम कामें बरोबर चालली आहेत की नाहीं, हें कोणी पाहावयाचें ? प्रतिकार सेनेचें सचालन कोणी करावयाचें ? सारांश, या प्रतिकारयुद्धाचा सेनापति कोण ?

अशल्या युद्धात सेनापति नेमले जात नसतात ते निवडूनहि येत नसतात परिस्थितीच्या घोड्यावर स्वार होण्याची ज्याच्या अगात धमक असेल

तो स्वकर्तृत्वानेंच सेनापति बनत असतो स्वातंत्र्ययुद्धाचे सेनापति स्वयंभू असतात. असल्या स्वायंभुव सैनापत्याचे गुण ज्याच्या अंगीं असतात तो नेमणुकी अथवा निवडणुकी याची वाट पाहात बसत नाही मला सेनापतिपदाचा अभिषेक झाला आहे किंवा नाहीं याची पर्वा तो करीत नाही आणीबाणीचा प्रसंग त्याला नेहमीच आघाडीवर पाहात असतो बाकीची सेना हुकुमाविनाच त्याच्यामागे चालू लागते त्याचा हुकूम हाच सेनापतीचा हुकूम आहे असें समजून लोक त्याचीच आज्ञा शिरोधार्य मानीत असतात 'विक्रमार्जित सत्त्वस्य स्वयमेव मृगेंद्रता !'

या आणीबाणीच्या प्रसंगीं यावलींतहि असाच एक स्वयंभू सेनापति निर्माण झाला आणि तोहि मुसलमान जमातीमधून काँग्रेसच्या चळवळीत मुसलमान सेनापति ! होय यावलीचा तारीख १८ च्या प्रतिकार-युद्धाची तयारी करणारा सेनापति मुसलमान होता आणि एकटा सेनापतीच काय, पण त्या युद्धात यावलींतील कैक मुसलमान-तरुण व वृद्ध—लढाऊ झाले. हिंदुमुसलमान ऐक्याचा अपूर्व आदर्श यावलीनें घालून दिला सध्या वरचेवर राजकारणात दिसणारा व वर्तमानपत्रीय स्वभावात झळकणारा हिंदुमुसलमानांचा प्रश्न त्या तऱ्हेने खेड्यांत अस्तित्वात असूच शकत नाही हें यावलीनें दाखवून दिलें इस्लामचा सच्चा सेवक हा स्वातंत्र्यविरोधी असूच शकत नाही, स्वातंत्र्य युद्धाच्या आघाडीवरच त्याचें स्थान असावयास पाहिजे, हें यावलीनें सिद्ध केलें हिंदुबहुसंख्येच्या गावचा सेनापतिहि सहज स्पर्धेनें मुसलमानकोहि नाकें शकतें हें दृश्य यावलीला पाहाण्यास मिळालें.

झाली का, इतर शस्त्रास्त्रें बाहेर काढण्यांत आलीं कां, तरवार, भाले, कुऱ्हाडी यांच्या धारी पाजळल्या गेल्या का, कोण टेहेळे कोणत्या रस्त्याने गेले, गावचा सर्प कोठे आहे, त्याच्या काय काय हालचाली चालू आहेत, स्त्रियांचीं मनें कशीं आहेत, कोणाचा धीर तर खचत नाही ना, अशा एक का दोन, हजार गोष्टी अबदुल्लाभाई एकटाच पाहूं लागला त्या छोट्याशा गांवात मोठ्या विद्युत्चापल्याने त्याच्या हालचाली होऊं लागल्या घराघरांतून तो फिरून आला. ऐन युद्धाचा प्रसंग उद्भवलाच तर कोणी कोठे उभे राहावयाचें व प्रतिकार करावयाचा हेंहि त्यानेच ठरवून दिलें. माणसामाणसांतील कमी अधिक पराक्रम ओळखून त्याच्या त्याच्या सामर्थ्याला झेपतील अशीं कामें त्याने नेमून दिलीं प्रसंगावधान, समयसूचकता, हजरजबाबीपणा, चापल्य, कामाचा उरक पुढले धोरण ठरविणें, आगाऊची व्यवस्था घालून देणें इ० गुणांचा असा काही जोरदार आविष्कार अबदुल रहीमच्या अंगीं दिसून आला की कोणीहि तोंडातबोटच घालावें! कमाल केली अबदुल्लाभाई! असे उद्गार कोणाच्याहि मुखातून बाहेर पडावेत!! अबदुल्ला भाई हा स्वयंभू कर्तृत्वाने त्या मोहिमेचा सेनापति बनला !!!

अबदुल रहीम हा कोण्या शाळेंत लष्करी डावपेचाचें शिक्षण घेण्यास गेलेला नव्हता अथवा एखाद्या लढाईवरहि जाऊन आलेला नव्हता. स्वातंत्र्याची उत्कट तळमळ, ग्रामसन्मानाच्या रक्षणाची तीव्र इच्छा, काँग्रेसची अलोट भक्ति, या व यासारख्याच गुणांनी १६ तारखेच्या प्रकारानंतर त्याची, 'प्रतिकार युद्धाची तयारी' या एकाच विषयाशी तन्मयता झाली होती इतकी नितांत तन्मयता जेव्हा उत्पन्न होते, असा अखंड ध्यास जेव्हा लागतो, इच्छित ध्येयाच्या प्राप्तीसाठी अशी तहान-भूक जेव्हा हारपते, तेव्हाच ज्ञानरवीचा उदय होतो प्रबोधाचा प्रकाश आपोआप दिसू लागतो. कर्तव्याचें स्फुरण अनायसेंच होऊं लागतें. असतु अबदुल भाईने अवघ्या काही तासाच्या अवधींत प्रतिकारयुद्धाची तयारी परिपूर्ण केली. यावलीच्याच काय, पण समस्त भारतवर्षाच्या स्वातंत्र्याच्या इतिहासात ज्यांचीं नावें सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी आहेत त्यांतच यावली प्रतिकारयुद्धाचा सेनापति अबदुल रहीम यांचीहि गणना करावी लागेल?

*सरासरी दहा वाजलीच्या म्हणजे हाकाटेरोजाच्या कामांत गावकऱ्यांच्या*

तेजस्वितेमुळे अयशस्वी झालेले आपल्या बिळातले नागोबा हिरमुसले होऊन माहोलीस गेले. पोलीस ठाण्यावर पुनरपि त्याची मसलत सुरू झाली. यावलीचा सूड घेतलाच पाहिजे. गावाची लूट केलीच पाहिजे. आपला गेलेला वचक प्रतिष्ठापित केलाच पाहिजे. आपल्या मार्गातले काटे उपटलेच पाहिजेत

पण स्वतः हें करण्याचें सामर्थ्य त्याच्या अगीं उरलें नव्हतें. म्हणून आपल्याच ग्रामबाधवाना दडपून टाकण्यासाठी व नागविण्यासाठी परकी इसमाची–गोऱ्या–साहेबाची मदत मागण्याचें त्यानी ठरविलें. त्या दिवशीं पुन्हा जिल्हाधिकारी मेल्ड्रम याची मोटार उमरावतीहून मोर्शीच्या वाटेने जातांना त्याना दिसली. पाटील, रेव्हिन्यू इन्स्पेक्टर प्रभृतींनी मोटार उभी करविली "यावलीस भयंकर बंडाची तयारी चालू आहे. यावलीचे लोक काय काय करतील याचा नियम नाही. आमचा अधिकार सपुष्टात आला आहे. साहेबानी स्वतः येऊन बंदोबस्त केला तरच काही होण्यासारखें आहे. साहेबनी देखील एकटें येण्यात फार मोठा धोका आहे. पोलीस फोर्स बरोबर पाहिजे. बंदुकीचा फोर्स असल्याशिवाय मामला दबणार नाही."–इत्यादि अर्थाचे फूत्कार साहेबाच्या कानात सोडण्यात आले. कालच्या प्रकाराने साहेब मजकूर आधीच गरम झाले होते. इंग्रजी राज्यास घरघर लागल्याचा देखावा आधीच त्यास दिसत होता. यावलीच्या कागाळ्या आधीच त्याच्या कानावर गेल्या होत्या. त्याच्या अंगाची आग भडकविण्यास विषारी सर्पाची फूक कामयाब झाली. साहेबाने आश्वासन दिलें. 'अच्छा हम कल आयेगा. भारी आदमी लेकर आयेगा !'

याचें मनोगत सिद्ध झालें. तावडतोब आपल्या हस्तकाकरवीं यावलीत घरोघर बातमी पसरवून देण्यात आली की, उद्या डी. सी. मोठ्या जमावानें चाल' करून येणार आहे. पुन्हा तेच पूर्वीचे डावपेंच सुरू झाले. लोकानी घाबरून जावें आणि माझें नाव सांगू नका म्हणून पाटलास मुचलेप करावा. पण या खेपेस १९३० सारखे यावलीचे लोक कच्चे थोडेच होते ? उद्या डी. सी. येणार व बरोबर भारी दस्ता आणणार ही एकच बातमी ज्याच्या त्याच्या तोंडीं पसरली होती. ती ऐकून प्रथम काही वेळ गावचें गाव थोडें हादरल्यासारखे झालें. पण अब्दुल रहीम व यावलीकर तरुण मंडळींनी पुन्हा गांवाची हिंमत सावरून

घरली पूर्वनियोजित प्रतिकारयुद्धाच्या योजनेवर ते अढळ राहिले. त्या संबंधीची तयारी ते पूर्ण करीतच राहिले

१७ तारखेचा सबंध दिवस यावलीकरांनी विलक्षण प्रतीक्षेत घालविला आनंद आकाजी व त्याचे साथीदार यानीहि माहोली पोलीस ठाण्यातच मुक्काम ठोकला. एक तर गावात येण्याची त्यास लाज व भीतीहि वाटत असली पाहिजे दुसरें, साहेबास घेऊन गेल्याशिवाय रहावयाचें नाही असा त्याचा निर्धार होता त्यामुळे दुसरे दिवशी म्हणजे १७ ता० स जिल्हाधिकारी मेल्ड्म व पोलीसदल येणारच आहे व त्यांच्याबरोबरच आपण यावलीस जाऊं असा विचार करून तो माहोलीस थांबला त्याचीहि १७ तारीख ही अतिशय प्रतीक्षेत गेली यावलीकर ग्रामस्थ व आनंद आकाजी दोघेहि निरनिराळ्या कारणास्तव एकाच इसमाच्या आगमनाकडे डोळे लावून बसले

गांवांत काय चाललें आहे याच्या बातम्या आनंद आकाजी माहोलीच्या पोलीस ठाण्यात बसून काढत होता त्याचे मूठभर हस्तक गावांत फिरून बातम्या मिळवीत होते व त्या त्याला पुरवीत होते. इकडे गावकऱ्यांचे टेहेळे आनंद आकाजीच्या हालचालींवर नजर ठेवीत होते एक एक क्षण प्रतीक्षेत जात होता प्रत्येक यावलीकर पळापळाने काळ मोजीत होता काळ भयंकर कंटाळवाणा जात होता. सर्वांची मनें अतिशय अस्वस्थ व विचलित झालेली दिसत होतीं असा या भयंकर प्रतीक्षेत सबंध दिवस निघून गेला. पण शत्रु आला नाही हल्ला झाला नाही यावलीची खोड जिरली नाही. आनंद आकाजी हिरमुसला होऊन त्या रात्रीहि माहोली पोलीस ठाण्यातच झोपला

## प्रकरण २ रें

# यावलीवरील दुसरें आक्रमण



१७ आगस्टची रात्र ही सुद्धा अशीच चिंता, प्रतीक्षा, आशंका यात गेली लोकांनी प्रातःकालचे विधि उरकले पुन सर्व लोक गांधी चौकात जमा झाले गांधी चौक हेंच त्यांचें आश्रयस्थान तिरंगी झेंडा हीच त्यांची स्फूर्तिदेवता जैरामजी पाचघरे यांचे बैठकींत विचारविनिमय सुरू झाला. शत्रु आक्रमण करून येणार या आशंकेने गावचे व्यवहार किती दिवस बंद ठेवावयाचे ? शेतीचा उद्योग किती दिवस थांबवावयाचा ? शेतीवरच तर गावचा पोषण अवलंबून आहे शत्रूच्या आक्रमणाच्या भयाने शेती पडित का पाडावयाची आहे ? रिकाम्या मजुरांना आयते किती दिवस पोसावयाचे ? शेती राबविलीच पाहिजे पिकें निघालींच पाहिजेत आक्रमणाच्या भयाने कारस कारी बंद पाडण्यांत काही अर्थ नाही. जवळ असलेलें धान्य काही दिवस घरीं बसून खाता येईल पण शेतीच जर पिकविली नाही तर पुढे खावयासच काही मिळणार नाही म्हणून सर्वांनीच निव्वळ गावात बसून राहण्यापेक्षा काही तरी निराळी व्यवस्था अमलात आणली पाहिजे —वगैरे तऱ्हेने विचार सुरू झाला

शेवटीं असें ठरलें कीं, आवश्यक त्या शेतकऱ्यांनी, कामगारांनी व बायांनी शेतीवर व कामावर जावें काही निवडक लोकांनी गावात रहावें देहळणीचें काम मात्र चालूच ठेवावें आणि संकटाची सूचना मिळताच सर्वांनी ग्रामरक्षणासाठी आपापल्या शेतीवरून धावत यावें शेतावर जाण्याची ज्यांची आवश्यकताच होती त्यानाहि ही सूचना देण्यात आली कीं, त्यांनी आपापल्या दिशेने यावलीकडे येणाऱ्या मार्गावर नजर ठेवावी आणि कोणी येताना आढळल्याबरोबर शेतावरच्या लोकांना सूचना देऊन गावात बातमी देण्यासाठी तावडतोब निघून यावें

याप्रमाणें नवीन व्यवस्था ठरवून लोक आपआपल्या शेतीवर व कामावर निघून गेले. कांही गावांत राहिले. त्यानी पुन्हा अबदुल रहीमच्या नेतृत्वाखाली *संरक्षणात्मक युद्धाची जुळवाजुळव केली.* गावात जे थोडे लोक राहतील त्यांच्या बळावर देखील गाव कसा लढविता येईल याची योजना आखली गेली. गोफणी, गोट्याचे ढीग इत्यादींची पाहणी केली गेली. निरनिराळीं घरें व माड्या यांतून गोट्यांचे ढीग व्यवस्थित लावण्यात आले मारुती कलाल व बाबया मराठा याना घोड्यावरून माहुलीस पाठविण्यास आले व तेथे नजर ठेवण्याची व सकट दिसताच गावात बातमी पोचविण्याची कामगिरी त्याचेवर सोपविण्यांत आली

यावलीच्या पुरुषाप्रमाणेंच महिलानीहि शंकरराव निकाडे यांच्या घरीं आपली सभा घेतली पुन्हा संरक्षणाच्या कार्यांत भाग घेण्याचा आपला निश्चय त्यानी प्रकट केला. *कढत तेल वापरण्याचीं साधनें तयार ठेवावीत असें* पुन्हा ठरविण्यात आलें. कांहीं झालें तरी, अत्याचार होऊ द्यावयाचे नाहीत आपलें शील व पावित्र्य याचें संरक्षण करावयाचेंच. आक्रमणकारी लोकांचा प्रतिकार केल्याशिवाय रहावयाचें नाही असा महिला वर्गाचा निर्धार दिसून आला

याप्रमाणें ता १८ ची सकाळही पार पडली. लोकांचीं जेवणींखाणीं उरकलीं, पण संकटाचा कृष्ण सर्प आपला फणा उगारून उभा होता. त्याची काळी सावली गावावर पडलेली होती प्रतिकाराच्या निश्चयाने लोक जरी दृढ झाले असले, तरी चिंता सुटली नव्हती. अस्वस्थता नाहीशी झाली नव्हती. मनोवृत्ती स्थिर होत नव्हत्या. अस्थिरतेचें दुसरें एक कारण असें होतें कीं, गांवचा सर्व गांवात नव्हता त्याने माहुली पोलीस ठाण्यातच ठाण मांडलें होतें. त्यामुळे तो कृष्ण सर्पाची टोळी बरोबर घेऊन आल्याविना खात्रीने राहणार नाही असें लोकाना मनोमन वाटत होतें आनंद आकाजीप्रभुति गावचे मारेकरी साहेब येण्याची वाट पाहात होते आदले दिवशीं त्याची मोठी निराशा झाली होती साहेब मुळी आलाच नाही तर? अथवा आणखी काही महत्वाचें काम निघालें तर? आपला मनोरथ पुन्हा विफल होईल? अशी चिंता त्यालाहि व्याकुळ करीत होता

खुद्द नागपूरप्रमाणेंच रामटेक, उमरेड, आष्टी चिमूर इ० अनेक ठिकाणीं उठावण्या झाल्या होत्या. बैतूल जिल्ह्यातील गाड बिथरले होते प्रांतात अनेक ठिकाणी पोलिस ठाणीं, कोर्टकचेऱ्या, पोस्ट ऑफिसे, रेल्वेस्टेशनें, डाक बंगले जाळण्यात आले होते रेल्वेचे रूळ उखडण्यात आले होते लष्कराच्या साह्यानेच पुन: सर्व प्रांताचा ताबा घेण्याचा प्रसंग येऊन ठेपलेला होता राजधानीच्या ठिकाणीं आपल्या वरिष्ठांची चालू असलेली ही दुर्दशा अमरावतीचा जिल्हाधिकारी मेल्ड्रम यालाहि अवगत होती त्यामुळे तोहि अधिकच एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे वागू लागला होता

ता आगस्ट १९४२ दुपारच्या १२॥ वा. ची वेळ असेल, अमरावतीचे जिल्हाधिकारी मि मेड्रम, जिल्हा पोलिस अधिकारी मि ग्रँट, सार्जंट क्वीन, नायब तहसीलदार अनीक अहमद व पोलिस कॉन्स्टेबलसचें पथक इतकी सर्व मडळी माहोलीस येऊन पोहचली तेथुन माहोलीचा सब इन्सपेक्टर गोविंदराव कांबळे, रेव्हिन्यु इन्सपेक्टर, तेथील पोलिस कान्स्टेबल्स, कामदार महार, आनंद आकाजी पाटील व पटवारी हे सर्व त्यास मिळाले त्यानंतर हा सर्व जमाव वाघोलीच्या मार्गे यावलीस जाण्यास निघाला यावलीस आल्यावर यावलीचे कामदार महार त्यास मिळाले अशा तऱ्हेने सुमारें ४० इसमाचा हा जमाव यावली परत जिंकून ब्रि० सरकारला मिळवून देण्यासाठी यावलीवर चाल करून आला डे क मेल्ड्रम, डी एस पी ग्रँट व सार्जंट क्वीन यांच्याजवळ भरलेल्या रिव्हाल्व्हर्स होतीं हेडकान्स्टेबल्स व कान्स्टेबल्स यांच्याजवळ मिळून चार बंदुकी होत्या व बाकीच्या लोकांच्याजवळ लाठ्या होत्या माहोलीहून यावलीस येण्याचा जो जवळचा रस्ता तो सोडून, आक्रमणकाऱ्यांचे दळ वाघोलीच्या मार्गाने मुद्दाम येण्यास निघाले होतें

आक्रमकदल वाघोलीस येऊन पोहचताच गावकऱ्यांचे अश्वारोही टेहळे मारुती कलाल व मारुत्या मराठा यांनी त्यांना पाहिलें व तात्काळ त्यानी आपली घोडी यावलीस पिटाळली ठरल्याप्रमाणें त्यानी गांवात बातमी पोहचविली पुढे ज्या मार्गाने हें आक्रमकदल यावलीस येण्यास निघालें त्या मार्गावरील शेतकऱ्यानीहि त्याना पाहिल्याबरोबर तडक शेतातून कामें करणाऱ्या सर्व यावलीकरांना सूचना

दिली आणि सर्व शेतकरी व कामावरील स्त्रीपुरुष तावडतोब शेतांतील आपला उद्योग सोडून पूर्वसंकेताप्रमाणे गांवात धाऊन आले. येतांना वाटेंतील सर्व शेतकऱ्याना व कामकऱ्याना त्यानी गावात निघून येण्याच्या सूचना पाठविल्या

सकटाची सूचना मिळताच शख, घंटा, बिगुल, टिन, ढवळी इत्यादि वाद्याचा प्रचंड घोष करण्यात आला. सतत १५ मिनिटेपर्यंत एवढा प्रचड निनाद चालू होता की, त्यामुळे सर्व गाव तर हादरून निघालाच, पण नदीच्या परतीरावर असलेल्या नरसिंगपुरच्या लोकाना देखील तो ऐकू गेला व यावलीवर सकट कोसळल्याची जाणीव झाली. या वाद्यघोषाने यावलींत त्यावेळीं असलेले सर्व लोक एकत्र झाले, त्यानी पूर्वयोजनेप्रमाणें मोर्च्यांच्या निरनिराळ्या जागा धरल्या. घरातून व माड्यावरून गोफणमार बसले. सुमारे १०० लोक राष्ट्रध्वजाच्या सरक्षणासाठी गांधी चौकात जमा झाले. शेतीवरील लोक भराभर येऊ लागले. सकटाला न डगमगता सारा गाव प्रतिकारासाठी सज्ज होऊन प्रतिपक्षाची हालचाल काय होते तें पाहत बसला.

गांवात होत असलेला वाद्यघोष एवढा प्रचड होता की त्याने काही काळ यावलीचें आकाश हादरून गेलें. आक्रमक लोकानीहि तो ऐकला कान बधिर करणारा व हृदयें कापविणारा तो आवाज ऐकूनच त्याचीहि खात्री पटली असली पाहिजे की, जमीन कोपराने सहज खणता येण्यासारखी नाही. प्रतिकाराचा अतिशय टणक असा खडक फोडावा लागणार आहे. मामला बिकट आहे येथे धसमुसळेपणाने काम भागणार नाही, तसा नरमपणाहि कामी येणार नाही. फार सावधगिरीनेच पऊल टाकले पाहिजे

लढाई आलीच तर कोणत्या मोर्च्यावर अगोदर धावावें, याचा लोकानीहि आपल्या परीनें कयास बाधलेला होता. त्यांनी हातात लाठ्या वगैरे नसलेले कांही लोक निरनिराळ्या रस्त्यानी फिरते ठेवले गांधी चौकाच्या चारहि बाजूने मोर्चे सुसज्ज केले माड्यावरूनहि शत्रूच्या गावातील हालचालींची टेहळणी करण्याची योजना केली. शक्य तों तर गांधी चौकाच्या रोखानेच शत्रु आला पाहिजे. पजारदार याच्या घराकडे त्याने वळू नये अशा पद्धतीने कोपऱ्याकोपऱ्यावर माणसें उभीं केलीं.

प्रतिपक्षाला यावलींत एकाएकी प्रवेश करणें शक्य नव्हतें. गांवातील वाद्यघोष ऐकून तो काहीसा चमकला तर होताच, पण गावच्या नाल्यावर लाकडें टाकल्याशिवाय साहेबमंडळीस त्यातून पार जाणेंहि शक्य नव्हतें. म्हणून आक्रमकदल, यावलीजवळ आल्याबरोबर नाल्याच्या पलीकडील तीरावर रामकिसन मारवाडी यान्या शेतीचा मोठा पड होता, त्यात थबकलें. कामदार महार लाकडें नेऊन नदीवर टाकण्याच्या कामास लागले पूल तयार झाल्यावर मेल्डमप्रभृति सर्व सरकारी दल नाला ओलांडून नदीच्या पैल-तीरावर आलें व तेथे जवळच असलेल्या मैदानांत त्यानी आपली तुकडी संघटित केली. पोलीस कान्स्टेबल्स कवायती पद्धतीने रांगेनें उभे करण्यात आले त्यांच्या पुढे सब इन्स्पेक्टर गोविंदराव व रेंहिन्यु इन्स्पेक्टर, त्याच्याहि पुढे सार्जेंट ग्वीन, डी. एस पी मि. ग्रँट व डे. क मेल्डम अशी रचना करण्यांत आली. पोलिसाच्या तुकडीच्या मागे कामदार महाराची तुकडी उभी करण्यात आली. याप्रमाणें आपलें दल सुसज्ज करून सामर्थ्यशाली बि० सरकारचे खास जिल्हाधिकारी साहेब यावलीसारख्या एक ल्हानमें खेडें सर करण्यासाठी आता मोठ्या कवायती पद्धतीने व रुबाबदार रीतीनें गावांत प्रवेश करूं लागले

हा वेळ पावेतों गावहि सुसज्ज झाला होता. आक्रमकाचा पहिला आघात अंगावर घेण्यासाठी काही लोक मुद्दाम गावाबाहेर प्रतिपक्षाच्या दृष्टिपथात राहण्याइतक्या अंतरावर येऊन उभे राहिले होते. त्याच्या हातात लाठ्याहि नव्हत्या अतिशय शांतपणे जिल्हासाहेबांचा रुबाब व थाट याचें अवलोकन करीत ते उभे होते. शस्त्रधारी मनुष्याची अशी अपेक्षा असते की, नि शस्त्र माणसाने आपल्याला पाहूनच पळून गेलें पाहिजे. त्यातून तो जर आपला शत्रु असेल तर त्याने क्षणभरहि आपल्या समोर उभें राहण्याचें धारिष्ट दाखवितां कामा नये. हिंदुस्थानांत लोक असेंच वागतात, अशी मि० खिहिल सर्व्हंटांना शिकवण मिळालेली असते हिंदुस्थानी लोक भेकड आहेत आणि लाठीधारी पोलीस शिपायी जरी दिसला तरी ते पळत सुटतात, त्यांतून साहेब डोळ्यासमोर दिसला की, त्यांची अगदी गाळणच उडते इत्यादि तऱ्हेच्या गोष्टी हिंदुस्थानांत नोकरीसाठी येणाऱ्या या गोऱ्या छोकऱ्याना शिकविण्यांत

येतात. अशा तऱ्हेचे सस्कार झालेल्या मेल्डम साहेबाच्या मनाला, आपण समोर दिसत असूनहि सुमारें २५।३० हिंदुस्थानी खेडूत आपल्या हालचाली पहात शांतपणें व निर्भयपणें उभे राहूं शकतात, हें पाहून आश्चर्याचा मोटाच धक्का बसला असला पाहिजे साहेब संतप्त झाला खेड्यातील लोकाची आणि ही हिंमत ! लोकानी प्रक्षोभाचें कोणतेंहि कृत्य केलेलें नसताना त्यांच्यावर लाठी हल्ला करण्याचा पोलीसाना हुकूम झाला. लगेच डबल मार्च करीत शिपायी लाठ्या फिरवीत त्यांच्यावर चालून गेले. लोक पळून गेले. लोक इतक्या सहजासहजी पळालेले पाहून साहेबाची हिंमत चढूं लागली. पुन पोलीसदल एकत्र झालें व आक्रमकाची टोळी पुढे चालू लागली.

पूर्वेकडून त्यानी गावात प्रवेश केला. वाटेंत पहिलीच मोठी इमारत रामकिसन मारवाडी याची आहे त्याच्या माडीवर काही लोक बसले होते. गचीवरून व खिडक्यांतून ते आक्रमकांच्या हालचाली पहात होते. त्याना पाहिल्याबरोबर सार्जेंट क्वीन याने शामराव देशमुखाचे घरापासून नेम घरून माडीवर बसलेल्या लोकावर गोळी झाडली नेम चुकला गोळी भिंतीस लागून खाली पडली. अशा तऱ्हेनें लोकानी प्रक्षोभाला कोणतेंहि कारण दिलेलें नसताना सत्तापिपासू अधिकाऱ्यानी आपल्या सामर्थ्याचा कंडु जिरविण्यासाठीं शांतपणें उभे असलेल्या लोकावर पहिला लाठी हल्ला केला व पहिली गोळी झाडली. आक्रमकांनीच लोकाना प्रतिकाराच्या भूमिकेवर आणून उभें केलें. रामकिसन उर्फ बाबुशेट मारवाडी याच्या माडीवर झाडण्यात आलेली ही पहिली गोळी न्यायालयातील जबान्यात प्रगट झालेली नाही पण तिने बाबूशेटच्या घराला पाडलेलें छिद्र लेखकाने स्वतः पाहिलें आहे व ती मारताना ज्यानी सार्जेंट क्वीन यास पाहिलें असे लोक यावलींत हयात आहेत. या पहिल्या गोळीचें वृत्त ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे. कारण नसताना ती मारल्यामुळे आक्रमणाचा पहिला हल्ला सरकारी कर्मचाऱ्यानी केला होता. लोकक्षोभाला तीच कारण झाली होती, हें सिद्ध होत आहे.

---

प्रकरण ३ रें

# ता० १८ आगस्टची लढाई



याप्रमाणे पहिली गोळी घालून आक्रमकानी पुढे काय केले, कोणत्या क्रमाने कोणत्या घटना घडल्या याची संगति उपलब्ध लेखी साहित्यावरून लावणें अतिशय कठीण आहे. यावलीचा मामला यानतर न्यायप्रविष्ट झाला व हायकोर्टापर्यंत तो गाजला. त्याबाबतची सर्व हकीकत 'न्यायकांडा'त येणारच आहे. प्रस्तुत प्रकरणीं त्याचा उल्लेख करण्याचें कारण असें कीं न्यायालयात ज्या जबान्या झाल्या त्यात सरकारतर्फे झालेल्या जबान्यात यावलीची जनताच आक्रमक होती हें दाखविण्याचा पद्धतशीर प्रयत्न करण्यात आल्यामुळे त्यातून प्रतिबिंबित होणारा इतिहास विकृत झाला आहे. आरोपीं-यातर्फे जो बचाव देण्यात आला त्यात कायद्याच्या दृष्टीने आरोपींचा बचाव करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला असल्याने आरोपींच्यातर्फे जबान्याच फारशा देण्यात आलेल्या नाहीत. सारी मदार सरकारी साक्षीदाराच्या जबान्यतील विसंगति दाखवून आरोपाचें स्वरूप सौम्य करून दाखविण्यावर ठेवण्यात आली होती. स्वतंत्र होऊ पाहणारा जनता व तिला गुलामींत डाबून ठेवण्यासाठी प्रयत्नाची शिकस्त करू पाहणारें सरकार या-यात समस्त देशभर जें युद्ध चालू होतें त्यातील एक अतिशय जोरदार लढाई यावलींत घडली आणि तीन यावलींच्या जनतेने अपूर्व पराक्रम प्रकट केला या दृष्टीने 'यावली प्रकरणा' कडे पाहण्यात आले नाही. पाहणें शक्य नव्हतें असें नाही, परंतु त्यानंतरच्या काळात सर्वत्र जनतेची पिछेहाट व सरकारची सरशी झाल्याकारणाने व त्याच सरकारच्या न्यायालयात कायद्याचा लढा लढावा लागल्याकारणाने, आरोपाचें स्वरूप सौम्य करून कोर्टापुढे मांडण्यावरच आरोपींच्या वकिलांनी आपली सारी भिस्त ठेवावी हें स्वाभाविक होतें. अशी वस्तुस्थिति असल्यामुळे न्यायकोर्टात निर्माण झालेल्या कागदपत्रांच्या आधारें यावलीच्या ता० १८ आगस्टच्या तेजस्वी लढाईचा क्रम व वास्तविक स्वरूप मांडणें कठीण झालें आहे

आता काळ बदलल्यानंतर यावलीचे लोक या एकंदर लढाईचें जें स्वरूप सांगतात, तेंच न्यायकोर्टातल्या उलट सुलट जबान्या व तपासण्या वाचल्यानंतर अधिक प्रामाणिक आहे असें वाटू लागतें म्हणून लोकांनी समक्ष सांगितलेली हकीकत घटनास्थलाची वरील दृष्टीनें लेखकानें केलेली पाहणी आणि न्यायालयातील कागदपत्रें इतक्या सामग्रींतून ता १८ आगस्टच्या यावलातील लढाईचा क्रम व संगति लावण्याचा लेखकानें प्रयत्न केला, आणि तोच प्रस्तुत प्रकरणात प्रतिबिंबित झाला आहे

डे० क मेल्ड्म, डि एस् पी ग्रँट, सार्जंट क्वीन, नायब तहसीलदार अनिक अहमद, पोलीस सब इन्स्पेक्टर गोविंदराव व पोलीस कान्स्टेबल्स, कामदार महार पाटील पटवारी व रेव्हिन्यु इन्स्पेक्टर याच्या तुकडीनें गावांत प्रवेश केला तोच असा की, दरारा बसविण्याच्या पद्धतीनें लष्करी चाल ते चालू लागले पंजाबराव यावलीकर यांच्या घरावरच त्यांचा पहिला रोख असणें स्वाभाविक होतें, पहिली गोळी झाडून आपण कोणत्या घराला जाऊं शकतो हें त्यांनी दाखविलें होतें एरव्हानें लोक धावत गेले तर त्यांना गावची लूट करण्यास हवी होती सामुदायिक दंड वसूल करण्यास अनुकूल वातावरण निर्माण करण्याच्या हेतूनें आगम यावलीस गेलों होतों असं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मेल्डम याने पुढे न्यायालयात दिले या आपल्या जबानींतहि म्हटलें आहे हा दंड १५ आगस्टला करण्यांत आलेल्या ' उत्पाती कृत्यां ' बद्दल ( Sabotage ) वसण्यात आला होता, तो बेकायदा कसा होतो हें पुढे आलेंच आहे १५ आगस्टच्या सत्याग्रहाचें नेतृत्व पंजाबराव यांनीच केलें होते पाटील व रेव्हिन्यु इन्स्पेक्टर १६ ता ला लूट करण्यास गेले तेव्हा त्यांनी पंजाबराव याच बंधु विश्वासराव यानाच २००० रु दंड भरण्यास सांगितलें होतें तेव्हा १८ ता. च्या या सरकारी तुकडीचा रोख त्याच्याच घराकड असणें स्वाभाविक होतें, हें सहज ध्यानात येईल.

म्हणून गावांत शिरल्यावर ते प्रथम एकदमच गांधी चौकाकड न जाता आनंद आकाजी पाटील याच्या घरापर्यंत गांधी चौकाचा रस्ता सोडून पुढे गेले व तेथे त वळकले, तेथून ??? ??? ??? ??? ??? ११ ता

ला करण्यात आली होती ती समक्ष दारसून साहेबाचा पारा अधिक चढवावा असा आनंद आकाजीच्या चेत असावा, म्हणून त्याने त्याना तिकडे वळविलें परंतु राजारामजी पाचघरे याच्या घराजवळ कही लोक जमले आहेत हें दिस ताच ते त्या लोकावर धाऊन गेले लोक पळून गेले म्हणून ते अजाबराव पाटील याच्या घराजवळ आले, तेव्हा त्याना राधाबाई पाचघरीणच्या घराजवळ पुन्हा लोकाचे आवाज ऐकू येऊ लागले म्हणूनच अजाबराव पाटलाच्या घराजवळून ते पुन्हा लोकावर चालून गेले व लोकाना त्यानी पळत जाण्यास ओरडून सांगितलें. लोकातून वारकाजी तडस यानी रणरणीत जबाब दिला— 'नहीं भागेंगे.' लढाईच्या आव्हानाचा पहिला जबाब लोकानी धैर्याने दिला

सरकारी दळ नत्थु बाबाच्या घराजवळ येऊन पोहचले. आता तें पूर्ण पणें गावात येऊन पोहचलें होते बाहेर रसद कुमक काही नव्हती गावातील लोक अजूनहि शातच होते लोकाची व त्याची मूठभेट अजून कोठेच झाली नव्हती हे फिरत तसतसे लोक फिरत हे चालून गेले की, लोक वृकनीतीचें अवलंबन करून पळून जात पण पुन्हा त्याच्या मागे मागे जमा होत 'हम नहीं भागेंगे' हा जबाब वारकानी तडस यांनी ज्या ठिकाणीं दिला तेथूनच लढाईचा पुढील क्रम बदलला पंजाबरावच्या घराकडे जाण्याचा मार्ग सोडून लोकाना दहशत बसविण्यासाठी प्रथम त्याच्यावर चाल करून जाण्याची जरूरी या जबाबाने निर्माण केली लोकाचे आवाज जिकडून जिकडून येत होते तिकडे तिकडे चाल करून पोलीसदल जाऊ लागलें राधाबाई पाचघरीनच्या घरा वरून ते मोतीसा तेली याच्या दुकानासमोर आले व तेथून त्यानी पुन्हा बदुकीचें दोन आवाज काढले. हेतु हा की लोकानी भ्यावें, पण लोक भिण्या ऐवजीं उलट गोळा होऊ लागले व 'साहेब लोक आले'—'साहब लोक आले' असे आवाज करू लागले या आवाजाच्या मागोमाग जाण्यामुळे सरकारी दलास गांधी चौकाकडेच आपला मोर्चा वळविणें भाग पडलें पंजाबरावच्या घराचा मार्ग य रा सोडावा लागला स्वतः हुलींच्या व हालचालीच्या डाव पेचात लोकाचा पहिला उद्देश तर सफल झाला

मेन्डूमप्रभृति आकमक गाधी चौकात जाऊन पोहचले तेव्हा तेथे किती लोक जमलेले होते याचा सरकारी सुशिक्षित साक्षीदारानी दिलेला अदाज मोठा

मनेदार आहे कांही पढीक लोकानी एकमुखाने ५०० लोक जमले होते म्हणून सांगितलें, तर कांही लोकांनी ज्याना पढविण्यात आलें नव्हतें त्यांनी ५० ते १०० लोक असावेत असा अदाज सांगितला 'लोकानी केलेला हा जमाव बेकायदा असून लोक जर जमाव सोडून गेले नाहीत तर जबरीने तो मोडावा लागेल असा हुकूम देण्यात आला होता काय?'—या प्रश्नाला जबाबदार सरकारी साक्षीदारानी 'असा हुकूम देण्याला अवकाशच नव्हता' असा जबाब दिला नि सरकारच्या कायद्याने प्रस्थापित झालेलें राज्य त्याच कायद्यानुसार चालविण्याची जबाबदारी ज्या डेप्युटी कमिशनरवर होती त्याने लोकांचा जमाव बेकायदा घोषित करण्याचीहि दक्षता बाळगली नाही. या न्यायालयाच्या बाहेर आलेल्या गोष्टी येथे ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत. तुमचा जमाव बेकायदा ठरविण्यात आला आहे असें अगाऊ घोषित न करताच तो लोकांना 'भाग जाव' म्हणत होता व लोक 'नही भागेंगे' असा जबाब देत देत या गल्लींतून त्या गल्लींत जात जात गांधी चौकात जमा होत होते

गांधी चौकात तिरंगी ध्वजाखाली ५०० लोकांचा समुदाय जमा झाला होता, ही सरकारी साक्षीदारांची जबानी पढीक आहे. वस्तुस्थिति अशी आहे की, झेंड्याखाली अवघे पाच पन्नासच लोक होते आणि गांधी चौकाकडे येणाऱ्या वाडींच्या रस्त्यावर गल्ल्यातून, तेथील घरातून व दुकानातून लोक समुदाय निरखून जमलेला होता. गांधी चौकाच्या रस्त्याला लागल्यापासूनच लोक पळून जात नाहीत हें पाहून आक्रमकानींच त्यांच्यावर वेत मारण्यास सुरवात केली लोक पळूं लागले पण आपापल्या घराकडे नव्हे मार खाऊनहि ते गांधी चौकाकडेच जाऊं लागले त्यांच्यावर वेत व लाठ्या यांचे मार करीत आक्रमकहि उत्तरेच्या बाजूने गांधी चौकाच्या तोंडाशी जाऊन पोंचले.

तेथे गेल्यावर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मेल्डूम, डी. एस. पी ग्रँट व सार्जेट बवीन हे तिघेहि त्वेषाने लोकांवर तुटून पडले व हातातील शिकारी काठ्या व वेत यांचे जबरदस्त तडाखे मारूं लागले काही लोक मार खाऊनहि तेथच थांबले. काहींना माराचे तडाखे असह्य झाले अगदी हातघाई वर प्रसंग आहे असें पाहून त्यांनी पळत घरीं जाऊन लाठ्या घेतल्या व पुन्हा ते गांधी चौकात जमूं लागले.

यानंतरच लढाईला तोंड लागलें. डी. सी., डी. एस. पी. व सार्जंट यांनी गांधी चौकाच्या तोंडाशी असलेल्या लोकांवर लाठ्या व वेत यांचा तडाखेबंद मारा सुरू करून त्यांना मागे रेटण्यास सुरुवात केली गांधी चौकात प्रवेश केल्यावर तेथे तिरंगी ध्वज डौलाने फडकत आहे व त्यांच्याखाली लाठ्या घेऊन काही लोक उभे आहेत, असें पाहून त्याचें पित्त अधिकच खवळलें. हिंदी स्वातंत्र्य-संग्रामाचें तिरंगी ध्वज हें प्रतीक होतें. हें प्रतीकच लोकांच्या गौरवाचें, आदराचें व सन्मानाचें स्थान बनलें होतें. त्याच्या रक्षणासाठी यावलीचेंच काय, समस्त भारतवर्षाचे लोक लढत होते. या प्रतीकातले हें सामर्थ्य ओळखून तें नष्ट करण्याचा प्रयत्न मि० सरकारचे हस्तक जागोजागीं करीत होते घराघरावरील तिरंगी ध्वज उपटून टाकण्यात येत होते. नागपुरला या तिरंगी ध्वजाच्या रक्षणासाठी कित्येक चकमकी झडल्या होत्या. सौ. सुभगाबाई काशीकर या एकट्या तरुण महिलेवर गोऱ्या टॉमिजनी, तिने आपल्या घरावरील तिरंगी ध्वज काढून टाकावा म्हणून, हल्ला केला व तिच्या छातीशीं संगीन रोखली तरी तिने ध्वज काढून टाकण्याचा इन्कार केला टिळक विद्यालयाच्या श्री आप्पाजी तिजारे याच्या किराणा दुकानावरील तिरंगी ध्वज जबरीने काढून नेण्यात आला लढा न्यायालयात चालून तिजारे विजयी झाले व त्याच्या दुकानचा ध्वज त्यांना परत मिळाला. ध्वजाचें हें प्रतीक पाहून गोऱ्याचें पित्त अधिकच खवळत असे तसें तें यावलीसहि खवळलें यात अस्वाभाविक काहीच नव्हतें ध्वज डौलाने फडकत आहे व त्याच्याखाली त्याच्या रक्षणाच्या निर्धाराने लोक हातात लाठ्या घेऊन उभे आहेत, आपण लाठ्या व वेत यांचा इतकावर मार करीत आहोत हें ध्वजाखालील लोक पाहत आहेत, पण आपली जागा सोडीत नाहीत; हें पाहून त्याच्या रागाचा पारा अधिकच भडकला.

झेंड्याच्या खाली उभ्या असलेल्या लोकाच्या रोखाने डी. एस पी मि० पॅट यांनी गोळ्या झाडण्यास सुरुवात केली. एक गोळी गोविंदराव अंबडकार यांचे पोटास चाटून भिंतीस लागली. आणखी एक गोळी तुळशीरामजी अंबडकार याच्या हातातील लाठीस लागून खाली पडली. तुळशीरामजीवर त्याने दुसरी गोळी झाडली ती त्याच्या डोक्याला चाटून गोळी डी. एस. पी ने गोळ्या

मारण्यास प्रारंभ केलेला पाहून सरकारी दलातील इतर लोकानीहि गोळ्याचा वर्षाव सुरू केला आता मात्र लोका या शातीचा भग होऊ लागला सहन-शीलतेचा अत झाला एक तर त्यांसारखे पडून तरा जावें, किंवा हातातील साधनानी प्रतिकारास प्रारंभ करावा अशी त्याची मन स्थिति होऊ लागली लाठीप्रहार व गोळीबार य चें हें हिडिस स्वरूप पाहून त्याचा सात्त्विक सताप भडकू लागला. गावी चौकातील गोळीबाराची वार्ता सगळीकडे पसरली आता सरक्षणात्मक प्रतिकार सुरू केल्याशिवाय गत्यतर नाही असे जनतेने ठरविलें त्यांच्याजवळ उपलब्ध असलेल्या साधनानी त्यांनी मोर्चेबंदी केली नदीवरील लाकडें काढून फेकून देण्यात आला गांधीचौकातून बाहेर जाणारे व गावच्या बाहेर जाणारे रस्ते रोखून धरण्यात आले यानंतरच्या लढाईचा निर्णय गांधी चौकातच लागला पाहिजे असा लोकानी निर्धार केला गांधी चौकाला तर रणक्षेत्राचें रूप प्राप्त झालें

तुळशीराम अवडकार यास एक दोन गोळ्या मारूनहि तो झेंड्याखालील आपली जागा सोडीत नाही हें पाहून डी एस. पी ग्रँट यास आणखीच त्वेष आला. तो जातीने झेंड्यावर चालून गेला आणि झेंड्याचें अपहरण करण्याच्या हेतूने त्याने ध्वजारतभास हात घातला स्वातंत्र्याचा नारायण सव जडाजड, चराचर, वस्तूत भरला होता हिरण्यकश्यपूने खाबास लाथ मारल्याबरोबर प्रल्हादाचा नारायण जसा नृसिंहाच्या रूपाने त्या खाबांतूनच प्रकट झाला तद्वतच ध्वजस्तम्भास ग्रँटने हात लावल्याबरोबर तुळशीरामजी अवडकार यांच्या अगात नृसिंहाचा सचार झाला त्यानी एक झडप घालून ग्रँट याची कवर धरली व त्यास जमिनीवर लोळवून ते त्याच्या छातीवर बसले

प्रतिकाराची ठिणगी पडली तुळशीरामजींच्या रूपाने प्रकट झालेला नृसिंह आता प्रत्येक यावलीकरांच्या अगात सचार करू लागला इकडे सार्जंट क्वीन लोकांना वेताचे तडाखे मारीत होता. त्याने महादेवराव श्रीखडे यांना बेदम मारलें गावी चौकाच्या कोपऱ्यावर असलेल्या मंदिराजवळ मारीत मारीत त्याने त्याना रेटलें तोंच मागून रामचद्र भोजने व बापुराव खासबागे याच्या उड्या क्वीनच्या अंगावर पडल्या एका झडपेंत त्यानी त्यास जमिनी

वर लोळविलें व्वीनच होपदृवास उठाले त्याची सारी मदाधता क्षणार्धात ताळ्यावर आली तो लोकांच्या गयावया करू लागला विनवून व हात जोडून तो सांगू लागला "मी इंग्रज नाही मी हिंदुस्थानीच आहे. हिंदुस्थानी बाईच्या पोटींच म झा जन्म झाला आहे मला मारू नका मला माफ करा मी यापुढे काही करणार नाही"—लोकांनी त्याला उचलले व विहिरीजवळ नेऊन ठेवल त्याला बजावण्यात आल का,–"तुला आम्हीं कैद केलें आहे तू येथून हालता कामा नये" या वेळेपासून पुढे पळून जाईपर्यंत कीन एखाद्या कैदा चोरासारखा विहिरीजवळच उभा राहिला त्याने कैदेचा स्वीकार केला त्याला जिंकल्याची खूण म्हणून लोकांनी त्याचा टोप हिरावून घेतला व विहिरींत फेकून दिला टोपावरच वचावली असा आनंद त्यानेहि मनातल्या मनातच उपभोगला

गोळीबार चालूच होता एक गोळी लागून मारोतराव काडलकार घायाळ होऊन चौकातील दुकानासमोर खाली पडला धळधळा रक्त वाहू लागलें गांधीचौकातील रणचंडीला रक्ताचा अभिषेक सुरू झाला मोतीराम वडोने नामक तरुण मुलाला गोळी लागून तोहि पडला तिसरी गोळी वर वर्णिलेल्या गोविंदराव अवडकार याच्या पोटास लागून तोहि पडला जनतेचा एक मोहरा धराशायी होऊ लागला राष्ट्रध्वजाच्या सरक्षणासाठी यावलींतील एकेक हिरा बळी पडू लागला गोळ्यांचा वर्षाव होत होता टपटप लाख मोलाचा वीर जमिनीवर पडत होता रक्ताचा पाट वाहू लागला होता पण राष्ट्रध्वजाच्या सरक्षणासाठीं उभे असलल्या वीरांतील एकहि मागे हट-ण्यास तयार नव्हता. ध्वज तशान डौलाने फडकत होता

तुळशीराम अवटकार यानी डी एस पी प्रॅट यास जमिनीवर लोळविलें व ते त्याच्या छाताडावर चढून बसले हें पाहून गोविंदराव सब इन्स्पेक्टर त्याच्या मदतीस धावला त्यासरशी बापुराव रासवाने व रामचंद्र भोजने हे तुळशीरामजींच्या मदतीस धावले त्यांनी सब इन्स्पेक्टरला घेरलें चारचया मार्गाने त्याला जमिनीवर लोळविलें त्याचेहि हाडें नरम करण्यात आलीं परंतु बाकीच्या पोलीसांनी तुळशीरामजी अवटकार यांच्यावर चढून लाथा व

खेचून त्यांना त्यांनी नि शस्त्र करून टाकलें होतें. सार्जेंट व डी एस पी याना पकडलें होतें. डी एस पी चें रिव्हाल्व्हर काढून घेऊन विहिरीत फेकून दिलें होतें. लढाई रंगात येत होती. साहेबास बरोबर घेऊन यावलीची रग जिरविण्यासाठी येणाऱ्या नायब तहसीलदार, रेव्हिन्यु इन्स्पेक्टर, पाटील आनंद आकाजी, पटवारी इत्यादि दिवाभीतांची गाळण उडाली होती. यांची लढाई साहेब लढत होता. हे नुसती मौज पहात होते.

अजून पूर्ण विजय मिळालेला नव्हता. प्रतिपक्षाचा खरा मोहरा अजून मोकळा होता. डेप्युटी कमिश्नर मेल्डम याची मारगिरी चालूच होती. तोच आक्रमकांचा खरा पुढारी होता. यावली जिंकून बि० राज्यात समाविष्ट करण्याची जबाबदारी त्याचीच होती. त्यामुळे त्याचा पाडाव होईपर्यंत लढाई संपणार नव्हती व लोकहि हें जाणून होते.

रणांगण मोठ्या पध्दतशीर रीतीने सजलें होतें. प्रतिपक्षाच्या गोळ्यांना बळी पडलेल्या वीरांना ताबडतोब उचलून नेऊन त्यांच्या घरीं पोचविण्यात येत होतें व मलमपट्टी करण्यात येत होती. जणू काय शुश्रूषापथकच शिकवून तयार करण्यांत आलें आहे!! लाठ्या व गोळ्यांच्या वर्षावांतहि हें कार्य चालूच होतें.

मोतीराम वडोने यास गोळी लागून तो पडल्यावर शुश्रूषापथकाच्या लोकांनी त्यास उचलून त्याच्या घरीं नेलें. त्याच्या वृद्ध पित्याने तरुण पुत्राचें हें अपूर्व बलिदान पाहिलें. पुत्राची ती स्थिति पाहून वृद्ध पित्याचें हृदय विदीर्ण झाल्याशिवाय कसे राहील! पण तो भ्याड, शोक करणारा बाप नव्हता. जयरामजी हा शूर पिता होता व आपल्यासारख्याच शूर पुत्रास त्याने जन्म दिला होता. सत्तर वर्षांचा म्हातारा, पुत्राचा तो आसन्नमरण देह पाहून कांही बोलला नाही. तो फक्त उठला. त्याने लाठी हातात घेतली आणि असाधारण वेगाने तो रणांगणावर धाऊन आला.

त्यावेळी डेप्युटी कमिश्नर मेल्डम/ हा लोकांना मारीत मारीत गांधी चौकातून पुढे पुढेच जात होता. वजीरमाईच्या घराच्या ओसरीने चालू करून

पुढे जात असताना त्याने त्या गोळ्या मारल्या त्यातलीच एक गोळी मोतीराम यास लागली होती याप्रमाणे जवळून नेम मारून तो पुढे चालला. वजीर माईच्या घराजवळ येऊन तो क्षणमात्र थांबत नाही, तितक्यात मोतीरामचे वृद्ध वडील जैरामजी हातात लाठी घेऊन मैदानात आले. ते मैदानात आले ते वेगाने लाठी फिरवीतच ! त्या सत्तर वर्षाच्या म्हाताऱ्याचा त्यावेळेचा तो आवेश व त्याच्या लाठीचा तो वेग पाहून जिल्हाधिकारी मेल्डम साहेब यांनी पाचावर धारण बसूं लागली. तो राजाराम कुंभाराच्या घराकडे मागे मागे हटू लागला एवढ्या वेळात वृद्ध जैरामजीच्या महावेगशाली लाठीचे दोन तीन तडाखे तर साहेबास बसलेच पण ते ओझरते बसले. कसाबसा तोल सावरीत तो पुन्हा मागे हटू लागला. समोर जैरामजी वाघाच्या आवेशाने चाल करून येत होता. मागे कुंभाराचा पजावा ( आवा ) होता आता अधिक मागे हटणें अशक्य झालें. त्या खेडुत वृद्धाने तरुण व तडफदार साहेबालाहि कोंडीत पकडलें व आपल्या हातातील लाठी गरगर फिरवून असा एक तडाखेबंद झोडगा जिल्हा साहेबाच्या डोक्यावर लगावला की, त्यास आपल्या पितरांचेंच स्मरण व्हावं. हिंदी खेडु-ताच्या एका तडाखेबंद प्रहाराने, नि. साम्राज्य सरकारचा अमरावती जिल्ह्या-चा हा आधारस्तंभ कोसळला व कोलमडत कुंभाराच्या आव्यात जाऊन आदळला. त्याच्या भाग्याने त्यावेळीं आवा गरम नव्हता. पुत्राच्या रक्ताने व्यथित झालेल्या वृद्ध पित्याच्या हातचा तो तडाखा होता. हजार हत्तींचे बळ गोळा करून धावत आलेल्या वृद्धाने आपल्या अंतःकरणातून व हृदयाच्या रक्तांत भिजविलेल्या लाठीचा तो तडाखा होता साहेबाची सारी धुंदी निमिषांत खलास झाली. डोक्यावरील टोप गडगडून पडला. चष्मा गळून पडला. शुद्ध हारपली आणि साहेब महाशय रक्तबंबाळ होऊसाने कुंभाराच्या आव्यात लोळत पडले आजच्या मोहिमेतला नि. सरकारचा अव्वल दर्जाचा पुढारी गारद झाला. सत्तर वर्षाच्या एका वृद्धाच्या शौर्याने अगेर मात केली आणि गांधी चौकातील लढाई पूर्णपणें जिंकून घेतली.

डेप्युटी कमिशनर मेल्डम यांची ही दुर्दशा पैदी झालेले सार्जंट फीन व डी. एस. पी. प्रट हे अविरत होऊन पहात होते. आनंद आकाशी प्रभृति दिवाणीतें अजून मार्गीच दडली होती. स्वातंत्र्यध्वज डौलाने फडफडत होता.

घायाळांना उचलून नेण्यात येत होतें. लोकांचा प्रतिकार केवळ संरक्षणात्मक असल्याने तीनहि साहेब नामोहरम झाल्यावर लोकहि क्षणमात्र सामोप्त झाले होते. इतक्यात मेल्ड्मला शुद्ध आली. धुळीने भरलेले आपले अंग झटकीत तो उभा राहिला. आपले साथीदार विकल नजरेने गांधी चौकाच्या उत्तरेकडील घोळान्या विहिरीजवळ उभे असलेले त्याने पाहिलें. रक्ताचे ओघळ त्याच्या अंगावरून वहात होते. त्याच्या फौजेंतील डी. एस. पी, सार्जेट, सब-इन्स्पेक्टर व काही कान्स्टेबल्स जखमी झाले होते. जनतेच्या प्रतिकाराचें हें रुद्र स्वरूप पाहून ते जागच्या जागींच गारठले होते. मेल्ड्म तसाच पळत निघाला तों लोकांनी पकडून त्यासहि विहिरीजवळ इतर दोघांजवळ उभा केला. त्यासहि कैद करण्यात आल्याचें सांगण्यात आलें. लोकांनी त्याच्या हातातील छड्या व शिकारी काठ्या काढून घेतल्या आणि प्रचंड विजय घोष केला. 'म. गांधीकी जय', 'तिरंगी झेंडेकी जय ' 'इन्किलाब जिंदाबाद' च्या गर्जनांनी सारें गांव दुमदमून गेलें. जनतेला मोठें बलिदान द्यावें लागलें. पण अखेर जयश्रीने तिलाच माळ घातली.

विजय पदरात पडल्याबरोबर लोकांनी बेफामपणा पत्करला नाही. नीतीच्या, अहिंसेच्या, सभ्याचारान्या मर्यादा ओलांडल्या नाहीत. त्यांनी त्या सर्व अधिकाऱ्यांना बजावलें की,—'तुमच्याशीं आमचा कांहींच द्वेष नाही. तुमचा उपमर्द करावा, वेइज्जत करावी, अशी आमची इच्छा नाही तुम्ही जनतेचे अधिकारी म्हणून वागा आणि क्रांतीच्या जयघोषात सामील व्हा.' जनतेचें म्हणणें ऐकण्याशिवाय त्यानाहि दुसरी गति उरली नव्हती. त्यांनी जनतेबरोबर जयघोष करण्यात भाग घेतला परिस्थितीचा अति बिकटपणा आता त्याच्या पुरेपणीं ध्यानात आलेला होता. यावलीचें पाणी त्यांच्या प्रत्ययास आलें होतें. क्रांतीच्या रंगांत यावलीची जनता किती रंगून गेली आहे हें त्यांनी अनुभवलें होतें हा अनुभवहि सहज विसरण्यासारखा नव्हता. यावज्जन्म त्याची आठवण विसरण्यासारखी नव्हती. त्यांची दंडनीति, त्यांचें सामर्थ्य, त्यांच्या लाठ्या व बंदुकी सान्या व्यर्थ ठरल्या होत्या. इतक्यात सब इन्स्पेक्टर गोविंदराव याने पुन: लोकांच्या रोखाने हालचाल करण्याचा प्रयत्न सुरू केलेला पाहून डे. क. मेल्ड्म याने त्याला रोखलें प्रसंग बाका होता.

म्हणून त्यानी आता सामनीतीचा अवलंब करण्यास प्रारंभ केला डेप्युटी कमिशनर मेरह्म स्वत भाषण करू लागले. त्याने झालेल्या एकूण प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली जनतेच्या शौर्याचें व विजयाचें अभिनंदन केलें. लोकाच्या सभ्याचाराची व चातुर्यपणाची प्रशसा केली आणि शेवटीं मोठ्या कळकळीने अशी विनंति केली की "आता लोकानी आमची सुटका करावी व आम्हाला परत आमच्या गावीं जाऊ द्यावें यावलीकरानी आमचे प्राण वाचविले आणि एवढी प्रखर लढाई देऊनहि द्वेषभावरहित वृत्तीने व आदर भावनेने ते आमच्याशीं वागले याबद्दल त्याचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत आम्ही आपल्या गावीं जातों तुम्हीहि शातपणे आपल्या कामाला लागा'

मोकळे सुटल्यानतर आम्ही मुकाटपणें यावली सोडून अमरावतीला परत जाऊ असें आश्वासन मेरह्म यानी दिल्यानतर, तुमची सुटका करण्यात आली आहे असें लोकाच्यातर्फे त्याना सागण्यात आलें लोकाची प्रामाणिक समजूत ही झाली कीं, अधिकाऱ्याच्या वृत्तींत आता खरोखरच फरक पडला आहे. प्रतिकाराच्या तेजाने डोळे दिपल्यामुळे ते शुद्धीवर आले आहेत आणि आश्वासन दिल्याप्रमाणे दगाफटका न करता ते परत जातील. त्याच्या आश्वासनाने लोक शात झाले होते. त्यानी आपणहून लढाई अगावर घेतली नव्हती. त्याच्या स्वाभिमानास अधिकाऱ्यानीच डिवचलें होतें त्यानीच त्याच्यावर आक्रमण केलें होतें त्यानीच त्याना प्रतिकार करण्यास भाग पाडलें होतें अशी परिस्थिति असल्यामुळे लोकानी आपल्या शौर्याचें पाणी दाखवून दिलें, पण साहेबानी शरणागति पत्करल्यानतर आणि मुकाट्याने निघून जाण्याचें आश्वासन दिल्या नतर मुद्दाम भाडण लाबविण्याच त्याना कारण नव्हतें त्यांना शातताच हवी होती आणि अहिंसकवृत्तीचा त्यागहि त्यानी केलेला नव्हता तसें जर नसतं तर नि० सरकारचे तीन तीन बडे अधिकारी हातात गवसल्यानतर विवेक नष्ट झालेल्या, बेफाम बनलेल्या, तोल सुटलेल्या लोकानी प्रकरणें कोणत्या थरास नेलें असतें हें सागण्याची गरज नाही. यावलीच्या लोकानी शूरता दाखविली, पण अत करणाची समता ढळू दिली नाही आणि मोठ्या संयमाने व शिस्तीने वागून विजय मिळविल्यानतरहि प्रतिपक्षाची बेअदबी न करता त्याच्या आश्वासनावर विश्वास ठेवून त्याला मुक्त केलें व गाव सोडून जाण्यास परवानगी दिली

---

## प्रकरण ४ थें

# तिरंगी ध्वजाची लढाई



विजयानंदात लोक गर्क होते आपल्या औदार्याचा अभिमान त्यांना अधिक फुलवीत होता बहुतेक सारा समाज गांधी चौकाच्या उत्तरेकडील मशीदीं मंदिराच्या आसपास जमा झालेला होता. म. गांधींच्या नावाने जय जयकारामागून जयजयकार चालू होते धोका होण्याची कोणालाच कल्पना नव्हती. पराभूत झाल्यानंतर शरण आलेला शत्रु खरोखरच मुकाट्याने परत जाईल अशी लोकांची अपेक्षा होती पण ती विफल ठरली शत्रूने धोकेबाजी केली शरण आल्याची भाषा ही केवळ एका विशिष्ट अडचणीच्या प्रसंगातून सुटण्यासाठीं योजलेली युक्ति ठरली साम्राज्यशाहीचे हस्तक इतक्या लवकर पराभव मानायला तयार नव्हते त्यांच्या रायफलींची खाज अजून जिरली नव्हती. अग्निवमन करण्यासाठी अजून बरींच काडतुसें शिल्लक होतीं विजयानंदाच्या भरात लोकांनी त्यांना पुरतें नि शस्त्र केलेले नव्हतें

खुषामतीची, शरणागतीची व पश्चातापाची भाषा वापरून लोकांच्या हातून आपली व आपल्या साथीदारांची सुटका करून घेतल्यानंतर व अशा रीतीने लोकांना बेसावध केल्यानंतर डेप्युटी कमिशनर मेव्हम हा आपल्या साथीदारांसह व पोलिस दलासह जाण्यासाठी म्हणून परत फिरला सुमारें २५–३० कदम मागे गेल्यानंतर थबकून सर्वांनी विचारविनिमय केला झालेल्या पराभवाचा सूड घेण्याची वृत्ति पुन्हा त्यांच्या ठिकाणीं डोकावू लागली पराभवाचा सूड हा घेतलाच पाहिजे !! त्यांनी निर्धार केला

झालें इतक्या बलिदानाने यावलीच्या रणचंडीचा संतोष झालेला नव्हता. इतक्याशा बलिदानाने प्रसन्न होण्याइतकी स्वातंत्र्यदेवी सुलभ नाहीं आणखी एकवार यावलीच्या जननेकडून प्रतिकाराचें दिव्य घडवून आणण्याचा तिने

निश्चय केला त्याशिवाय यावलीच खरें तेज प्रकट होणार नाही, यावलीच सोनें किती बावनकशी आहे याची त्याशिवाय परीक्षा होणार नाही असेंच जणू काय तिला वाटलें !

रायफली व रिव्हाल्व्हर्स भरण्यात आली धाड ! धाड !! गोळ्या मागून गोळ्या सुटू लागल्या शहीद तुळशीराम तडस गोळी लागून पडला रामचंद्र भोननेंहि पडला. यानंतर, धडाधड कोणाच्या हाताला तर कोणाच्या छातीला, कोणाच्या पोटाला तर कोणाच्या डोळ्याला गोळ्या लागू लागल्या अकस्मात् झालेली घोरेगजा लोकांच्या ध्यानात आली आता या आमना सामना युद्धात उभें राहणें म्हणजे निव्वळ मरण ओढवून घेणेंच होतें

लोकांची पळापळ सुरू झाली जाणाऱ्या लोकांनी जखमी लोकांना उचलून नेलं क्षणमात्रात गांधी चौक निर्जन बनला प्रतिपक्षानें आपला पवित्रा बदललेला पाहून लोकांनीहि आपला पवित्रा बदलला आता गनिमी काव्याचें युद्ध सुरू झालें आता गोफणीचें शस्त्र अमलात येऊ लागलें त्यांच्या बाजूनी दगडाची बरसात सुरू झाली इतका वेळ माड्यांवर व घरात बसलेले राखीव वीर आता लढू लागले साहेब चमकला, चरकला यावलीस जातीनें येण्यात आपण आपल्या आयुष्यात फार मोठी चूक केली असेंच त्याला जन्मभर वाटत राहील

प्रतिपक्षानें केलेली ही उघड उघड भोसवाजी पाहून साऱ्या गावभर एकच हाका सुरू झाला 'मारा' 'मारा' 'मारा' 'मारा' चा मारा सारखा साहेबाच्या कानावर आदळू लागला आता पलक्ष मागे सरकण्याचा प्रसंग त्याच्यावर आला होता परंतु गांधीचौकात डौलानें फडकत असलेलें तिरंगी निशाण त्याच्यानें पहावत नव्हतं त्याचें अपहरण करण्यासाठी थोड्यावेळा पूर्वीच डी एस पी ग्रँट यानें दोन बळी घेतले नव्हते काय? त्याचें अपहरण करण्याचें कर्म करीत असताना तुळशीराम अचट्कारानें त्याला नारसिंह दाराकृत जमीनदोस्त केलें नव्हतें काय? तिरंगी ध्वजाचें हें शल्य त्याच्या काळजाला घरें पाडीत होतें गांधी चौक आता निर्जन झाला आहे हें पाहून त्याला दुर्बुद्धि सुचली त्या तिरंगी ध्वजाचे मर्यादशी तो आपल्या पराक्रमानें अपहरण करू शकला नाही तो आता चोरून आणण्याचें त्यानें ठरविलें त्यानें गांधी चौकात पळत

जाऊन ध्वज चोरून आणला आणि पुन्हा तो आपल्या दलांत सामील झाला. ध्वज रेव्हेन्यू इन्स्पेक्टरजवळ देऊन पुन्हा तो हत्याकांड गाजवूं लागला.

जनतेपैकी कोणाचें तरी ध्वजाकडे लक्ष गेलें. स्तम्भावर ध्वज नाही. गावात एकच आरोळ माजला. 'झेंडा दुष्मानाने नेला' 'झेंडा आणला पाहिजे. ध्वज हा आपल्या गावाची इज्जत आहे. ती परत मिळविलीच पाहिजे. शत्रूच्या हातातून ध्वज सोडविलाच पाहिजे. आम्ही मघाशी गांधी चौकात लढलों तें व्यर्थच होतें काय? आम्ही इतकें बलिदान केलें तें फुकट घालविण्यासाठी काय? अशा तऱ्हेने शत्रूला झेंडा नेऊं देण्यासाठीच आतापर्यंत आम्ही आपल्या शौर्याचा सडा सांडला काय? नाही! आम्ही आपला ध्वज नेऊं देणार नाही., पुन्हा बलिदान करूं. पुन्हा रक्त सांडूं. पुन्हा लढाई देऊं. हातघाईची लढाई करूं. पण ध्वजाच्या रूपाने गांवाची इज्जत जाऊं देणार नाही. यावलीला कलंक लागूं देणार नाही.'—

'या दुसऱ्या लढाईत घराच्या आडून व माड्यावरून गोफणींच्या साह्याने लढणारा एकेक वीर हातांत लाठ्या गोफणी व भाले घेऊन पुन्हा मैदानावर येऊं लागला. गोफणमार जबरदस्त होऊं लागला. शत्रु कासावीस होऊन मागे मागे सरकूं लागला आता तो पळूंहि लागला. मोतीरामजी तेली यांच्या दुकानासोरच्या चव्हाट्यावर तो आला, तेव्हा त्याचयावर चारही बाजूंनी गोटमार बरसूं लागली. तीन रस्त्यानी तरुण मंडळी येताना दिसू लागली. पुन्हा त्याने रायफलींत काडतुसे भरलीं. पुन्हा गोळ्या मारण्यास प्रारंभ केला. मोतीरामजी पचघरे यास पोटांत गोळी लागून तो शहीद झाला. त्यासरशी नत्थुजी लंगडे यांनी त्याला उचलून पाचघरेच्या बैठकींत ठेवलें. भैय्यीरामजी वाखनकार पडला. तुळशीराम टेकाडे गुढग्यावर घायाळ झाला. अभिमानजी यावलेच्या तोंडावरच गोळी लागली. राष्ट्रध्वजाच्या मुक्ततेसाठी बाहेर पडलेला एकेक वीर पुन्हा कामास येऊं लागला.

आपला एकेक वीर पडतो आहे, यावलीच्या गळ्यांतील एकेक मोती गळतो आहे हें पाहून लोकांचा त्वेष आणखीच भडकला. त्याच्या गोफणी अधिक वेगाने काम करूं लागल्या. शत्रूच्या डोक्यावर, पाठीवर, पायावर, हातावर, मस्तकावर दगडामागून दगड लागूं लागले. शत्रू घायाळ होऊं

लागला अधिक सुरक्षित जागा तो शोधूं लागला. अल्पावधींतच स्वतःचा बचाव करण्याची आवश्यकता त्याला भासूं लागली. मोतीरामजी तेली याच्या दुकानापासून पळत जाऊन त्याने राधाबाई पाचघरीनच्या घराचा कोपरा गाठला आणि तेथून पुनः त्याने गोळ्या झाडण्यास प्रारंभ केला. लोक आवा गाधी चौकाच्या बोळांतून पुढे येऊं लागले. विहिरीपाशी डोकावून गोटमार करावी व गोळ्या येऊं लागल्या की भिंतीआड लपून रहावे असा क्रम सुरु झाला. पण झेंडा कसा हस्तगत होणार? त्यासाठी धैर्याने पुढेच गेलें पाहिजे. साक्षात् झोंबाझोंबी केल्याशिवाय झेंडा परत मिळविता येणार नाही. लक्ष्मण कलाल पुढे सरसावला पण गोळी खाऊन पडला. गणपत यावलेने हिंमत केली त्यासहि गोळी लागली. बळीराम बोराळेने धाडस बांधले. त्याची ही तीच गत झाली. गोटमारींत बापूराव खाटीक याने विलक्षण कौशल्य दाखविलें. त्याचे असंड परिश्रम पाहून त्याच्या घरच्या लोकांनी त्यास घरांत नेऊन कोंडून ठेवलें. पण तो दार फोडून बाहेर धाऊन आला व पुन्हा आपल्या गोफणीचा प्रसाद प्रतिपक्षाला देऊं लागला.

दक्षिण दिशा खरोखरच यमाची दिशा ठरली. तिकडून पुढे येणारा प्रत्येक वीर धराशायी झाला.

हें पाहून पश्चिमेकडील तरुण पुढे सरसावू लागले. पश्चिमेकडून येणारा आघात पाहून शत्रु आणखी मागे सरकला. राधाबाई पाचघरीनच्या घराजवळून मागे सरकून तो तिच्या कोठ्याच्या कोपऱ्यावर आला; आणि तेथून पुनः पवित्रा बांधून व निशाण साधून मारगिरी करू लागला. राजारामजी पाचघरे याच्या घराकडून लोक सरसावू लागले. उदेभानजीच्या कोठ्यापर्यंत नारायण खवले येऊन पोहचला. हें पाहून त्याच्यावर नेम धरून गोळी मारण्यांत आली. पण ती त्याच्या लाठीस लागून निसटली व मागील भिंतींत शिरली. नारायण खवलेची गोळी चुकलेली पाहून त्याच्यावर दुसरी गोळी मारण्यात आली. नारायण एकटाच पुढे चाललेला पाहून त्याच्या मदतीस कृष्णराव पवार व रघुनाथ देशमुख धावून येऊं लागले होते. दुसरीहि गोळी नारायण खवले याने चुकविली, परंतु ती कृष्णराव पवार याच्या डोळ्यावर लागून रघुनाथ देशमुखच्याहि खांद्यास चाटून गेली. पुढे जैराम वासनकर येत होता. त्याच्याहि हातास एक

गोळी लागून तो जखमी झाला कृष्णराव पवार पडला हें ऐकून त्याचे मामा रामराव टाकोने यानी एक भाला हातात घेतला व ते घराच्या बाहेर पडले व पाटलाच्या घरावर चालून गेले 'कुठे आहेत ते साहेब लोक?'–रामराव विचारू लागले इतक्यात पटवारी त्याना दिसला पण तो त्याचा बल्लमधारी अवतार पाहताच पळून गेला

पुन्हा एकवार रणांगणावरून जखमी वीराना उचलून नेण्यासाठी शुश्रूषापथक धावलें भराभर जखमी लोक उचलण्यात येऊ लागले या खेपेस शुश्रूषा करण्याची व त्याना मलमपट्टी बांधण्याची कामगिरी यावलीच्या भगिनींनी अंगावर घेतली जखमी वीराना त्या सांत्वन देऊ लागल्या इकडे गावा या पश्चिमेच्या बाजूने लांबच्या शेतावर गेलेल्या लोकाना आतापर्यंतो गावावर कोण अनर्थ गुजरत आहे याची सूचना मिळाली ते तसेच शेता तील आपआपली कामें टाकून गांवात धाऊन आले ताज्या दमाची नवी कुमक गावास मिळाली पुन्हा सर्वांचा जोष चढू लागला लोक संघटित होऊं लागले पुन्हा एकवार आक्रमण शत्रूवर गोफणगोट्यांचा चौफेर मारा सुरू झाला

कृष्णराव पवार हा यावलीकरांचा आवडता तरुण होता. १६ तारखेला आलेल्या दरवडेखोरांच्या टोळीचा त्यानेच हिंमतीने प्रतिकार केला होता त्यामुळे घराघरांतून त्याच्या बहादुरीचीं स्तोत्र गायलीं जात होतीं आज पुन्हा त्याने परकीय चोरापासून आपल्या राष्ट्रध्वजाची मुक्तता करण्यासाठी हिरीरीने रणांगणावर पाऊल टाकलें होतें. शत्रूच्या गोळीस तो बळी पडला होता 'हुतात्मा वीरोंकी जय' हा त्याचा गोळी लागून पडल्यानंतरचा जयघोष लोकांच्या कानांत दुमदुमत होता त्याचें बलिदान पाहून लोक अधिकच खवळले याप्रमाणे लागोपाठ तीन वीर पडले तरी बारकार्जी तडस हा पुढेच जात राहिला बंदुकींच्या गोळ्या चुकविण्यात त्याने जी शिताफी दाखविली तिचें स्मरण झालें म्हणजे यावलीकर अजून मुग्ध होतात असें म्हणतात की, एकट्या बारकाजीला अनुलक्षून आठ दहा तरी गोळ्या मारण्यात आल्या पण त्या सव त्याने चुकविल्या व आपल्या गोफणीचा मार करीत अखेरपर्यंत तो आघाडीवरच राहिला

पुन्हा गोफणगोट्यांची जोरदार मारगिरी चौफेर सुरू झाली राघोबाइ पांढरीच्या गोठ्याच्या मागे दडली मगुला सुरक्षित वाटेनासी झाली.

तो आणखी मागे पळू लागला. पळत पळत त्याने आनंद आफ्राजी पाटलाच्या घराच्या मागील दारास असलेल्या पायऱ्या गाठल्या. दार बंद होतें. दगडांची चौफेर वरखात सुरूच होती. आपल्याजवळ शिलकी असलेल्या गोळ्या आता किती थोड्या आहेत याची कल्पना यऊ लागल्यामुळे शत्रूची अधिकच गाळण उड लागली. पाच गेले आणि सात राहिले अशी त्याची स्थिति होऊ लागली. तो निकडीनें पाटलाच्या घरात सरक्षण घेण्याचा प्रयत्न करू लागला.

पाटीलबाई घरातच होत्या. गावात चाललेला प्रकार त्याना कळला नसेल काय? आपल्या पतीने घडवून आणलेलें हें आक्रमण व केलेला प्राम-द्रोह त्यास पसत असेल काय? आक्रमण व प्रत्याक्रमण, लाठीमार, गोफणमार, व गोळीबार याचा दणदणाट व धडधडाट त्याना ऐकू यत नसेल काय? आपल्या गावातील उडालेल्या रक्ताच्या चिळकांड्या आणि तरुण मुलाचे होत असलेले खुनामागून खून त्यास दिसत नसतील काय? या सर्व गोष्टी पाहून व ऐकून त्यांच्याहि हृदयात कांही कालवाकालव होत नसेल काय? आपल्या गावार येऊन रक्ताचा सडा सांडणाऱ्या या लोकाना घरांत प्रवेश करू द्यावा की नाही याबद्दल त्यांच्या चित्तावर कांहीच तरंग उठत नसेल काय? पाटलीण बाईच्या या विशिष्ट प्रसंगींच्या मनोव्यापारानें पृथक्करण करण्याचा प्रयत्न करणें मनो-रजक होणार आहे. परंतु तो पृथक् विषय आहे. प्रस्तुत ठिकाणीं संदर्भ इता-काच की एका बाजूने पळपुटे शि अधिकारी दार उघडण्यासाठी अत्यं-ताकुळया करीत होते, तर दुसऱ्या बाजूने दार उघडण्यास विलब होत होता. प्रसंग अतिशय कठिण होता. दार उघडण्यास लागणारा पळाचा विल पळपुऱ्याचा जीव कासावीस करीत होता. अखेरीस असें म्हणतात की, पाट-लाने फारच विनवण्या केल्या आणि पतीच्या आज्ञेनुसार त्या आर्यस्त्रीने दार उघडून देशद्रोह्याना घरांत घेतलें.

ते घरात घुसत होते. इतक्यांत लोक जवळ येऊन ठेपलेच. गोंधळाचा पर्याव सुरू झाला. घासलेट तेलाचे डबे शोधण्याची भाषा याच वेळीं बोलले जाऊ लागली. क्रियकांचा त्वेष इतका कळसास जाऊन पोचला की, पाटलाचें घरचें घर फुकून देण्याची गोष्ट ते बोलू लागले. परंतु लोकांनी संयम राखला. आततायीपणा केला नाही. पाटलाच्या घरांत गेल्यावर आक्रमकानी घरादा

माडीवरून पटवाऱ्याच्या मुखाने लोकाना शांत राहाण्याचा उपदेश केला. पटवारी काहीतरी बोलतो आहे हें पाहून त्याचें बोलणें ऐकण्यासाठी राजारामजी पाचघरे पाटलाच्या घराच्या मागील बाजूजवळ गेले. पटवारी शांततेचा उपदेश करूं लागला. राजारामजींनी त्यास स्पष्टपणें सांगितलें की,—'तुम्ही लोकाचा झेंडा चोरून आणला आहे. त्यामुळे लोक भडकले आहेत. झेंडा परत केल्याशिवाय ते मुळीच शांत होणार नाहींत. झेंडा तावडतोब परत करा.' परंतु ही गोष्ट त्या हट्टी अधिकाऱ्याना रुचली नाही. झेंड्यासहित पाटलाच्या घरांतून पलायन करण्याचा ते विचार करूं लागले.

पाटलाच्या घरीं पाणी वगैरे पिऊन त्यानी पलायन करण्याचा विचार पक्का ठरविला. लोकांची गोफणमार चालूच होती. झेंड्याची गोष्ट गांवभर पसरली होती. लोकसमाज उत्तरोत्तर अधिक क्षुब्ध होत चालला होता एक तर सरकारी दलाने उघड धोकेबाजी केली होती. आम्ही परत जातों असें आश्वासन देऊन त्यानी लोकाच्या अटकेंतून आपली सुटका करून घेतली व पुन्हा लोकांवरच उलटून गोळीबार सुरु केला होता. दुसरें लोकांना प्राणाहून प्रिय असा त्याचा तिरंगी ध्वज त्यानी चोरून आणला होता. ध्वज खरोखरच लोकाना प्राणापेक्षाहि कसा प्रिय होता हें, त्याच्या मुक्ततेसाठी त्यानी आतां पर्यंत जें बलिदान केलें, त्यावरून सिद्ध झालें होतें. तेव्हा लोकसमाजाला प्रक्षुब्ध होण्यासाठी प्रबळ कारणें होतीं. लोकक्षोभाचें हें वाढत्या प्रमाणातील रौद्र स्वरूप पाहून आणि आपल्याजवळील काडतुसें किती मर्यादित उरलीं आहेत हें ध्यानात घेऊनच मेल्ड्रमप्रभृति आक्रमणकाऱ्यांनी आता चोरून पळून जाण्याचा नामुष्कीचा विचार ठरविला होता. मघा लोकांनी त्यांना सन्मानाने सोडून दिलें होतें व तेव्हाच निघून जाण्यांत त्यांची भलाई व माणुसकी होती. पण माणुसकीला त्यानी केव्हाच फाटा दिलेला असल्याने आता चोरासारखें पळून जाण्याशिवाय त्यांना अन्य गति उरलेली नव्हती—असतु.

झेंड्याचा आरोळ सर्व गावभर झाला. पाटलाच्या घरांतून पळून जाण्याचा प्रयत्नहि गावकरी लोकाच्या ध्यानांत आला. पाटलाच्या घराच्या मागच्या बाजूला जो समाज जमूं लागला होता तो अधिकाधिक उतावीळ होत होता. पाटलाच्या घराचीं दारें तो ठोठावूं लागला. दरवाजे फोडा, पोलीसांना

पकडा, धराला आग लावा—असेंहि कित्येक ओरडू लागले क्षणाक्षणाने आपलें जीवित धोक्यात आहे, हें आतील पळपुट्याच्या ध्यानांत आलें, त्यांनी ताबडतोब पाटलाच्या घराच्या खिडकींतून ज्या बाजूने लोक दिसत नव्हते त्या बाजूने केशवरावच्या घरात उड्या मारल्या व रस्ता गाठून ते पळूं लागले. तरी लोकांना त्यांची चाहूल लागलीच राजारामजी पाचघरेप्रभृति लोक तडक त्या बाजूला जाऊन त्यांचा पिच्छा करूं लागले. रेव्हिन्यु इन्स्पेक्टर याजवळ झेंडा आहे असें पाहून राजारामजी पाचघरेनीं त्यास पकडलें व अखेरीस झोंबा-झोंबी करुन त्याचे जवळून झडा हिसकावून घेतला व ते आपल्या घरीं निघून आले.

इकडे मेल्डम प्रभृति मडळी पाटलाच्या घरातून उड्या मारून गावाच्या बाहेर पळून जात आहेत ही बातमी पुन्हा गांवभर पसरली. राजारामजी पाचघरे यानी झेंडा काबीज केला आहे हें कळण्याच्या आतच झेंडा सोडवून आणावयाचाच, या निश्चयाने गावातील दोन तीन जमाव पळपुट्या सरकारी अधिकाऱ्यांचा पाठलाग करूं लागले

गोळ्या वेताच्याच उरल्या होत्या त्यामुळे थोडा वेळ पळावें, पुन मागे वळावें, एखादा गोळी जमावावर झाडावी व समाज थबकला, म्हणजे पुन पळावें असा क्रम आक्रमकानी सुरू ठेवला या पाठलागांत नत्थुजी रावले हा खांद्यावर गोळी लागून दडला साहेब मडळी व त्याचे अनुचर कसेबसे नदीपर्यंत येऊन पोहचले होते. अशा रीतीने राष्ट्रध्वजासाठी झालेल्या या दुसऱ्या लढाईतहि यावलीची जनता जिंकली व त्रि० सरकारचे अधिकारी पूर्णपणे पराभूत झाले पलायनाचा मार्ग स्वीकारून त्यानी पराभव कबूल केला यावलीचें शौर्य अप्रतिम ठरलें राष्ट्रध्वजाची इभ्रत कायम राहिली व त्रि० सरकारची सारी इभ्रत व दरारा आमनासामना लढाईत धुळीस मिळाला.

## प्रकरण ५ वें

# मुसलमान पितापुत्रांचा पराक्रम

'झेंडा घेऊन शत्रू पळाला'—अशा एकच आरोळ गावभर उठत होता झेंडा जाऊ देणें ही नामुष्कीची गोष्ट आहे असें प्रत्येकास वाटू लागलें.

यश्ला भागलेला राजारामजी पांचपरे झेंड्याची मुक्तता करून व झेंडा घेऊन आपल्या घरी गेला आहे याची कोणालाच जाणीव नव्हती प्रत्येकजण झेंड्याची सुटका करण्याच्याच फिकीरीत होता गांवातील सामर्थ्यशाली तरुणांचा बराच मोठा भाग आतापर्यंत लढून थकला होता. त्यांच्यापैकीं कितीतरी वेचक वीर कामास आले होते. कोण पडला, कोणास जखम झाली, कोणास मलमपट्टी करावयाची आहे इत्यादि बातम्या गावांत पसरत होत्या

गावांतील तरुणांनी अशा तऱ्हेने आपलें तारुण्य राष्ट्रध्वजाच्या रक्षणा साठीं व मुक्ततेसाठीं सार्थकीं लावलं आहे हें पाहून सत्तर वर्षांचा म्हातारा मुसलमान फकीर अकबरशाहा हा पुढे सरसावला त्याने तरुण कार्यकर्त्यांना व वीरांना विश्रांति देण्याचें ठरविलें, आणि गांवातील बर्वीचा समुदाय जमा करून आपल्या ध्वजाच्या सुटकेसाठीं, पडून जाणाऱ्या मेल्ड्रम प्रभृति अधिका ऱ्यांचा पाठलाग करण्याचें त्यानें ठरविलें मोठ्या त्वेशाने तो लोकांना घेऊन नदीच्या रोखानें धाऊन आला आणि पळपुटे लोक गोपणीच्या टप्प्यांत आलेले पाहतांच त्याने जबरदस्त मारा सुरू केला

यावलींत चाललेल्या गोळीबाराचे आवाज नदीच्या पैलतीरावर अस लेल्या नरसिंगपुरच्या लोकांना ऐकू जात होते त्यावरून यावलींत चालू अस लेल्या प्रकाराची कल्पना त्यांना येऊ लागली होती. पधरा तारखेच्या सत्या ग्रहात त्यांनी यावलीकरांबरोबर भाग घेतला होता १८ तारखेला यावलीवर ओढवलेल्या संकटाची जाणीव होऊन गोळीबार प्रकरणातहि यावलीची मदत करण्याचा त्यांनी निर्धार केला नरसिंगपुरनेहि लोक जमा झाले. त्यांनी कुऱ्हाडी, लाठ्या इत्यादि उपकरणें हातीं घेतलीं आणि मोठा जमाव करून यावलीकरांच्या साह्यार्थ ते धावून येवूं लागले आनंदाभाऊजी पाटलांच्या घरांतून पळ काढून मेल्ड्रमचें दल नदीच्या कांठावर जें येऊन पोहोंचते तोंच त्यास नरसिंगपुरच्या नरसिंहाचा जमाव आपल्याच रोखानें चाल करून येत आहे, असे आढळून आलें इकडे ७० वर्षांचा वृद्ध अकबरशाहा फकीर एक जमाव संघटित करून येत होता तिकडे नरसिंगपुरचा दुसरा जमाव येऊ पाहात होता या दोन जमावाच्या कोंडीत आपण सापडूं की काय अशी भीति अधि काऱ्यांना वाटू लागली. म्हणून त्यांनी उरलेल्या गोळ्या यावरून प्रथम एक

जमाव हटविण्याचें ठरविलें अकबरशहा फकीराचा जमाव अधिक जवळ होता. शिवाय गोफण गोट्याची मारगिरीहि त्याने चालविली होती. म्हातारा फकीर आघाडीवर राहून सर्वांना स्फुरण देत होता त्याचा त्यावेळचा आवेश व राष्ट्रध्वजाच्या सुटकेसाठी त्याला लागलेली तळमळ अवर्णनीय होती. 'पकडो. झेंडा छुडाके लाव.' वृद्ध फकीर गर्जत होता. त्याचें ते असामान्य धैर्य पाहून प्रतिपक्षीही चकित झाला होता.

प्रथम अकबरशहाचा वीमोड करणें अवश्य आहे असें ठरवून प्रतिपक्षानें त्याच्यावर गोळ्यांचें संधान करण्यास सुरवात केली. एक गोळी मोठ्या शिताफीने चुकवून म्हातारा पुन पुढे सरसावला. 'पकडो. पकडो, झेंडा छुडाके लाव' चा घोष तो करीत होता आणि दगडाचा वर्षाव करण्यासाठी तो आपल्या अनुयायाना प्रोत्साहित करीत होता. म्हाताऱ्याचा आघाडीवरचा तो आवेश कोणाचेंही लक्ष वेधून घेण्यास पुरेसा होता. सार्जंट क्रीन याने रायफल हातात घेतली आणि नेम बांधून गोळी मारली. ती अकबरशहाच्या हातास लागली म्हातारा जमिनीवर पडला

अकबरशहास पडलेला पाहून त्याचा तरुण पुत्र मेहताबशहा पुढे झाला. त्याने बाप पडल्यामुळे घसरू लागलेली बाजू भरून काढली. बापाची आघाडीवरील जागा घेऊन तो लोकाना स्फुरण देऊ लागला अधिकाऱ्याचा पाठलाग करूं लागला साहेब आणि मंडळी पळत होती व मधून मधून गोळ्याहि मारीत होती. यावेळीं त्यानी नदी ओलांडली होती आणि गावकरी मंडळी नदीपर्यंत येऊन पोहोंचली तेव्हा, साहेब आणि मंडळी बापू शेटच्या ( रामकिसनजीच्या ) फडापर्यंत जाऊन पोहोंचली असतील. अकबरशहा पडला तरी पडल्या पडल्याच तो 'दुश्मनको पकडो. झेंडा छुडाके लाना बेटा ' असे स्फूर्तीचे आवाज देतच होता. आघाडीवरील मेहताबशहा समुदायबरोबर घेऊन गोटमार करू लागला होता. तोच त्यासहि एक गोळी लागली व तो नदींत पडला. नदी रक्ताच्या पाण्याने लाल होऊन वाहू लागली लोकांनी दोघांहि पितापुत्रांना उचललें; त्याच्या जखमा धुतल्या व त्याना उचलून ते गावात निघून आले अकबरशहा व मेहेताबशहा ही पितापुत्राची जोडी आपल्या राष्ट्रप्रेमाने व पराक्रमाने यावलीच्या इतिहासांत अमर झाली. स्वातंत्र्याच्या इतिहासातच त्याचें नाव चिरंजीव राहील !

साहेब पळणार हें पाहाताच, पूर्वी कामदार महाराणी नदीवर उतरून जाण्यासाठी जीं लाकडें टाकलीं होतीं तीं गावकऱ्यानी काढून टाकलीं त्यामुळे नदी उतरताना मेल्ड्रम प्रभृतींचे फार वाखे झाले नदीच्या दलदलींत तो फसला बाकीचे लोक पाठलाग करणाराच्या भयाने झपाट्याने निघून पुढे गेले. हा एकटाच दलदलींत फसला. इतक्यात बारक्या वल्द शिवराम नावाचा तरुण मुलगा त्याला दिसला. त्यानतर घडलेला प्रकार सदर्हू बारक्या मराठ्यानें एक पत्र पाठवून लेखकाला कळविला आहे. तो लिहितो " ता १८-८-४२ ला यावलीवरून डी सी. आपल्या पार्टीसह पळून जात असताना नदीवर मी तेथे उभा असतांना मला तेथ बोलाविलें व म्हणाले,—"तुम लोक बहोत बहादूर हो। हम हार गये। और तुमने जीत लिया। अब तुम वापस घर लौट जाव. और हम इधर जाते हैं।" यावर मी त्याना म्हटलें, " आपने तो बहोत आदमी मार डाला। और हमको कहते की, वापस चले जाव। कैसा हो सकता।" यावर डी. सी म्हणाले—'ओ कुछ नही! तुम चले जाव!!" याप्रमाणें म्हणून ते पळून गेले व नतर गोळ्या झाडल्या याप्रमाणें त्याचें माझ्याशीं घेविलवाण्या स्वरात बोलणें झालें"

## प्रकरण ६ वें

# अमर शहीद राजारामजी औरंगपुरे



डेप्युटी कमिशनर मेल्ड्रम, डी. एस पी. ग्रँट, सार्जंट क्वीन वगैरे सरकारी मडळी ज्यावेळीं नदींतून पलीकडे जात होती त्यावेळीं शेतावरून परत आलेले आणखी काही लोक गाधी चौकात जमा झाले होते त्यानी लांबूनच मेल्ड्रम वगैरेंना पळताना पाहिलं होतें गाधी चौकात आल्याबरोबर त्याना दिसून आलें की, झेंडा स्तभावर नाही त्याची अशी पक्की समजूत झाली की, पळून जाणाऱ्या अधिकारी लोकानीच झेंडा आपल्याबरोबर नेला आहे या गोष्टीची राजारामजी औरगपुरे यास अतिशयच चीड आली ' आपला राष्ट्रीय ध्वज अशा तऱ्हेने हिरावला जावा ही मोठी खेदाची गोष्ट आहे. हा आपल्या गावाच्या इज्जतीचा

प्रश्न आहे. काय वाटेल तें झालें तरी झेंडा परत मिळविलाच पाहिजे. साहेब *मंडळी अजून फारशी दूर गेली नाहीत तोंच आपण त्याना गाठूं शकूं.*" इ० प्रकारें स्फूर्तिदायक भाषण करून त्यांनी गांधी चौकात जमलेल्या त्या लोकापैकी सुमारें १०,१२ लोक आपल्याबरोबर येण्यास तयार केले कोणी कुऱ्हाडी बरोबर घेतल्या, कोणी लाठ्या घेतल्या. स्वतः राजारामजी औरंगपुरे यांनी घरात जाऊन तलवार काढली आणि ती नगी समशेर हातीं घेऊन तो सर्वांच्यापुढे वेगानें धाऊं लागला. राजारामजी औरंगपुरे व त्यांचें हें शूर पथक गांवातून बाहेर पडण्याच्या तयारींत होतें, त्यावेळीं मेल्ड्रम प्रभृति बाबूशेट (रामकिसनजी) मारवाडी यांच्या गोठ्यातून बाहेर पडून वाघोलीच्या रस्त्याने पळू लागले होते. औरंगपुरे आणि त्यांचें पथक यांच्यात तिमान फर्लांग दीड फर्लांगाचें तरी अंतर असेल. *परंतु साहेब आणि मंडळी बरीच थकली होती.* डे. क. मेल्ड्रम यास तर चालवतहि नव्हतें. पोलीस कान्स्टेबलस् त्याला आपल्या बगलेंत धरून कसेंतरी पळवीत होते सर्वांचीच गति मंद मंद होत चालली होती तर इकडे औरंगपुरे व त्यांचें ताज्या दमाचें पथक त्याचा भरधाव पाटलाग करीत होतें औरंगपुरे याचा त्यावेळचा आवेश व वेग तर फारच अद्भुत होता. बाबू शेटच्या गोठ्यापर्यंत पोंहचता पोंहचता त्याने आपल्या साथीदाराना तसेंच मागे टाकलें. राष्ट्रध्वज सोडवून आणावयाचाच या एकाच *निर्धाराने हातांतील तलवार पाजळीत व फलांगीवर फलांगी मारीत तो सारखा* पुढे पुढे धावत होता. त्याच्या जवळपास दशरथ मराठा हा एकटाच राहू शकत होता. पूर्वीचे पाटलाग करणारे निघून गेले असले तरी हें नवीनच मावळ्यांचें पथक महान् वेगाने आपला पाटलाग करीत येत आहे हें पाहून साहेब आणि मंडळीचें धैर्य अगदीच विगलित होऊं लागलें. त्यांनी मुठींत प्राण धरून पळण्यास सुरवात केली. पळतां पळतां मधूनच मागे वळून ते एखादी गोळी पाटलाग करणारांवर झाडीत होते.

बाबूशेट (रामकिसनजी) मारवाडी याच्या वाड्यांतून बाहेर पडतांना साहेब आणि मंडळी यांनी बाहेरील तारेच्या कुंपणाचें लोखंडी दार पाटलाग *करणारास अडथळा व्हावा म्हणून पक्के बंद करून घेतले होतें. औरंगपुरे व* त्याचे तरुण सहाय्यक यांनी फाटकावरून भराभर उड्या मारल्या आणि ते

पुन मेल्ड्रमप्रभृतींचा अतिशय जोराने पाठलाग करू लागले. साहेब आणि मंडळी थावूरोट याचे गोठ्याजवळील वावरातून पळता पळता सादडच्या झाडा-जवळ आली असतील, त्यावेळी राजारामजी औरंगपुरे हा देखील आपल्या बरोबरच्या मंडळीला सुमारें २५ कदम मागें टाकून त्याठिकाणीं जवळपास येऊन पोंहोचला त्याचा सर्व रोख मेल्ड्रम याचेवर आहे हें आळखून डी एस. पी व सार्जंट यानी मेल्ड्रमला पुढे घातलें व ते स्वत त्याच्यामागे राहून बचावाची तरतूद करू लागले सँदडच्या झाडापासून ते काहीसें दूर जातात न जातात, तोंच औरंगपुरे हा त्यांच्याशासून चारपांच हातांच्या अन्तरावर जाऊन पोंहचला आणि आपल्या हातांतील तलवार सरसावून डी एस. पी. व सार्जंट याना डावलीत त्याने मेल्ड्रमवर वार काढण्याचा प्रयत्न केला. पण तितक्यात कान्स्टेबल लोकानी मेल्ड्रमला आणखी थोडें पुढे पळविल्यामुळें तो वार निष्फळ टरला. हें पाहून औरंगपुरे यानी आणखी एक सपाईचा हात मेल्ड्रमवर मारला. परंतु त्याचा हात उद्दिष्टावर पडण्याच्या आधीच सार्जंट क्वीन याने जवळच्या कान्स्टेबलच्या हातांतील बंदूक आपल्या हातीं घेऊन व नेम धरून औरंगपुरेवर गोळी मारली. इकडे गोळी त्याच्या पोटात घुसली आणि तिकडे त्याच्या तलवारीचा हात मेल्ड्रमच्या डोक्यास चाटून गेला औरंगपुरे जमिनी-वर पडला साहेबहि जखमी झाला. इतर मंडळी अद्यापहि वीस पचवीस कदम मागेच होती परतु दशरथ मराठा हा त्याच्या जवळपास येऊन पोंहोचला होता. आपला पुढारी अशा रीतीने गोळी लाऊन पडला आहे हें पाहून त्याने त्वेषाने आपल्या हातातील कुऱ्हाड उचलून ती मेल्ड्रमच्या रोखाने फेंकून मारण्याचा प्रयत्न केला परतु ती सादडच्या झाडास अडली पुन्हा कुऱ्हाड सरसावून दुसऱ्यादा वार करण्याचा त्याने प्रयत्न केला तोंच पुन्हां सार्जंट क्वीन याने नेम साधला दशरथनें नेम धाधून कुऱ्हाड फेंकून मारली पण ती एका कान्स्टेबलास लागली आणि सार्जंटची गोळी लागून दशरथ मराठा खाली पडला. कान्स्टेबल लोक पुन्हा मेल्ड्रम यास बगलेंत धरून वेगाने पळू लागले पळता पळता मेल्ड्रम यास भयंकर ग्लानि आली मिलचलेल्या कारडावील पाणी वगैरे पाजून त्याची ग्लानि दूर करण्यांत आली व पुन त्यास पळविण्यात आलें

इकडे औरंगपुरेच्या टोळींतील बाकीची मंडळी त्याचेजवळ येऊन पोंहोचली, तेव्हा तो व दशरथ मराठा दोघेही रक्तबंबाळ होऊन पडलेले होते.

आपला पुढारी गोळी लागून पडला आहे व प्रतिपक्षी बराच दूर निघून गेला आहे असें पाहून व जखमी लोकांना ताबडतोब उपचार करण्याची आवश्यकता जाणून त्यांनी औरंगपुरे व दशरथ मराठा यांना घेऊन परत फिरण्याचें ठरविलें. औरंगपुरे यास बाबूशेटचे गोठ्यात ठेवण्यात आलें व दशरथला त्याच्या घरी पोहचविण्यात आलें वस्तुत औरंगपुरे यास झालेली जखम एवढी मोठी होती व त्याचा रक्तस्त्रावहि इतका विपुल झालेला होता कीं, त्यास कोणतीच शुद्ध असणें शक्य नव्हतं जखम धुवून पट्टी बांधण्यात आली पाणी पाजण्यात आलें किंचित्शी शुद्ध आल्यासारखी झाली तेव्हा तो बडबड लागला. बडबड लागला म्हणण्यापेक्षा अत्यंत क्षीण स्वरात तो पुटपुटत होता असे म्हणणेंच जास्त योग्य होईल. तो म्हणत होता मरणाचें दुःख मला मुळींच वाटत नाही आपल्या राष्ट्रध्वजाकरता शूरपणें लढता लढता मला हें वीराच मरण प्राप्त होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. परंतु दुःख एकाच गोष्टीचें वाटतें कीं, आपला यावलीचा राष्ट्रध्वज मी परत आणू शकलो नाही त्या ध्वजाकरितां एवढी लढाई दिली, गोळ्या साहल्या, व बलिदान केले तो ध्वज अखेरीस इंग्रजांनी पळवून न्यावा याचेंच वाईट वाटतें आम्ही भारतभूमीचे पुत्र हजर असतांना शत्रू आमचा झेंडा घेऊन जातो यापरता दुसरें कशाचेंहि दुःख मला वाटत नाही एवढेंहि बलिदान झालें असत आणि जर झेंडा परत मिळाला असता तर तें सव सार्थकीं लागल असतें आज आमचें बलिदान झेंडा परत न मिळाल्यामुळे व्यर्थ गेल असे वाटतें अशा स्थितीत मी कांहीच करू शकत नाही याचाच मला राहून राहून खेद होत आहे " इतकें व असें काहींतरी पुटपुटल्यावर त्याला पुन्हा ग्लानि आली व तो बेशुद्ध झाला.

राजाराम औरंगपुरे यांना गोळी लागून तो बाबूशेटचे गोठ्यात आसन्न मरण स्थितींत पडला आहे असे कळतांच गावातील बरेच लोक त्यास पहाण्या साठी तेथे आले एकंदर वातावरण गंभीर होतें विजयाचा आनंद व आपल्या तरुण मुलाच्या आत्यंतिक वियोगाचं दुःख अशा संमिश्र भावनेने सर्व उपस्थित समाज व्यथित होता इकडे राजारामजी पाचघरे यास गांवांत बातमी कळली की औरंगपुरेप्रभृति तरुणांची टोळी, अधिकाऱ्यांनी आपला झेंडा नेला असा सम जुतीने त्याचा पाठलाग करुन झेंडा आणण्यासाठी गेली व या पाठलागांत

गोळी लागून औरंगपुरे पडला मृत्युशय्येवर आपण झेंडा आणू शकलो नाही या एकाच गोष्टीचें त्यास दु ख होत आहे

हें कळताच झेंडा हातात घेऊन राजारामजी प चघरे पळतच निघाले व त्वगबगीने बाबूशेटच्या गोठ्यांत औरंगपुरे याना नेऊन ठेवलें होतें त्याठिकाणीं येऊन दाखल झाले त्यास तेथील लोकानी औरंगपुरे यांनें काढलेले उद्गार निवेदन केले ते ऐकून राजारामजी पाचगरे याचेहि डोळे भरून आले कठ गद्गदित झाला. झेंडा गावातच आहे, डी. सी व डी एस. पी इत्यादि मडळी पळून जात असतांना आपण झडा कसा परत आणला याची हकीगत औरंगपुरे याच्या कानावर घालण्याचें त्यांनी ठरविलें ही हकीगत ऐकून त्यांच्या चित्तास अतिशय समाधान वाटेल अशी त्यांची अपेक्षा होती व ती अर्थात् खरी होती

म्हणून समोंवारच्या लोकांनी औरंगपुरे याचे तोंडावर थोडें पाणी शिंपडलें आणि त्यास थोडें पाणी पाजून शुद्धीवर आणण्याचा ते प्रयत्न करू लागले राजारामजी पांचघरे यानी त्याच्या कानात वारवार ओरडून सांगितलें की, *झेंडा गावतच आहे मीं तो आणला आहे शत्रूने तो नेला नाहीं.* वारवार उच्चारलेले पाचघरे याचे हे शब्द ऐकल्यावर औरंगपुरे यानी पुन्हा एकवार डोळे उघडले व ते म्हणू लागले,'काय ! झेंडा आहे ! खर बोलता तुम्ही ! खरच शत्रूनी झेंडा नेला नाही ?'—

*त्यावर* राजारामजी पांचघरे यानी पुन्हा सांगितलें,-' होय झेंडा आहे. डी एस् पी ने तो मुनसरीम ( रेव्हिन्यू इन्स्पेक्टर ) जवळ दिल्यानतर मीं त्याचजवळून तो हिसकून आणला आहे तुम्ही झेंड्याकरता गेलात व तुम्हास *गोळी लागली हें कळल्यावर मी तुम्हास दाखविण्याकरितां झेंडा बरोबर घेऊन* आलों आहे ' असें म्हणून बरोबर आणलेला झेंडा त्यानी त्यास दाखविला

झेंडा, आपला राष्ट्रध्वज, डोळ्यानें दिसताच मृत्यूच्या दारात उभा असलेल्या त्या वीर तरुणाच्या मुखावर आनदाची छटा दिसू लागली त्याला समाधान झालेलें दिसलें तो म्हणाला,-" झेंडा हें आपल्या राष्ट्राचें सौभाग्य आहे हें सौभाग्य यावलीकरांनी पडकत ठेवलें मी त्यासाठीच आपले प्राण खर्ची घातले माझ्या मरणाच्यावेळीं तेंच आमच्या राष्ट्राचें सौभाग्य माझ्या

दृष्टीसमोर फडकत आहे हें पाहून मला अतिशय संतोष वाटला. शत्रूने झेंडा नेला नाही. तुम्ही तो परत आणलात. फार आनंदाची गोष्ट झाली. आता मीहि आनंदानें मरतो. झेंडा पाहिल्यानंतर मला आता कोणतेंच दुःख उरलें नाही". असें बोलून त्या क्रांतिवीराने आपला प्राण सोडला. उपस्थितांना सर्व समाज त्याचें हें मरण पाहून ढळढळा अश्रू गाळूं लागला ! खरोखर औरंगपुरे यास वीरमरण आलें !! म्हणूनहि हा शहीद अमर झाला !!! त्याचें राष्ट्रप्रेम, राष्ट्रध्वजावरील त्याची प्रगाढ भक्ति, त्याचें अलोट धैर्य, त्याचा दिव्य पराक्रम आणि महान् त्याग व आत्मबलिदान यांच्या कथा पिढ्यानुपिढ्या यावलीत गायिल्या जातील. मरतेवेळीं त्याने उच्चारलेले शब्द यावलीकरानी आपल्या हृदयावर कोरून ठेवले आहेत. त्याचा शिलालेख वाचून भारतवर्षातील भावी पिढींना अखंड स्फूर्ति मिळत जाईल, व ते औरंगपूरे यांच्या वीरमरणाचें नित्य स्मरण करीत आपल्या राष्ट्रध्वजाच्या संरक्षणासाठी असेंच आत्मबलिदान करण्यास तयार होतील. !!!

राजाराम औरंगपुरे यांच्या मृत्यूची बातमी त्यांच्या आईस समजली व ती त्याला पाहाण्यास आली. त्याला पाहिल्यावर तिनें एकच आकांत मांडला. 'माझी तीनहि मुलें अशीच मृत्युमुखी पडलीं. आता मी कोणाकरिता जिवंत राहूं ? मीहि विहीरींत उडी टाकून आत्महत्या करीन.' अशा तऱ्हेने शोक करीत, ती विहीरीकडे जाऊं लागली. तिची ही विकल स्थिति पाहून तिच्यावर नजर ठेवण्यासाठी दोन बाया ठेवण्यात आल्या. तिचीं दोन मुलें आधीच मेलीं होतीं व तिसरा तिचा एकुलता एक आधार राजाराम आज यावली येथील तिरंगी झेंड्याच्या युद्धात शहीद झाला होता. म्हातारीच्या हृदयास होणाऱ्या व्यथा खरोखर अवर्णनीय आहेत !!!

---

## प्रकरण ७ वें

# उत्तर क्रिया

---

ता. १८ आगस्टची यावलीची ही लढाई दुपारीं एक वाजल्यापासून सायंकाळी पाच वाजेपर्यंत म्हणजे सुमारें चार तास चालली. एक प्रहराच्या या

युद्धात चार रणस्थानें गाजली. एक गांधी चौक, दुसरें राघोबाइ पाचपोरींच्या घराच्या व कोठ्याचा टापू ते आनंद आबाजी पाटलांचें घर, तिसरें नदीचें ऐलतीर व पैलतीर व बापूशेटचा कोठा, आणि चौथ बापूशेटच्या वाड्यातील सादडच्या वृक्षाजवळील भूमि या चार ठिकाणीं घडलेल्या चारहि चकमकींत लोकपक्षच विजयी झाला ब्रि सरकारच्या अधिकाऱ्यांचा पूर्ण पराभव झाला पराभवाचें लांछन पत्करून त्यांस चोरासारखें पळून जावें लागलें शत्रूच्या हातीं रिव्हाल्व्हर्स, रायफल्स व लाठ्या हो या आणि तमाम ब्रि साम्राज्य सरकारचा दरारा याच्या पाठीशीं उभा होता. जनतेजवळ राष्ट्रप्रेम बलिदानाची तयारी, राष्ट्रध्वजावरील उत्कट भक्ति व प्रतिकारासाठी लागणारें अलोट धैर्य एवढींच मुख्य शस्त्रें होतीं म गांधीच्या नांवाची स्फूर्ति हेंहि तिचें एक शस्त्र होतच. काँग्रेसच्या पाठिंब्याचा विश्वास तिला बळ देत होता. या प्रमुख शस्त्रांखेरीज गोफणी दगड, लाठ्या, कुऱ्हाडी भाले व तलवार हींहि उपकरणें तिनें आपल्या साह्यार्थ जमा केलीं होतीं

हिंदुस्थानच्या आधुनिक इतिहासांत वऱ्हाडच्या, उमरावती जिल्ह्याच्या, एका खेड्यानें ब्रि सत्तेबरोबर चार तास खेळलेलें हें युद्ध, एकाच युद्धात अवघ्या चार तासात बदललेलीं चार चार रणस्थळ व घडलेल्या चार चार चकमकी व त्या सर्वांत ब्रि सत्तेचा झालेला पराभव व जनतेनें मिळविलेला विजय ही घटनाच अपूर्व ठरणार आहे या अत्यंत विषम अशा संग्रामात यावली विजयी झाली होती भावी इतिहासकाराला यावलीच्या या युद्धाची—नि शस्त्र युग तल्या या खरोखरी या युद्धाची—फार ठळक रीतीनें नोंद घ्यावी लागेल तिकडे परकीय रणांगणावर, ब्रि सत्तेच्या भरघोस जाहिराती, भरपूर पगार, कपडा-लत्ता याना भाळून व घरीं असलेली खाण्यापिण्याची विवंचना दूर करता येईल असें वाटून लाखांवधि भाडोत्री हिंदी तरुण आपले प्राण समर्पण करीत होते व ब्रि सत्तेची हिंदुस्थानच्या मानगुटीवरील पकड मजबूत करण्याच्या प्रयत्नांस अभि मानानें मदत करीत होते, तर इकडे यावलीच्या रणांगणावर कोणत्याही तऱ्हेचे प्रलोभन नसता ना, आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं, आपल्या राष्ट्रध्वजाच्या संरक्षणासाठीं व गुरुस्साठी यावलीसारख्या खेड्यांतील शेंकडो तरुण जाणून बुजून सतत चार चार तास बंदुकी तालावर लढत होते बलिदान करीत होते व अखेरीस विजयी होत होते

यावलीच्या १८ आगस्टच्या या संग्रामात एकदर तीस इसमानी गोळ्या खाल्ल्या. त्यात तीन मुसल्मान होते, दोन हरिजन होते, एक महिला होती व बाकीचे न्हावी, कलाल, सोनार, माळी, कुणबी, मराठे इ. सर्व जमातींतील लोक होते या संग्रामात पाच वीर ठार झाले व आणखी एक पुढे तुरुंगात मेला या खटल्यात पुढे एकदर बासष्ट इसमावर खटला भरण्यात आला. अवघ्या दोन हजार वस्तीच्या यावलीच्या मानाने हा त्याग फारच मोठा होता, हे कोणासहि मान्य करावें लागेल.

या विषम युद्धात यावलीने मिळविलेला हा विजय फार मोठा आहे व भावी इतिहासात त्याला स्थानहि फार मानाचें मिळेल यात शंका नाही. परंतु गावाच्या मानानें हा विजय फार महाग पडला. यावलीने व्यक्त केलेलें धाडस फार मोलाचें ठरलें. कोणत्याहि राष्ट्रांत सक्तीची लष्कर भरती सुरू झाल्यावरहि युद्धक्षम लोकसंख्येचें प्रमाण शे. ८ या पेक्षा अधिक धरण्यात येत नाही. नुकत्याच घडलेल्या महायुद्धात जर्मनीने अगदा कमाल करून हें प्रमाण शे. १० वर नेऊन दाखविलें परंतु यावलीच्या दोन हजार लोकसंख्येंतील निदान २०० तरी तरुण रणांगणावर येऊन खास लढले व त्यांपैकी ७ शहीद झाले व ३० जखमी झाले. यावलीनेंहि जर्मनीच्या बरोबरीने युद्धक्षम लोकसंख्येचें आपले प्रमाण आणून दाखविलें, आणि तेंहि पारतंत्र्याच्या नित्य उत्साहनाश करणाऱ्या युगात, दारिद्र्य व दुष्काळ हीं चारी बाजूनी थैमावलीं असताना! स्वातंत्र्याच्या व सुबत्तेच्या काळात हें प्रमाण यावली कितीतरी वाढवूं शकेल हें उघड आहे. असतु.

शत्रु पराजित झाला व पळून गेला हें पाहिल्यावर लोक युद्धोत्तर कामाला लागले पंजाबराव याचे चुलते अजाबराव, बंधु विश्वासराव, अबदुल रहीम, राजारामजी पाचघरे प्रभृति लोक जखमी लोकांच्या व्यवस्थेला लागले

जखमी लोकांपैकी कृष्णराव पवार, राजाराम औरंगपुरे व बळीराम बोराळे हे तत्काल शहीद झाले होते त्याचे अन्त्य संस्कार करावयाचे होते. कृष्णराव पवार हा तर यावलीच्या गळ्यातला ताईतच बनला होता. त्याच्या व बळीराम बोराळेच्या शवाची गावकऱ्यानी प्रचंड मूक मिरवणूक काढली सर्व वातावरण अतिशय गंभीर झालें होतें. आपल्या वदणाऱ्या या वीर बलिदानावर यावलींतील

समस्त आबालवृद्ध, स्त्रीपुरुष, हिंदुमुसलमान, स्पृश्यास्पृश्य जनता अश्रुफुलें ढाळीत होती शुभ्र वस्त्रांनीं झाकलेल्या वीर शहीदांच्या त्या शरीराकडे पाहून प्रत्येकजण आपली मान नम्र करीत होता. नितांत शांततेच्या व गंभीर स्तब्धतेच्या वातावरणात ती शहीदांची मूक प्रेतयात्रा नदीच्या काठावर येऊन पोंहचली. तिकडून बाबूशेटच्या कोठ्यातून शहीद राजारामजी औरंगपुरे यांचेंहि शव आणण्यात आलें. तिन्ही शहीदांचीं शरीरें रामकिसनजीचे शेतींतील काष्ठराशींत एकाच ठिकाणीं रचण्यात आलीं अग्नि देण्यापूर्वी सर्वांनीं व नथूजी लगडे यांनी *उत्थापनपूर्वक शहीदांना अभिवादन केलें आणि नंतर विधिपूर्वक अग्नि देण्यात* आला. जनता खिन्न व जड अंत:करणांनी घरीं परतली

गर्दीतून जखमी वीरांपैकीं मोतीराम पाचघरे व तुळशीराम तडस यांचें प्राणोत्क्रमण झालें होतें १९ तारखेला सकाळीं या दोन शहीदांचीहि तशीच गंभीर व मूक प्रेतयात्रा काढण्यात आली आणि कालच्या तीन हुतात्म्यांना ज्या ठिकाणीं अग्नि देण्यात आला होता त्याच ठिकाणीं व त्याच चितेवर या दोन शहीदांचाहि अग्निसंस्कार करण्यात आला सारा गांव हळहळला ! घडलेल्या पराक्रमाच्या अभिमानयुक्त कथा गांत गांत प्रत्येकाने अश्रु ढाळले. ! ! दुसरा विषय नाही ! दुसरी कथा नाही ! ! यावलीचे शहीद मरून अमर झाले ! गांधीजींच्या ८ आगस्ट अखेरच्या संदेशाप्रमाणें त्यांनी " करा वा मरा " या महामंत्राचें आचरण पूर्ण करून दाखविलें ! त्यांनी केलेंहि व मरूनहि दाखविलें ! ! ! इतक्या यथार्थ रीतीनें सगळ्या देशभर या महामंत्राचें आचरण घडलें असतें, तर पारतंत्र्याच्या शृंखला केव्हाच गळून पडल्या असत्या ! ! ! भारतमाता तेव्हांच स्वतंत्र झाली असती ! !

---

## प्रकरण ८ वें

# ग्रामीण जनतेचें सामुदायिक निर्वासन

ता० १८ आगस्टच्या खुऱ्या युद्धाच्या रूपाने यावलीने मि० मूजगाला डिवचलें होतें त्याच्या मस्तकावर वारंवार प्रहार करून त्याला तिने

चिडविलें होतें. १८ आगस्टच्या पराभवाचा बदला घेतल्याशिवाय नि० सरकार कसें राहील ? त्रिखंड साम्राज्य गाजविणाऱ्या सामर्थ्यशाली नि० साम्राज्यशाहीचा हिंदुस्थानातील यावलीसारख्या एका ल्हानशा खेड्यानें केलेला पराभव नि० सरकार कसा सहन करील ? एकवेळ हिटलर व जपाननें केलेले पराभव तें गिळून बसेल ! पण एका वऱ्हाडी खेड्यातील नि शस्त्र जनतेनें केलेला नि० जिल्हाधिकाऱ्याचा हा घोर पराजय तें गिळू शकेल हें शक्यच नव्हतें. चिडून गेलेला, अपमानित झालेला, मार खालेला भुजग डूंग धरून पुन्हा आणखी बळ एकत्र घेऊन येणारच हें उघड दिसत होतें जिल्हाधिकारी व पोलीस यावलीचें राज्य हारले होते. क्रांति-शक्तीच्या बळावर जनतेने विजय मिळविला होता व यावली स्वतंत्र झाली होती. पण एकाकी खेड्याचें हें स्वातंत्र्य, अफाट नि० सत्तेच्या झंझावातापुढे फार काळ टिकणारें नव्हतें जें मुलकी अधिकाऱ्यांना व पोलीसांना साधलें नाहीं तें लष्कराच्या जोरावर नि० सरकार घडवून आणणार हें उघड होतें यावलीवर लष्कर रवाना करण्यात येणार हें न सांगताहि कळण्यासारखें होतें

रात्रीं गावात भीषण स्तब्धता पसरली होती आजच्या युद्धात यावली विजयी झाली असली तरी तिची अतिशय हानि झाली होती तिचें निम्मे शिम्मे तारुण्य कामास आलें होतें. ज्याच्या निर्धाराच्या बळावर यावली प्रतिकारास सज्ज झाली होती त्यातील निम्मे शिम्मे सामर्थ्य अशा रीतीनें घटल्यानतर उर्वरित लोकाच्या बळावर पुन्हा लष्करी आक्रमणाचा प्रतिकार करण्याची भाषा बोलणें म्हणजे केवळ-सर्वस्वनाश करून घेण्यास, आत्मघात करण्यासच प्रवृत्त होण्यासारखें होतें म्हणून पुढील सकटाशी समोरून तोंड देण्यापेक्षा बगल देणेंच श्रेयस्कर होय असें यावलीकरानी ठरविलें आणि ही बगल द्यावयाची म्हणजे गावचा गाव रिकामा करणें, सर्वांनी गाव सोडून निघून जाणें असा त्याचा अर्थ होता.

पण सामुदायिक निर्वासन ही सकृद्दर्शनी वाटते इतकी सोपी गोष्ट नाही स्वत च्या हक्काची निवाऱ्याची जागा मनुष्यानें एकदा सोडली म्हणजे त्याला दुसरीकडे निवाऱ्याला कोठे जागा मिळेल याची काहीच शाश्वति नसते अशा अशाश्वत अवस्थत, अमर्याद कालच काय पण वर्ष सहा महिने देखील, काढणें

कठीण असते. त्यातून हा केवळ सड्या पुरुष मंडळींचाच प्रश्न नव्हता गावातील बायका मुलांसह हें निर्वासन करावयाचें होतें पुरुष मंडळींनी स्वतः गाव सोडून निघून जावें आणि बायका मुलांना काय लष्करी लांडग्यांच्या भक्ष्य स्थानीं पडू द्यावें ! जायचेंच तर सर्वांना बरोबर घेऊनच गेले पाहिजे नाहीतर गावातच राहून जी काय आपत्ति येईल ती मुकाट्याने सहन केली पाहिजे, केलेला पराक्रम व घडलेलं बलिदान सर्व व्यर्थ दवडलीं पाहिजेत, आणि ब्रि० सत्तेसमोर मान वाकवून मानहानि पत्करली पाहिजे.

आपत्तींचा पहाड समोर दिसत असूनहि यावलीकरानी मानहानि पत्करण्याचें नाकारलें ब्रि० सत्तेसमोर मान वाकवावयाची नाही हा त्यांचा निर्धार पक्का होता १८ आगस्टच्या युद्धात बुद्धिपुरस्सर केलेल्या बलिदानाचें मूल्य व महत्त्व ते ओळखून होते पण त्याबरोबरच सर्वस्वनाश—आत्मघात—करून घेण्याचीहि त्यांची तयारी नव्हती मानहानि पत्करली तरी आत्मनाश चुकत नाही, प्रतिकाराचा प्रखर मार्ग पत्करला तरी आत्मनाश निश्चित आहे, दोन्हीचे फलित परिणाम एकच. म्हणून त्यांनी निर्वासनाचा मध्यम मार्ग पत्करला. वस्तुत सामुदायिक निर्वासन हें सुद्धा एक महान् दिव्य होतें. त्यातून जावयाचें म्हणजे अतिशय कठोर परिस्थितीच्या आगीने अंग भाजणार होत, प्रत्यक्ष काट्यागोट्याचा मार्ग तुडवावा लागणार होता, उपासमारीने जीव कासावीस होणार होता निराश्रित, निरालंब, निराधार अवस्थेंत दिवस काढावें लागणार होतें हें दिव्य युद्धाच्या प्रतिकार-दिव्यापेक्षांहि अतिशय भयंकर होतें, असें एकापरीने म्हणता येईल व तसाच अनुभवहि आला. परंतु सर्वस्व—नाश, आत्म-नाश टाळावयाचा असेल, तर हें दिव्य करणें भाग होतें. यावलीची शूर व कणखर जनता याहि दिव्यातून जाण्यास तयार झाली

या वेळच्या यावलीच्या जनतेच्या मनःस्थितीचें प्रतिबिंब यावलीचा शूर सेनापति अब्दूल रहीम याच्याच शब्दात देणे उचित होईल अब्दूल रहीमने आपल्या निर्वासनाबाबत जें एक वक्तव्य लेखकाजवळ दिलें आहे त्यात तो म्हणतो—

"१८-८-४२ का गोलीबार हो चुकने के बाद लोगोंन के दिल हवाल दिल हो गये ! लोग घबराने लगे की, अब क्या होगा ! क्यूं कीं गांवमेंसे

उसतक गोलीबारमें पाच लोक शहीद हो चुके थे और करीबन् ३५-४० आदमीको गोल्या लग चुक्या था! उन लोगोंके बदनसे लहू एक सरीखा बह रहा था! इसी कारणसे लोकोंको बहोत घबराहटसी मालूम होती थी! हालाँकी वही लोग नि० अधिकारीयोंके साथमें बडेही बहादूरीसे लडे, और गोलियोंका सामना उन्होंने अपने सीनेसे किया। लेकीन वो अधिकारी लोग भाग जानेके बादमें, वहानेही जो खुदको नि० गव्हर्मेंटके रैररख्वाह समजते थे वो लोगोंने गावमें ऐसी हूल मचा दियी की अब और भी चालीस मिलिट्रीवाले लोग आ रहे हैं! और मैंने उन लोगोंको देखा है। ये हूलको, इस गलत पैमीको उन लोगोंने इतने जल्दी गावमें फैलाया की गावमेंका कोनाकोना और बचा बचा इस गलत पैमीको जानने लगा!

'इस ही गलत पैमीने मेरे भी दिलपर असर किया! और अपने देश के इज्जतका खयाल आनोर सामने खडा हुआ! क्यू की इस अधिकारी लोकोनके मनमानी ढगको मैं जानता था। उनके काबूमें जानेके बादमें वो किसकी भी इज्जत बिघाडनेमें कभी भी हिचकिचाहट नही मानते। ना उनको उस बातकी कभी नफरत भी है! उल्टा वो उसमें खुदको एक बडा ऑफिसर समजते और वो एक बडेपनका लक्षण है ऐसा मानते हैं।

"ऐसा सोचकर मैंने मेरे मित्र विश्वासराव (पजाबराव यांचे बंधु) इनको शिवमगलसिंग पहेलवानके जरियेसे बुलाना भेजा। लेकिन उन्होंने आनेसे इन्कार किया। क्यू की वो उस वक्त अपने काममें—चोंकोनकी सेवामें, गोल्या लगे हुए लोकोंको ड्रसिंग करनेमे और उनकी देखभाल करनेमे व्यस्त थे। फिरसे दो मिनिटके लिये मुलाखत लेनेके बहानेसे उन्हे बुलाया और मैंने अपने विचार उनको बताये।"

अस्तु. सामुदायिक ग्रामनिर्वासनाचा विचार पक्का ठरवून यावलीकरानी निर्वासन केलं या निर्वासनातील कष्ट अंगावर शहारे आणणारे आहेत ज्यानी मुसरीम (रेव्हिन्यू इन्स्पेक्टर) जवळून आपल्या गावचा तिरंगी झेंडा जबरीने हिसकावून आणला होता व गावची इज्जत वाचविली त्या ते शूर देशभक्त राजारामजी पाचघरे लिहितात—"त्यावेळीं गांवातील बायामंडळी बहुतेक

जंगल नेच दिसत होती कारण प्रत्येकाला आपापल्या इज्जतीची भीति वाटत होती शिवाय अरेरावीपुढे रक्षण करणें कठीण जात म्हणूनहि गावकरी लोकांनी गांव खाली केलें होतें मी बायामंडळीस घेऊन अडगाव रस्त्याने निघालों. दिवस बुडाला होता, लवकरच अंधार कीट्ट पडला. रातकिड्याचा आवाज प्रत्येक माणसास भेडसावीत होता अशाच स्थितींत बायाबरोबर लहान मुलें व मुलीहि बऱ्याच होत्या त्यांनी सारखें रडणें सुरू केलें स्त्रियानाहि अंधाऱ्या रात्रीं भीति वाटत होती. त्यांना कधींच पायदळ जाण्याचें काम पडलें नव्हतें त्यात पावसाचा, काट्याकुट्याचा रस्ता, अंधारी रात्र, पायात कांटे बोचत व ठेंचा लागत. आणखी त्यांना एक भीति जास्त त्रास देत होती ती ही की,—त्यांच्या घरातील माणसे व मुलें हीं सुरक्षित आहेत कीं नाहींत, किंवा त्यांना गोळ्या लागल्या याची त्यांना काहींच माहिती नव्हती घर सोडतेवेळीं त्यांच्या भेटीहि झाल्या नव्हत्या."

शेषराव पाचघरे व विक्रम सिनकर लिहितात—' रात्रीं नऊ वाजेपर्यंत व पाऊस येत असतानाहि काट्या-कुट्यातून अंधारात व जंगलात भटकत होतों फिरता फिरता आम्ही चिंचेच्या झाडावर चढलों होतों. त्या झाडावर सर्प दिसला त्याच्या भीतीनें झाडावरून खाली उड्या टाकल्या."

अशा रीतीनें सर्व गांव खाली झाला फक्त जखमी व आजारी माणसें आणि त्यांची सेवा शुश्रूषा करण्यासाठी लागणारी आवश्यक तेवढींच माणसें गांवात राहिलीं. गांवातील लोक व बायामुलें जंगलात निघून गेलीं त्यांचे जंगलातून रातोरात हिंडत असताना अतिशय हाल झाले आजपर्यंत ज्यांना कोणत्याच तऱ्हेने अडीअडचणींची सवय नव्हती अशाहि बायांना व मुलांना रानावनातून वणवण करीत भटकावें लागले हे हाल—ग्रामनिर्वासनाचें हें दिव्य—किती भयंकर होतें याची लडूशा फकीर याच्या पुढील हकीगतीवरून चांगलीच कल्पना येण्यासारखी आहे लडूशा लिहितो—" ता १८-८-४२ ला संध्याकाळीं मी व माझे घरातील मुलें व माझी स्त्री घेऊन यावलीहून तीन मैल अंतरावर सिरसगांव आहे तेथ जाण्यास निघालों स्त्रीला दिवस होते. तिचे दिवस पूर्ण होत आले होते सिरसगावला जातांजाताच रस्त्यावर माझी लक्ष्मी बाळंतीण झाली इकडे बाळंतपण इकडे धावपळ पळा, पकडणारे येतात

ही अफवा. मी तिला सिरसगांवला ठेवून देऊन पाच दिवसपर्यंत झाडावर बसून राहिलों ”

निर्वासितांचे गाव सोडल्यानंतर कोण हाल हाल झाले या विषयीं आणखी एकच हकीकत देऊन हें प्रकरण पूर्ण करूं प्रसिद्ध गोफणगीर बारकाजी खाटीक याची ही हकीगत आहे. बारकाजी खाटीक याने मावली युद्धाच्या चारहि चकमकींत आघाडीवर पराक्रम गाजविला होता आणि शत्रूच्या गोळ्या चुकवीत चुकवीत आपल्या गोफणीचा विनचूक मारा करण्याची जी विलक्षण चपलता त्याने दाखविली होती ती पाहून सर्व लोक चकित झाले होते. खाटीक जातींतला असा हा पराक्रमी देशभक्त आपल्या व आपल्या मुलांबाळांच्या निर्वासनाची अतिशय करुण कहाणी पुढीलप्रमाणे निवेदन करीत आहे —

“ जयहिंद गोळीबार झाल्यानंतर त्याच दिवशीं पांच वाजता मी गाव सोडलें आतापर्यंत आम्ही सर्व नि० सत्तेशीं लढलों. पण आता त्याच्या शस्त्रास्त्रांबरोबर कोठपर्यंत लढावें ? पहिल्या गोळीबारातच ३५।४० लोक जखमी झाले व पुन जर त्यांनी गोळ्या झाडल्या तर गावातील अर्ध्या लोकांना जिवंत रहावें लागणार नाही त्यापेक्षा आपण गावच सोडलेलं काय वाईट ? अशा प्रकारें विचार करून आम्ही गाव सोडलें मी आपल्या घरातील स्त्रीपुरुष व मुलें बाळें सर्वांनाच बरोबर घेतले रात्रीचा समय होता रस्ता बरोबर दिसत नव्हता त्यात हवापाण्यामुळे रस्त्यात कांटे उडालेले होते. अशा अडचणींशीं तोंड देत देत सावरगाव येऊन पोहचलों जवळ पैशाची सोय नव्हती बरोबर मुलेंबाळें. खायला अन्न नाहीं. मुलें गावात गेल्याबरोबर अन्न अन्न म्हणून मागे लागलीं अशा कठीण प्रसंगीं काय करावें हेंच मला सुचेना शेवटीं मुलांकरितां गांवात जाऊन भाकरी मागून आणल्या व मुलांना खाऊ घातल्या उरलेलें थोडें अन्न मुलांकरिता बांधूनहि घेतलें दुसरें दिवशीं सकाळीं मुलांबाळांना घेऊन शिराळ्यास गेलों. तेथे काहीच आश्रय न लागता तळवेलला गेलों तेथील पाटलाने नाव गाव विचारलें नाव गाव लिहिल्याशिवाय तुम्हाला येथ रहाता येणार नाही असें म्हणाला नतर मी तेथून वापस पुन्हा शिराळ्यास आलों व रात्र तेथ मोठ्या त्रासाने काढलं त्यानतर नायगावरून बाठोड्यास गेलों व नातेवाईकाकडे

दोन तीन दिवस राहिलों तेथेहि आश्रय लागेना व मुलाबाळाच्या खाण्यापिण्याची कांहीं सोय लागेना शेवटीं तेथून दर्यापुर गाठलें. तें माझ्या सासुरवाडीचें गाव होय. सासऱ्याचे घरीं जाऊन तेथे आम्ही सर्वजण राहिलों. हाल अपेष्टा, कठीण प्रसंग, रातोरात्रीं जंगलशेतातून आल्यावर एकदाचा थोडा का होईना पण आराम मिळाला. तरीपण मानसिक त्रास सारखा सुरूच होता. अफवांचा बाजार गरम होता त्यांची मजल येथपर्यंत जाऊन पोहचली होती की, यावलीचे जे लोक गाव सोडून पळाले त्याना सरकार गोळ्या घालून ठार करणार आहेत. अशा नाना तऱ्हेच्या बातम्या दिवसातून कित्येकदां ऐकायला मिळत

सासऱ्याच्या घरची परिस्थिति चांगली नसल्यामुळे जंगलचें काम करून आम्हा दोघांहि स्त्रीपुरुषाना मुलाबाळाच्या जबाबदारीतून मोकळें व्हावें लागत होतें. परक्या ठिकाणीं असल्यामुळे प्रथम कामहि रोज मिळत नसे. शिवाय मनःस्थितिहि नेहमी चलबिचल असे. एकादा मनुष्य मागाहून येत असला तर तो पोलीसच आहे असे वाटत असे व एकदम हातपाय थरथर कापायला लागत अशा कठिण स्थितींत महागाईशीं सामना करीत एक महिना काढला. ते दिवस जन्माचे आठवणीचे व त्रासाचे गेले. एवढे त्रास व हालअपेष्टा आणि मुलाबाळाची दैना जन्मात केव्हाच झाली नसेल. एक महिन्यानतर एके दिवशीं माहुलीचा कान्स्टेबल दर्यापूरला माझे सासऱ्याकडे आला व त्याने त्याला धाकदडप करून माझा पत्ता विचारला सायंकाळी मी कामावरून घरीं आलों तों काळ्या डगलेवाल्याची स्वारी दारात उभी होती. त्याने मला पोलीस स्टेशनमध्ये चाल असें म्हटलें. मी सांगितलें—मी काम करून आलों आहे. थोडें जेऊन घेतों व तुमच्याबरोबर येतो त्याने तें ऐकलें नाही. उलट माझ्या थोबाडीत दोन चापटा मारून मला स्वत च्या मुलाबाळाची भेट घेऊ न देता पोलीस ठाण्यात नेलें मी समजून होतों की—आता मला घरीं परत यावें लागणार नाही. तर मोठ्याघरीं ( जेलमध्यें ) जावें लागेल. पोलीस स्टेशनमध्यें गेल्यानतर तेथेहि मला मारठोक केली व गावातील हकीगत विचारीत होते दुसरे दिवशीं सकाळीं तेथून चलावन नेलें व उमरावतीस पाठविलें व नतर जेलमध्यें पाठवून दिलें

"मी जेलमध्यें गेल्यानंतर माझ्या घरच्या लोकांची भयंकर दैना झाली. जेलमधून सुटून आल्यावर स्त्रीच्या तोंडून माहिती ऐकली ती अशी की,— माझ्या स्त्रीने तर मी जेलमधून सुटून येईपर्यंत दोन्ही टाईम अन्न केव्हांच खाल्लें नाही खाल्लें नाही म्हटलेपेक्षा मिळालें नाही असें म्हणणें जास्त संयुक्तिक होईल आणि उपवास मुलांसमवेत तर पुष्कळच, काढावे लागत व स्त्रीला उपवास इतके पडले असतील की, त्याची गणति होऊ शकत नाही व शिक्षण नसल्यामुळें त्या गोष्टी लिहूनहि ठेवल्या नाहीत तरी पण झालेले हाल व कष्ट सर्व यावलीकराना माहीत आहेतच तेथला ल्हान मुलगासुद्धा या सत्य गोष्टीला कोणीही विचारलें असता एकदम काही विलंब न लागता सांगू शकेल. अशा कठीण प्रसंगीं जर पंजाबराव यांचे घरून व गावांतील जेलवासी बंधू यांचे घरून व काँग्रेस कमेटी उमरावती यांचे कडून मदत मिळाली नसती तर स्त्रीने सांगू शकतां की, माझी व माझ्या मुलांची व स्त्रीची भेट थये झाली नसती ती मला स्वर्गात घ्यावी लागली असती अशी ही गरीबीची करुण कहाणी आहे"

वारकाजी खाटीक यांची ही कहाणी उपलक्षणात्मक म्हणून दिली आहे अनेक कुटुंबाचे निर्वासनांत असेच हाल झाले पण ते सर्व त्यानीं शूरपणें सहन केले कुटुंबेंच्या कुटुंबें रानोमाळ भटकलीं गावोगाव फिरलीं कित्येकाना आश्रय मिळाला कित्येकाना मिळाला नाही ज्यानीं आश्रय दिला त्याच्यामागे पोलीसचा भुंगा लागला त्यामुळे त्याच्या येथून निघून पुन दुसरीकडे जावें लागे मिळकत नाही, आश्रय नाही, उद्योगधंदा नाही, इष्टमित्राची खबर नाही सगळीकडे आंदोलन दबलें होतें दडपशाहीचा नंगा नाच चालू होता. क्रांतीच्या झपाट्यापुढे धावरून गेलेले पोलीस आता सावरले होते. त्याच्या रूपाने सैतान सर्वत्र धुमाकूळ घालीत होता. यावली सोडून गेलेल्या कुटुंबाच्या मागेहि यमदूत लागले.

निर्वासनानंतर कित्येक तरुण कार्यकर्ते भूमिगत झाले. त्याच्यावर वारंटें सुटलीं. त्याना पकडण्यासाठी पोलीसचे लोक गावोगांव फिरू लागले खेड्या-खेड्याची त्यानी चाळणी केली घर न् घर धुंडाळण्याचा प्रयत्न केला. पण यावलीचे कित्येक भूमिगत कार्यकर्ते त्याना अखेरपर्यंत सापडले नाहीत अशा

रीतीने बराच काळ लोटला. महात्मा गांधींची आजारपणामुळे सुटका झाली. सुटका झाल्यानंतर भूमिगत नी उजेडात यावें व पोलीसांच्या स्वाधीन व्हावें म्हणून त्यांनी फतवा काढला. हा फतवा वर्तमानपत्रातून वाचायला मिळाल्यानंतर याव लीचे कित्येक भूमिगत सरकारच्या स्वाधीन झाले पण पोलीसांना ते शोधून काढतां आले नाहींत. भूमिगतांचा हा निर्देश केवळ ओघाने आला म्हणून येथे केला आहे त्याचा वृत्तांत 'न्यायकांडात' येणार आहे. असो

यावलीने ज्याप्रमाणे खुल्या युद्धाचा व दिव्य प्रतिकाराचा यशस्वी प्रयोग करून दाखविला, त्याचप्रमाणे तिच्या शूर जनतेने ग्राम निर्वासनाचें भयंकर दिव्यहि करून दाखविलें. त्यातूनहि ती मर्दपणे पार पडली पण तिने नि सर-कारसमोर मान वाकविली नाही, हार कबूल केली नाही आपलें स्वातंत्र्यप्रेम व राष्ट्रभक्ति तिळमात्र ढळू दिली नाही निर्वासनाच्या दिव्यातून पार पडणाऱ्या जनतेची धन्य होय!

---

## प्रकरण ९ वे

# लष्करी आक्रमण

ता. १८ आगस्टच्या पराजयाचें उट्टें काढण्यासाठी नि० सरकारचें लष्करी दल यावलीवर चालून येणार हा यावलीकराचा अंदाज अगदी तंतोतंत खरा ठरला. यावलीचें प्रतिकार सामर्थ्य नि० सरकारच्या प्रत्ययास आलें होतं. *त्यामुळे या खेपेस त्यांनी यावली परत जिंकून घेण्याचा ठाम निश्चय* केला आणि हुकमाचा एकाच फेकून मारला

ता १९ आगस्टला सकाळपासून लष्करी गाड्या येत असल्याची अफवा गावभर पसरली असल्या अफवा पसरुन देण्यासाठी आनंद आकाजी प्रभृति सरकारी हस्तक गांवात बसलेले होतेच त्यानी मागील प्रकरणीं वर्णिल्याप्रमाणे आदल्या रात्रीपासूनच असल्या अफवांचा बाजार गरम करून ठेवला होता १९ ता. ला सकाळीं १० वा च्या सुमारास लष्करी गाड्या माहुली मार्गे

वाघोलीच्या रस्त्यापर्यंत आल्या. त्याठिकाणीं त्यांनी आपला एक तळ ठोकला. बातम्या पोहोचत राहाव्या म्हणून बिनतारी संदेशयंत्राची व्यवस्था केली. ५० सैनिक सडकेवरील या तळाच्या रक्षणासाठीं ठेवण्यांत आले आणि बाकीची फौज चालत यावलीस गेली. गेल्याबरोबर तिने सर्व बाजूंनी गांवाला वेढा दिला आणि नंतर त्यातील कांही सैनिकांनी गांवात शिरून प्रत्येक घराची तलाशी घेण्यास प्रारंभ केला.

मोठ्या जोमाने यावलीचा प्रतिकार मोडून काढून आपल्या बाहूंचा कंड शमविण्यासाठीं आलेल्या ब्रि० लष्कराची प्रत्यक्ष यावलीस पोहोचल्यावर मोठीच निराशा झाली असली पाहिजे. ! यावलीस गेल्यावर त्यांना काय दृश्य दिसले ! कांही जखमी माणसें विव्हळत पडलीं आहेत. कांही म्हातारीं माणसें त्यांची शुश्रूषा करीत आहेत. बाकी सर्व गांव रिकामा पडला आहे. कोठे प्रतिकार नाही. कोठे गडबड नाहीं. सर्वत्र शांतता—स्मशान शांतता नांदत आहे.

त्या शूर पुरुषांची यावलीने मोठीच निराशा केली. अखेरीस सर्व जखमी माणसें त्यांनी आपल्या ताब्यांत घेतलीं. दोन दुकानांची लूट केली आणि जखमी लोकांना बरोबर घेऊन उमरावतीस प्रयाण केलें.

याप्रमाणे लष्कराची मर्दुमकी गाजल्यानंतर मग आनंद आकाजी, पोलीस प्रभृतीच्या कारवायांना ऊत आला. गांवाची लूट करण्याची फार दिवसाची आपली अतृप्त आकांक्षा त्यांनी तृप्त करून घेतली.

१५ व १८ आगस्टच्या सत्याग्रहांत व लढ्यांत भाग घेणारांवर नंतर ब्रि० सरकारच्या मुलकी अधिकाऱ्यांनी खटले भरले व ते न्यायासनासमोर चालले. हे खटले भरण्यासाठीं जी धरपकड सुरू करण्यांत आली तींतहि सापडतील त्यांना बेदम मारठोक करण्यांत आली. निर्वासितांच्या नातलगांच्या मागे पोलिसांचा ससेमिरा लागला. त्यांचा अनन्वित छळ करण्यांत आला. यावलीकडून १०००० रुपये सामुदायिक दंड सक्तीने वसूल करण्यांत आला. त्यासाठी कित्येकांची घरेंदारें बरबाद करण्यात आलीं. पाटील आनंद आकाजी व त्याचे हस्तक यांनी जी गांवची बेकायदा लूट केली तिचीहि सरकारी चौकशी झाली.

वीर पनावराव यांची गुरेंढोरें, शेतीभाती सर्व लुटण्यात आली व बरबाद कर ण्यात आली. हा सर्व वृत्तान्त आपणास पुढील न्यायकांडात पाहावयाचा आहे.

अस्तु निर्वसनाचा मार्ग शोधून यावलीकर जनतेने मोठ्या समजस-पणाने लष्कराच्या आक्रमणाचा उद्देश विफल करून दाखविला तिने गाव सोडलें पण आपल्या सन्मानाचें व उर्वरित तारुण्याचें रक्षण केलें पुढे कोर्ट-ऑर्डीज खटले शिक्षा व कैद या सर्वांच्या दिव्यातून यावली या जनतेला जावेंच लागलें पण ज्या शौर्यानें तिनें कृति करून दाखविली, ज्या बहादुरीने ती प्रति काराचा लढा लढली, ज्या संयमाने तिने निर्वासनाचें अग्निकाष्ठ भक्षण केलें, त्याच पराक्रमाने व चिकाटीने नि० न्यायासनासमोरहि तिने आपली बाजू मांडली व अखेरीस आंधळ्या न्यायदेवतेलाहि आपल्या पराक्रमाचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यास भाग पाडलें

---

## प्रकरण १० वें

# शहीदांना स्मृतिसुमनांजलि

यावली-स्वातंत्र्य संग्रामेतिहासाच हें 'हत्याकांड' पूर्ण करीत असताना. या हत्याकांडात ज्यांचें बलिदान घडलें त्या वीरांना, त्या अमर शहीदांना स्मृति-सुमनांजलि समर्पण करणें हें लेखकाचें पवित्र कर्तव्य आहे. त्यांच्या स्मृतिसमोर आपला माथा विनम्र करून हें कांड पूर्ण करण्यात येणार आहे

स्वदेशावरील आसक्ति ही मनुष्य स्वभावास धरून आहे परंतु स्वदेशा वरील, स्वराज्याच्या ध्वजावरील दिव्य आसक्तीसाठी स्वदेशासक्तीचा परित्याग करण्यास तयार होणें हा फार मोठा अनासक्तीचा योग आहे म० गांधींनी भगवद्गीतेचें सार 'अनासक्ति योग' या एकाच शब्दात काढून दाखविलें आहे हा दिव्य अनासक्ति योग ज्यांनी प्रत्यक्ष आचरून दाखविला आपल्या आत्म्याची भरारी साडेतीन हाताच्या देहाच्याबाहेर भारतवर्षाच्या अनंत आकाशाव ज्यांनी मारून दाखविली, कोणत्याहि लौकिक स्वार्थासाठी नव्हे, तर केवळ

आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी ज्यांनी देहाभिमान सोडून आपल्या रक्ताच्या चिळकांड्या उडविल्या व पंचप्राणांचेंहि बलिदान केलें त्या यावलीकर हुतात्म्याच्या स्मृतीला शतवार, सहस्रवार वंदन असो!!! ते खरे योगी! तेच खरे अध्यात्मवादी!! तेच खरे पुण्यश्लोक!!! तेंच भगवद्गीतेच्या 'सात्विक कर्ता' या संज्ञेने विभूषित होण्यास पात्र होते. गीता म्हणते—

मुक्त संगोऽनहंवादी धृत्युत्साह समन्वित. ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥

यावलीच्या शहीदांनीहि संग म्हणजे आसक्ति सोडली होती. धृति म्हणजे धैर्य व उत्साह यांनी समन्वित तर ते होतेच सिद्धि व असिद्धि याच्याबद्दल निर्विकार राहून म्हणजे फलाची पर्वा न करता केवळ कर्तव्य म्हणून त्यांनी युद्ध केलें आणि अशा तऱ्हेने लढतां लढताच ते मेले. सात्विक कर्ता ही संज्ञा त्यांनी यथार्थ करून दाखविली.

त्यांच्या रक्ताने परिसिंचित झालेल्या भूमीवरच स्वातंत्र्याची मनोरम बाग फुलूं लागेल. त्यांच्या चितेने पावन झालेल्या भूमीवर क्षेत्रस्थानें निर्माण होतील आणि प्रतिवर्षी या क्षेत्रस्थानाचं दर्शन घेण्यासाठी हजारो भारतवर्षीय सम्मीलित होतील व स्वतःस पावन करून घेतील. अशा या हुतात्म्यांना प्रणाम, त्रिवार प्रणाम !!!

१. शहीद बळिरामजी बोराडे—याचें वय २८ वर्षांचें होतें. यावली संग्रामांतील आघाडीवरील धाडशी वीरांपैकी हा एक होता. युद्धारंभापासून तों धारातीर्थी पतन पावेपर्यंत त्याने आघाडी सोडली नाही. पोलीस कर्मचाऱ्यांना पकडून निःशस्त्र करण्याचा याने दोनदा धाडसी प्रयत्न केला डी. एस्. पी. ग्रॅटने राष्ट्रध्वजाचें अपहरण करण्यासाठी जेव्हा राष्ट्रस्तंभास हात घातला तेव्हा तुळशीरामजी अवडकार यांच्याप्रमाणेच यानेहि ग्रॅटवर झडप मारली होती. मेल्हूमप्रभृति अधिकाऱ्यांनी, माफी मागून व परत जाण्याचें अभिवचन देऊन, जनतेच्या कैदेंतून आपली सुटका करून घेतल्यानंतर धोकेबाजीने जेव्हा गोळीबार सुरू केला, तेव्हा बळिराम बोराडेच पुनः त्यांच्यावर तुटून पडला. पोलीसांची

व याची जोराची चकमक झाली व त्याची फळी फोडून तो पुढे सरसावला व डे० क० मेल्ड्म याच्या अंगावर चालून गेला. हें पाहून त्याच्यावर एक गोळी झाडण्यात आली. ती त्याने चुकविली व पुढे मुसंडी मारली. म्हणून पुनः दुसरी गोळी त्याच्यावरच मारण्यात आली, ती मात्र त्याच्या मर्मस्थानीं लागली व तो खाली पडला.

त्याला त्याच्या घरीं पोंचविण्यात आल्यावर त्याची बहीण शोक करूं लागली. तेव्हा तिला उद्देशून तो जें बोलला त्यावरून त्याच्या अध्यात्मिकतेची व क्रांतिप्रवण राष्ट्रवादी विचारसरणीची कल्पना येऊ शकते. आपल्या बहिणीस तो म्हणाला–" बाई, कर्तव्य बजावल्याचें पूर्ण समाधान होऊन मी मरत आहे, म्हणून मला अतिशय आनंद होत आहे. माझ्या मरणाचा तूं शोक करूं नकोस. तुझ्या म्हातारपणीं मी तुझ्या तोंडात सुखानें घास घालीन व तुला पाणी पाजीन अशी तुला आशा होती. पण माझ्या मरणाने तुला निराश होण्याचें कारण नाही. मी संसारसागरातून मुक्त होत आहे. याबद्दल आनंद मान. परमेश्वर हा गरीबाचा वाली आहे. तोच तुझें रक्षण करील. तोच तुला वस्त्र देईल. अन्न देईल व पाणी पाजील. बाई, तूं सुखी हो. माझ्या भारतमातेसाठी मी सुखाने व आनंदाने आपले प्राण दिले आहेत. बाई, अशा आनंदाच्या मरणाच्या वेळीं तूं शोक सोडून दे; मला आशीर्वाद दे." याप्रमाणें बोलून ता. १८ आगस्ट १९४२ रोजीं दुपारीं ४ वा० त्याने प्राण सोडला.

२. शहीद मोतीरामजी पांचवरे—यांचें वय ३५ वर्षांचे होतें. घरीं म्हातारी बहीण, पत्नी व दोन मुलें एवढा परिवार होता. बळिरामजी बोराळे बरोबरच पहिल्या धाडसी हल्ल्यात यांनीही भाग घेतला होता. शत्रूच्या गोळीने बळिरामजी पडला हें पाहून हा त्याच्या जागीं पुढे सरसावला. आपल्या हातांतील लाठी फिरवीत तो डे० क० मेल्ड्म याच्यावर चालून गेला. पोलिसांनी लाठ्या घेऊन त्याच्यावर हल्ला केला. त्याशी चकमक उडाली. त्याने एकट्याने पोलीसांना पिटून काढलें व त्याची फळी फोडून पुन्हा मेल्ड्मच्या रोखाने तो पुढे सरसावला. पोलीस शिपायांची फळी फोडत असताना त्याच्या रोखानेच गोळ्या मारण्यात येऊं लागल्या. अखेरीस तो फळी फोडून पुढे सरसावतो तोंच एक गोळी त्याच्या पोटाला लागली व तो कोसळला. घळघळां रक्त वाहूं

लागलें. रक्तबंबाळ स्थितींतच त्यास घरीं नेण्यात आलें. घरच्या आकांत काय विचारावा ! म्हातारी बहीण, तरुण पत्नी, दोन कच्चीं बच्चीं, सर्वच मोंवती गोळा झाले. पण त्या सर्वांना धीर देऊन व त्यांचे सत्वन करून त्याने प्राण सोडला.

•

३. शहीद तुळशीरामजी तडसः—या तरुण वीराचें वय अवघें १७ वर्षांचें होतें. त्याच्या ओंठांवरील आईचें दूधहि अद्यापि वाळलें नव्हतें. याला एक वडील व एक धाकटा असे आणखी दोन भाऊ होते. धोकेबाजीने सुरु झालेल्या दुसऱ्या गोळीबारात पहिला बळी याच तरुण वीराचा पडला. त्याला घरीं पोंचविण्यांत आलें व तेथेच तो मरण पावला. त्याच्या मरणाने त्याचे भाऊ शोक करीत बसले नाहीत. बारकाजी व हिरामण यांनी जेव्हा पाहिलें कीं, आपला भाऊ गोळी खाऊन शहीद झाला, तेव्हा तेहि त्याच्याच मार्गाने जाण्यास सिद्ध झाले ते उठून त्वेषाने मेडमवर चाल करून गेले. हिरामणच्या पायास गोळी लागून तोहि घायाळ होऊन पडला. सूर्यभानजी तडसाच्या या तीनहि पुत्रांनी यावलीच्या संग्रामात भाग घेऊन आपल्या मातेची कूस धन्य केली !

४. शहीद कृष्णराव पवारः—या तरुण हुतात्म्याचें वयहि अवघें १८ वर्षांचें होतें. याची हकीकत पूर्वी आली आहे. १६ आगस्टला लुटारू सरकारी कर्मचाऱ्यांच्या टोळीचा प्रतिकार करताना त्याने जी चमक दाखविली तिनेच तो मित्र व शत्रु दोघांच्याहि डोळ्यात भरला होता. धोकेबाजी करून सुटका करून घेतल्यावर शत्रूने जो गोळीबार सुरूं केला त्यात दक्षिणेकडून गांधीचौकाकून येणारे आपले वीर कामास येत आहेत हें पाहून त्याने पश्चिमेकडून आपले साथीदार गोळा करून शत्रूवर त्वेपाने चाल केली होती. गांधी चौकांतील टक्कराच्या वेळींहि त्याने आपल्या पराक्रमाचें पाणी चांगलेंच प्रकट केलें होतें. या दुसऱ्या गोळीबाराच्या वेळीं पुन्हा स्वत: आघाडीवर राहून त्याने शत्रूवर जोराचा हल्ला करण्याचा प्रयत्न केला होता. त्यातच एक गोळी त्याच्या डोळ्याला लागली व रक्तबंबाळ होऊन तो धाडकन जमिनीवर पडला. रक्तस्राव अतिशय झाला. त्याला जवळच शत्रूच्या एका बैठकींत उचलून ठेवण्यात आलें. तिथेच पाण्याचा एक घोट घेऊन त्याने प्राण सोडला. याच्या धाकट्या भावालादेखील गोळी लागली होती. त्याने युद्धात चांगलाच पराक्रम व्यक्त केला.

५. शहीद राजारामजी औरंगपुरे—यांचें वय यावली युद्धाचे वेळीं ३० वर्षांचें होतें. सविस्तर हकीकत पूर्वीं दिलेलीच आहे तीवरून त्यांचें शौर्य केवढें प्रखर होतें व राष्ट्रध्वजावरील प्रेम किती उत्कट होतें याची कल्पना येण्यासारखी आहे आपला राष्ट्रध्वज शत्रूच्या तडाख्यातून सोडवून आणण्यात आला आहे हें पाहून त्यांनी केवढ्या समाधानाने प्राण सोडला इ० वर्णन पूर्वी आलेलेंच आहे.

६. शहीद जयरामजी वडोणे—यांचें वय ७० वर्षांचें होतें गांधी-चौकातील गोळीबारात यांचा मुलगा मोतीराम यास गोळी लागल्यामुळे म्हातारा कसा चवताळून गेला व वाघासारखा डे. क. मेन्डम याच्यावर तुटून पडला इ० हकीकत गांधी चौकातील लढाईच्या वर्णनात आलीच आहे. पुढे झालेल्या धरपकडींत यांना पकडण्यात आलें व त्यांच्यावर खटला भरण्यांत येऊन ४ वर्षांच्या सक्त मजुरीची शिक्षा त्यांना ठोठावण्यात आली ही शिक्षा भोगीत असतानाच १९४४ सालीं बैतुलच्या तुरुंगात त्यांचा अंत झाला. बाप आणि लेक दोघेहि राष्ट्रासाठी लढले आपला देह राष्ट्राच्या कामीं लावून जयरामजीने आपल्या म्हातारपणाचं चीज केलें.

७ शहीद गणपतराव यावले—यांचें वय अवघें २० वर्षांचें होतें. यांना गांधीचौकांतच लढता लढता पोटात गोळी लागली होती अतिशय रक्तस्राव झाल्यामुळें त्यांचीहि स्थिति अतिशय खराब झाली होती. १९ तारखेस लष्करी सैनिक यावलीवर चालून आले त्यावेळीं हे जवळ जवळ अखेरचा श्वास घेत आहेत असे वाटत होतें. अशा प्रेतप्राय जखमी माणसाला बरोबर घेऊन जाण्या पेक्षा येथेच ठार मारून टाकावें असें एक फौजी शिपाई बोलला परंतु दुसऱ्या एका मद्रासी शिपायाने त्याला परावृत्त केलें. पुढे इस्पितळांत ते दुरुस्त झाले. त्यांच्यावर खटला भरण्यात येऊन त्यांना ४ वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यात आली होती. परंतु पुढे हायकोर्टांतील अपीलात तेहि सुटले. वस्तुत त्यांच्या पोटावरील गोळीची जखम कायमची दुरुस्त झाली नव्हती. मधून मधून तिच्यातून पू वाहात असे. तुरुंगातून सुटून आल्यावर जखम अतिशय चिघळली आणि अखेरीस तिच्यामुळेच त्यांचाहि मृत्यु झाला.

# यावलीचा स्वातंत्र्य संग्राम

## —: न्याय-कांड :—

### प्रकरण १ लें
### न्यायालयांतून चाललेला संग्राम.

दहा दिवसात रशियन क्रांति झाली . त्या दहा दिवसाचें वर्णन 'जगाला हादरून सोडणारे दहा दिवस' असें रशियन लेखकांनी केलें आहे. हिंदुस्थानातील १९४२ च्या आगस्ट महिन्याबाबतहि असेंच म्हणतां येईल. सर्व जगाला हादरा देणारा महिना असें त्याचें यथार्थ वर्णन करता येईल; आणि त्याच एका महिन्यात ब्रि० साम्राज्यसत्तेला उलथून पाडण्यासाठी जे जे प्रकार झाले, ज्या मोडतोडी झाल्या, जे उत्पात घडले त्या सर्वांची बेरीज, जर्मनीने जिंकल्यानंतर फ्रान्सने आपल्या स्वातंत्र्यासाठी पुढील चार पाच वर्षांत जी धडपड केली व त्यात जे उत्पाताचे, मोडतोडीचे व घातपाताचे प्रकार केले, त्याच्या संकलित बेरजेपेक्षाहि अधिक भरेल. दीडशें वर्षें गुलामगिरींत असलेल्या हिंदुस्थानने अवघ्या एका महिन्यांत जें करून दाखविलें तें अगदी कालपरवापर्यंत स्वातंत्र्याचा उपभोग घेत असलेल्या फ्रान्सला सबंध चार वर्षांत करता आलें नाही !

१९४२ च्या आंदोलनाचा उत्पाती प्रकार होणें हा केवळ एक पैलू होता. वस्तुत: म० गांधी व काँग्रेसचे पुढारी याना ब्रि० सरकारने पकडल्यानंतर जनतेने सर्व देशभर जी उघड बंडाची उठावणी केली तीच गोष्ट

या आंदोलनातील अधिक महत्त्वाची बाब समजली पाहिजे ह्या उघड बंडाचा जोर ओसरल्यानंतर आणि आपली पडलेली बाजू आंतरराष्ट्रीय क्षेत्रात सावरून घेतल्यानंतर ब्रि० सरकारने भारतीय क्रांतीचा नि शेष बीमोड करण्याचें ठरविलें आणि तदनुसार त्याचें जबरदस्त दमनचक्र हिंदुस्थानभर फिरू लागलें उघड बंडात भाग घेणारे आणि घातपाती चळवळी करणारे या दोघानाहि पकडून तुरुंगात डांबण्यात आलें व त्याच्यावर खटले भरून त्याना निरनिराळ्या तऱ्हेच्या शिक्षा सुनावण्यात आल्या हे खटले भरता यावे, कोणासहि केव्हाहि नोकरशाहीच्या लहरीप्रमाणे पकडून ठेवता यावें व दिवसचेदिवस विनाचौकशी डाबून धरता यावें म्हणून निरनिराळ्या प्रकारचे काळे कायदे व्हॉईसरॉयच्यामार्फत अमलात आणले जाऊन अनिर्बंध व निरकुश अधिकार नोकरशाहीच्या हातात देण्यात आले होते या अधिकारांचें कोलीत हातात मिळाल्यापासून 'आधींच मर्कट तशातहि मद्य प्याला' अशी नोकरशाहीची स्थिति झाली असल्यास नवल काय ? पिशाच्या हातीं कोलीत सापडल्याप्रमाणें आपल्या हातांतील अधिकाराचा उपयोग करून नोकरशाही नागरिक स्वातंत्र्याच्या मूळभूत हक्कावरहि गदा घालू लागली आणि परिस्थितीने भेदरलेले, धादरलेले, हादरून गेलेले लहान लहान न्यायाधिकारी नोकरशाहीच्या बोटाच्या इशाऱ्यावर नाचू लागले

नोकरशाहीच्या उद्दामपणाची मजल या काळात इतकी वाढली होती की, हायकोर्टासारख्या वरिष्ठ न्यायालयाचे मूळभूत अधिकारदेखील ती धाब्यावर बसवू लागली होती हायकोर्टाच्या मूळभूत अधिकारांचें, वेगळ नोकरशाहीच्या अतिक्रमणापासून व मर्यादाभंगापासून सरक्षण करणें हें नवीनच काम शिरावर घेण्याची आवश्यकता वरिष्ठ हिंदी न्यायालयांना म्हणजे हायकोर्टांना वाटू लागली ४२ च आंदोलन ओसरल्यानंतरच्या काळात ब्रि० नोकरशाहीचीं कार्यकर्ती सत्ता आणि हिंदी वरिष्ठ न्यायालयें यांच्यात एक अपूर्व सघर्ष सुरू झाला व त्यात न्यायदेवतेनें शासनसत्तेवरील आपला अधिकार पाच्च सत्यशीलतेपण यशस्वी ही गोष्ट अवश्य ध्यानात ठेवली पाहिजे न्यायदेवता व शासनसत्ता यात श्रेष्ठ कोण हा प्रश्न १९४२

पासून १९४५ पर्यंत सतत तीन वर्षे चालू होता हा १९४२ च्या आंदोलनाचा पैलू विसरून चालणार नाही

" माझ्याकडे काही बडे न्यायाधिकारी आले होते व आंदोलनाच्या वेळीं आम्हीं काय करावें असें त्यांनी मला विचारलें मीं त्यांना इतकेंच सांगितलें की, तुम्हांस सांगण्यास मजजवळ कार्यक्रम नाही पण एक गोष्ट मात्र ध्यानात ठेवा आणि ती ही की, अन्यायाने कोणालाहि शिक्षा देऊ नका व कायद्याने अन्याय्य अर्थ लावू नका "--

ता ८ आगस्टच्या ऑल इंडिया काँग्रेस कमेटीच्या सभेंत वरील उद्गार काढून म० गांधी यांनी शासनसत्ता व न्यायसत्ता यांच्यामधील संभाव्य संघर्षाची जाणीव वरिष्ठ न्यायाधिकाऱ्यांना आधीच करून दिलेली होती हिंदुस्थानातील नोकरशाही युद्धप्रयत्नाच्या नावाखाली हळू हळू अमर्याद अधिकार आपल्या हातीं घेत आहे आणि त्या अधिकाराच्या बेगुमानपणात वरिष्ठ न्यायालयाच्या मूलभूत अधिकाराची देखील पायमल्ली करीत आहे हें दिसून येताच, हिंदुस्थानातील हायकोर्टे आपल्या मूलभूत अधिकारांचें व न्यायदेवतेच्या सन्मानाचें संरक्षण करण्यासाठी मोठ्या हिरीराने पुढे सरसावलीं आणि सतत तीन वर्षेपर्यंत हिंदी स्वातंत्र्याचा लढा आपल्या न्यायालयाच्या मार्फत त्यांनी पुढे चालविला हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याचा त्या काळातील हा पैलू नीट ध्यानात येण्याच्या दृष्टीने यावरचा खटला फार चांगला उपयोगी पडण्यासारखा आहे वस्तुत वर सांगितल्याप्रमाणे मुंबई, लाहोर, कलकत्ता, पाटणा व नागपूर हायकोर्टांची नोकरशाहीच्या अनिर्बंध सत्तेविरुद्ध आणि हायकोर्टाच्या मूलभूत अधिकाराचें संरक्षण करण्यासाठी लढत चालली पैकी मुंबई हायकोर्टाची लढत फेडरल कोर्टापर्यंत पोंहचली, तर नागपूर व कलकत्ता हायकोर्टाच्याविरुद्ध नोकरशाहीने प्रिव्ही कौंसिलकडे अपील केलें व तेथेहि थपडा खाल्ल्या

हिंदी हायकोर्टांनी आपल्या मूलभूत अधिकाराच्या संरक्षणासाठी पंचाहत्तरांनी मुसज्ज अशा नोकरशाहीबरोबर जी गंभीर लढत दिली त्यात नागपूर हायकोर्टाचें नाव अगदा अग्रभागीं राहील चिमूर-आष्टी-रामटेकचे

खटले, यावलीचा खटला, खानदेश दरवडा प्रकरणात श्री० पु० य० देशपांडे, ह० वा० देशपांडे, वा० गो० शेवडे व लेले प्रभृतींना पकडल्यात आल्यानंतर हायकोर्टासमोर चाललेले खटले, श्री० बा० ना० सावजी यांनी वरिष्ठ तुरुंगाधिकाऱ्यावर केलेला हायकोर्टाच्या बेइज्जतीचा खटला, इ० असे नानाविध मामले नागपूरच्या हायकोर्टासमोर आले व त्याच्या निकालानी आगस्ट क्रांतीचा पुरस्कार कायदेशीर ठरला, मोठमोठ्या तुरुंगाधिकाऱ्यांना शिक्षा झाल्या, चीफ सेक्रेटरीसारखा अधिकारी खोटें प्रतिज्ञापत्र भरतो असें दिसून आलें, वृत्तपत्राचे जामीन परत करावे लागले

पण या सर्व खटल्यात खरी बहारीची केस ठरली यावलीचीच या सर्व खटल्यांपैकी यावलीचीच हकीकत प्रस्तुत न्यायकक्षात यावयाची आहे पण यावलीच्या या खटल्याचें अनन्यसाधारण महत्त्व काय होतें याचे थोडक्यात निदर्शन करणें आवश्यक आहे ज्यांनी यावलीचा खटला हायकोर्टाच्या बेंचाकडे पाठविला त्या न्यायमूर्ति बोस यांच्याच शब्दात पुढे प्रकरण ५ मध्ये त्याचें विशेष विवरण केलें आहे

बाहेर मोकळा असलेला मनुष्य न्यायकोर्टाचा आश्रय घेऊन जेव्हा लढू पाहतो तेव्हा त्यास देखील शेवटपर्यंत टिकाव धरून राहणें अतिशय कठीण वाटत तेच ते कोर्टाचे खेटे लहानसहान गोष्टींसाठी पुढची तारीख, आज वकीलच हजर नाही, तर आज साक्षीदाराची तब्येत बरोबर नाही, आज साहेब दौऱ्यावर जाणार आहेत, तर आज दुसऱ्याच काही कारणासाठी खटला चालू होणार नाही इ० अनेक कारणास्तव जेव्हा पेशी मागून पेशी होत असतात आणि प्रत्येक पेशीवर कोर्टाचे खेटे घ्यावे लागतात, आपल्या तर्फेची माणसं हजर ठेवावी लागतात व साक्ष पुरावा इ० सगळ्या गोष्टी सगान असाव्या लागतात आणि आज इतक्या गोष्टी आटोपल्यारच असा क्यास मोठ्या हुरुपाने मनाशीं बांधावा तों साहेबाचा कोणीतरी कारकून येऊन पुढील तारीख झाली आहे म्हणून सांगू लागतो अशावेळी मोठीच निराशा पदरात पडते परंतु हे सगळे धक्के चपेटे खात खातच कोर्टाला लढा लढावा लागतो व मोठ्या निकराने व सततोद्योगाने दीर्घकालपर्यंत जो लढत राहील त्यालाच परिणामीं यश मिळण्याचा थोडाफार संभव असतो

बाहेर मोकळ्या असलेल्या माणसाला जर ही लढत इतकी बिकट जाते, तर तुरुंगात असलेल्या माणसाला ती, किती हजार पटींने कठीण जाते ह्याची कल्पनाच केलेली बरी यावलीला आपल्या स्वातंत्र्यसंग्रामाचा लढा, निर्वासनाच्या दिव्यातून पार पाडल्यानंतर, ब्रि० न्यायालयातूनच लढावा लागला हा लढा लढला जात असताना यावलीचीं पाच कर्तबगार माणसें दगावली होती आणि त्याशिवाय २५ माणसें जखमी झाली होतीं जखमी झालेल्या लोकांना १९ तारखेला जरी लष्करातील लोकांनी आपल्याबरोबर नेण्याचा प्रयत्न केला होता तरी सगळेच जखमी त्यांना गवसले असातला भाग नव्हता किस्येक जखमी निर्वासिताच्या बरोबर रानावनातून निघून गेले होते आणि त्याची नावें अखेरपर्यंत सरकारला कळू शकली नाहीत अस्तु

या जखमी लोकांच्याशिवाय सुमारें आणखी ३०-३५ लोकांना गिरफदार करण्यात आलें होतें एकंदर गावातले सुमारें ६०-७० कर्तबगार लोक अशा रीतीने तुरुंगात डडपल्यानंतर त्यांचे खटले चालविण्याकरिता चिकाटीचा जोरदार व गरज पडेल तेव्हा हवा तितका पैसा खर्च करू शकणारा असा मनुष्य सहसा बाहेर उरला नसेल! परंतु अशाहि परिस्थितींत, आपलें सर्व तारुण्य तुरुंगात अडकलें असताना, घरादाराचा जाहीर लिलाव चालू असताना, गुरेंढोरें व शेतीभाती यांची शत्रूच्या हस्तकाकडून लूट चालू असताना, उभीं पीकें करपलीं जात असताना आणि [illegible] सर्व आश्रय तुटला असतांना, धन्य यावलीची की, तिने सतत दोन अडीच वर्षेपर्यंत मोठ्या चिकाटीने, धैर्याने व आपल्या अंतिम उद्दिष्टाच्या निष्ठेने कोर्टांतून लढा दिला व अखेरीस त्यातहि विजय मिळवून दाखविला यावलींतील कित्येक आरोपी श्रीमंत होते तरीपण त्यांनी आपल्या बचावाच्या मोहास बळी पडून निराळे वकील ठेवले नाहीत.

---

## प्रकरण २ रें

# भूमिगतांच्या करुण कहाण्या



मागे सागितलेंच आहे की, यावेळीस १५ आगस्टपासून १८ आगस्टपर्यंत जे प्रकार झाले त्याबद्दल एकदर ६२ इसमाना शिक्षा झाल्या या शिवाय आणखी ९ इसम खटल्यात गोवण्यात आले होते पण ते खटला चालू असण्याच्या निरनिराळ्या अवस्थेंतच सुटले

याशिवाय ७ इसम असे आहेत की त्याना १८ ता च्या गोळीबारात गोळ्या लागल्या, पण पोलीसला मात्र त्याचा पत्ता लागू शकला नाही, त्यामुळे कोर्टाच्या दगदगींतून ते बचावले नाहीतर या सात घायाळ इसमावर खटला भरला जाणें व त्याना शिक्षा होणें या दोन्ही गोष्टी स्वाभाविक होत्या

यावेळीच्या हताहतांची थोडक्यात मोजणीच करून दाखवावयाची तर ५ जागच्या जागीं ठार ३० जखमी त्यातून २ तुरुगात अथवा तुरुगातून सुटल्यावर मेले एकूण ७१ इसमावर खटले भरून ६२ इसमाना शिक्षा दिल्या, खटला भरण्यासारखे सात इसम गवसलेच नाहीत एकूण १०००० रुपये सामुदायिक दंड १३४ लोकाकडून वसूल करण्यात आला

याशिवाय पाटील व पोलीस यानी एकूण १४ कुटुंबाकडून लाचलुचपत घातली नऊ इसमानी लाच दिली नाही म्हणून त्याना मारपीट करण्यात आली ३० इसमाच्या बैलजोड्या पाटील व कर्मचारी यानी अनधिकृतपणें आठ दिवसा-पासून २ महिनेपर्यंत वापरल्या ५ इसमाचीं उभीं शेतें कापून नेलीं

पाटलाचे हस्तक बनून ज्यानी जनतेवर जुलूम जबरदस्ती केली अशा २६ इसमावर पुढे ११० कलमाखाली खटले भरण्यात आले त्या सर्वांची पाटील साहेबानी स्वत चालत्या कोर्टापुढे जामीनकी भरली व त्यांची सुटका करून घेतली

वरील सर्व गोष्टींच्या तपशीलवार याद्या परिशिष्टांत देण्यात आल्या आहेत त्या वाचल्या असता वाचकाच्या हें ध्यानांत येईल की, यावलीची हिंमत खची व्हावी व यावलीने पिचून निघावें म्हणून क्रमे पद्धतशीर प्रयत्न करण्यात आले परंतु इतक्याहि आपत्तींतून जात असताना यावलीने क्षणभरदेखील आपली मान वाकविली नाही

१८ आगस्टचा गोळीबार झाल्यानतर पुढे जी धरपकड झाली तिच्या द्वाराच, त्रि सरकारच्या हस्तकानी आपला खरा धाक जमविण्याचा प्रयत्न केला मागील प्रकरणात सांगितलेंच आहे की, काळ्या कायद्याच्या रुपाने अमर्याद अधिकार नोकरशाहीच्या हातीं देण्यात आले होते नोकरशाहीला न्यायालयाची भीति वाटेनाशी झाली होती डिफेन्स ऑफ इंडिया कायद्याच्या १३९, २६ इ० कलमाखाली पकडलेल्या लोकाना नोकरशाहीने काही जरी केलें तरी त्याची कोठे दाद फिर्याद सुद्धा लागावयाची नाही अशी स्थिति होती बेमुदत अटकेंत ठेवणें, पोलीस ठाण्यातच डाबून धरणें व वाटेल तसे हाल हाल करणें, मारठोक करणें इ० अनेक अनन्वित प्रकार या काळातील बेताल व मदोन्मत्त नोकरशाही करीत होती कोण्याहि पोलीस शिपायाने उठून कोणाहि भल्या माणसाच्या घरात शिराव व त्याची अब्रु घ्यावी, त्याच्या घरातील वाटेल तें सामान उचलून न्यावें, असा अदाधुंद कारभार चालू होता •

अशा या कारभारात यावलीचे जे लोक पकडले गेले त्यांचे कोण हाल झाले असतील याची कल्पनाच केलेली बरी, पण कल्पना करण्याचेंहि कारण नाही त्यापैकी त्रिलोकाचीं वक्तव्येंच उद्धृत केलीं म्हणजे त्यावरुन अनायासेंच अटक झालेल्याच्या स्थितीची कल्पना येणार आहे ज्याचीं वक्तव्यें येथे देण्यात येत आहेत ते यावलीचे जबाबदार कार्यकर्ते आहेत १५ आगस्टच्या सत्याग्रहात व १८ आगस्टच्या युद्धात त्यानी जबाबदारीने व महत्त्वपूर्ण भाग घेतलेला आहे व काहीना काही स्मरणीय कामगिरी बजावली आहे अशा लोकाच्या वक्तव्यातून पोलिस कर्मचाऱ्याच्या अत्याचारविषयक येणाऱ्या कथा त्या टाकाऊ व बेजबाबदार होत, कारण त्या न्यायालयासमोर गेल्या नाहीत, असें समजण्याचें कारण नाही सर्वच जुलूम न्यायालयासमोर जातो असें नाही आणि न्यायालयासमोर

गेलेल्या प्रत्येक जुल्मी इसमाला शिक्षा होतेच असें नाही तशात सरकारी अधिकाऱ्यांना शिक्षा करण्याचे न्यायालयाचे अधिकारहि कमी करण्याचा प्रयत्न काळ्या कायद्यानी केलेला होता या ना सावरी याच्या केसचा नागपूर हायकोर्टात निकाल लागेपर्यंत, प्रत्येक सरकारी अधिकारी हेंच समजत होता की, चळवळ दडपून टाकण्याच्या शहाजोग नावावर आपण काहीहि जुलम केला तरी आपलें कोणीहि वाकडें करू शकत नाही अशा या बेगुमान समजुतीच्या अधिकाऱ्यानी यावलीकरावर काय काय जुलूम केले हें पाहण्यासारखं आहे

डी एस पी ने चोहन नेलेला राष्ट्रध्वज ज्यानी १८ ता० स मुनमरीम जवळून जबरीनें सोडवून आणला ते राजारामजी पाचपरे त्याच रात्री पजाबरावच्या घरच्या बाया मडळींना घेऊन जगलात निघून गेले त्यांच्या निवेदनाचा काही भाग हलाकाजातील निर्वासन प्रकरणात दिला आहे त्यापुढील काही भाग येथे उद्धृत करण्यात येत आहे त्यावरून पोलीसच्या पशुतुल्य व्यवहाराची कल्पना येऊ शकेल —

( बरेच दिवस भूमिगत स्थितींत काढल्यानतर )

" नतर मी विचार करून व सर्वांच्या भेटी घेऊन चांदूर बाजार पोलिस स्टेशनमध्ये गेलों तेथेच यावलीचे पाटील व माहुलीच्या पो० ठाण्याचे स० इ० हे होते सोनोरी येथे इन्क्वायरा करताना माझ्या सासऱ्याला वाटेल ते बोलले होते व असेंहि म्हणाले होते का, तुम्ही राजारामजींना आमच्यासमोर आण्णार नाही तर आम्ही त्याच्या स्त्रीला जेलमध्ये पाठवू म्हणून मी त्या सब इन्स्पेक्टरला विचारलें की, स्त्रीला तुम्ही का बोललात ? तुम्हाला कोणी आया बहिणी नाहीत की काय ? तें सर्व त्यानी ऐकून घेतलें व विश्वासराव व अजाबराव कोठे आहेत म्हणून विचारलें मी न सांगितल्यास मारण्याची धमकी दिली व ती खरीहि करून दाखविली मला दोघानी पकडून ठेवलें व तिसऱ्यानें चाळीस दडे माझ्या पाठीवर व अगावर मारले त्याचे घाव झाले होते ते तीन महिनेपर्यंत बुजले नाहीत मीहि निश्चय केला होता की, त्यानी माझा जीव घेतला तरी मी काहीहि माहिती सांगणार नाहीं त्याप्रमाणें अजाबराव व विश्वासराव कोठे

आहेत हें मला माहित असूनहि मीं त्याना सांगितलें नाही नंतर त्यानी मला चादूरवरून जेलमध्ये पाठवून दिलें "

अशा तऱ्हेने पोलीसने त्याना पकडल्यानंतर बेदम मारलें अशीं उदाहरणें काही थोडीं थोडकीं नाहीत

शेषराव पाचघरे लिहितो ( हा व विक्रम सिनकर हे दोघेहि बरोबरच भूमिगत झाले )—" गोकुळअष्टमीचा सण होता मी घरगांवला होतो सारी मंडळी व्यवसाय करीत होती तोंच पोलीस व यावलीचे पाटील व पोलीस सर्कल हे सर्व जोड्यासहित घरात चुलीपर्यंत शिरले व दटावून विचारू लागले कीं, शेषराव पाचघरे व विक्रम सिनकर येथे आले होते ते कोठे आहेत ते दाखवा नाहीतर आम्ही पाहातो आमच्या येथे ते नाहींत असें सांगितल्यावर ते घरात घुसले व कणगींत, गोठ्यात, सडासात, विहिरींत कंदील घालून पाहू लागले पण ते दिसेनात तेव्हा घरमालक गणपतराव वासनकार व त्याचा भाचा गंगारामजी काडरकार या दोघाना पोलिस स्टेशनमध्ये नेऊन गंगारामजीस खूप मारलें

आनंद आरानी पाटील व सब इन्स्पेक्टर कावळे यांच्या छळास बळी पडलेले यावलीचे शेट रामकिसनजी अन्नादासजी मारवाडी यानी लिहून दिलेल्या माहितींतील नमुन्यादाखल कांही भाग खाली देतों —

ता० १८ ८ ४२ चें स्थीं न पाहिलेलं रणकांड पाहून सर्वांचीं मनें भेदरलीं होतीं पुढे काय होणार ? आता काय करावें ? हेच प्रश्न आमचेसमोर होते अधिकारी लोक गेल्यावर जखमी लोकांची सुरक्षित जागीं व्यवस्था करण्यात आली व शक्य ते उपाय करण्यात आले अमरावतीहून डॉक्टर आणण्याचें ठरल्यावर माझी आई काशीबाई हिने रुपये देऊन अनाकराव याना डॉक्टर आणण्यास रवाना केलें गोळीबारातील लोकांची खाण्यापिण्याची व्यवस्था लावण्याकरिता व त्याचे घरीं आवश्यक सामान पाठविण्याकरिता माझी आई घरीं राहून मी त्याच रात्रीं दोन वाजता गावामधून गिरवेडला निघून गेलों माझी स्थिति भेदरल्यासारखा होती तरी पण मला अंतःकरणातून कोणीतरी

अदृश्य शक्ति धीर देत होती असें वाटे. त्या शक्तीच्या जोरावर आम्ही मार्ग क्रमित होतों. ता० १९ ला सर्वांची व्यवस्था केल्यावर माझी आई १० वाजतां मुलबाळांना घेऊन यावलीवरुन निघून संध्याकाळीं ७ वाजता शिरखेडास पोहचली. वाटेत येताना त्याना उन्हाचा व चिखलाचा भयंकर त्रास सहन करावा लागला. तेथून ७ दिवसानी यावलीचे पाटलाचा लहान भाऊ शिरखेडास आला व सांगूं लागला—" तुमचेवर वारंट आहे. तुम्ही आम्हास दहा हजार रुपये द्या. म्हणजे सर्कल साहेबाकडून तुमचा वारंट कमी करण्यास लावतों. नाहीतर तुम्हास जेलमध्ये जावें लागेल ! मी आताच सब इन्स्पेक्टरला भेटून आलो. ! " मी त्याला सांगितलें की, " आमचेजवळ रुपये नाहीत. आमचें आम्ही पाहून घेऊं. आमच्याकरिता तुम्ही एवढी काळजी वाहूं नका." इतक्यात माझी आई आली व त्याला म्हणाली, ' माझा मुलगा जेहलांत गेला तरी चालेल. पण तूं येथून निघून जा. आम्हांस माहीत आहे की, तुम्ही कसे लोकाचे भले करणारे आहांत ? " असें बोलणें झाल्यावर तो तेथून निघून वापस गेला. त्याने आनंद आकाजीस व सब इन्स्पेक्टरला एकाचे दोन सांगितले, ' रामकिसन व त्याचे आईने तुम्हांस धिःकारलें. तुमची निर्भत्सना केली. तुम्हास अपशब्द बोलला. ' ही घटना घडल्यानंतर आनंद आकाजी पाटील व सबइन्स्पेक्टर हे शिरखेडला आले व त्यानी आम्हांस शक्य होता तेवढा शाब्दिक धाक दाखवून रुपये काढण्याचा प्रयत्न केला. पण अखेर मीं त्याना तेंच सांगितलें की, ' मासें काय होण्याचें तें होऊं द्या. पण माझेजवळ रुपये नाहींत. ' त्यानंतर 'पाचसहा दिवसानी आम्ही सर्व यावलीस येऊन राहूं लागलों. आणखी ८ दिवसानी पाटील व त्याचा भाऊ हे येऊन म्हणाले.— ' आम्ही म्हणतों यावर आपण विश्वास ठेवीत नाही व पुढे मग पश्चाताप पावाल. अजूनहि कांही' व्यवस्था करा. वारंट कमी करता येईल. अधिकारी लोकांनी तर तुम्हांस केव्हाच कैद करून टाकलें असतें. पण मी त्याना तुमच्या माझ्या प्रेमाचे योगाने थांबून ठेवून राहिलों. तुमचेजवळ रुपये नाहीत तर माझी पस्तीस तिफण जमीन तुमचेपाशी कर्जांत आलेली आहे तीच वापस करून टाका. म्हणजे मी सर्व तुमच्याकरिता करतों. ' मीं त्यांना म्हटलें, ' आनंदराव, आजपर्यंत तुम्ही स्वार्थाकरता खूप आटापिटा केला. आपले गावचे लोकांनीं एवढें दिव्य करुन दाखविल्यावर तुम्हांस त्याबद्दलचा अभिमान वाटावयास पाहिजे ? कधीं पडली नाही एवढी

देशाची सेवा यावेळीं आपल्या गावानें करून दाखविली अशा वेळीं तुम्ही सर्वांना जेवटी साधेल तेवढी मदत करावयास पाहिजे पण तुम्ही लोकांना पिळून काढण्याची वृत्ति धारण केली हें योग्य नाही हा आपणा सर्वांना कालिमा आणण्यासारखा प्रश्न आहे मी आपणास काहीच देऊ शकत नाहीं आपण माझ्याकरिता काहीच करू नका ' असें शेवटचें बोलणें झाल्यावर अखेर त्याना पूर्ण समजून आलें की, याचेजवळून या पद्धतीनें काही निघत नाही

" असे सर्व उपाय केल्यानतर पाटलानें यावशेताल सोमोशी महाराजा त्याच्या शेतातून ज्वारीच्या कणसाच्या चोऱ्या करण्यास लावलें व त्याप्रमाणे गावातील उभ्या पिकाच्या चोऱ्या एकसारख्या होण सुरू झाल्या पुढे या सर्व लोकावर ११० ची कारवाई होवून अखेर पाटलालाच त्याची जमानत घ्यावी लागली

" पुडे माझ्यावर ३५०० रुपये सामुदायिक दड बसविण्यात आला यावेळीं गावातील भूमिगताना मला मदत करावी लागली पण पाटलाची पाळत एकसारखी माझ्यावर असावयाचीच.

" मारुती कलाल नावाचे तरुणास पाटील यानें भाति दाखवून त्याचे-जवळून ४० रुपये घेतले व त्याची दोन एकरची जमीन हवालदाराचे नांवानें खरेदी करून घेतली मला समजल्यावर मीं ती जमीन मारोतीस यापरत देवविली अशा एकच काय पण कितीतरी गोष्टी आहेत त्या विस्ताराचे भयानें लिहीत नाही. "

रामभाऊ सितारामजी पाचघरे लिहितात— " राजारामजी पाचघरे रागाच्या भरात पोलीस स्टेशनमध्ये हजर होऊन आनंद आकाजी पाटील व माहुर्लीचे सबइन्स्पेक्टर याना म्हणाले की, सोनोरीत चौरशी करतेवेळीं मी जर तेथे नसतों तर तुमची जीभच छाटून टाकली असती आम्हीं सरकारच्या दृष्टीनें दोषी असलों तरी, आमच्या निर्दोष बायकोला तुम्ही का धमकावलें ? हा मीं हजर आहे. माझे काय तुकडे करावयाचे असतील ते तुम्ही करून घ्या ! असें राजारामजींनीं म्हटल्यानंतर त्यांना पोलिसानी बेदम मार दिला त्यावेळीं मला फार क्रोध आला आणि चवताळून पोलिसाना म्हटलें— गुर्ख हो !

हा काय तुम्ही धूमाकूळ घातीत आहात बदमाषी करताना काहीतरी विचार करावा लागतो मीं असें म्हणताच आनद पाटलाने व पोलिसांनी मजवर शिव्याचा वर्षाव केला आणि धमकाविलें की, 'जरा ठहरो, तुम्हारीभी यही हालत होगा !' मला पाटलाने सोडून देण्याकरिता २०० रु ची मागणी केली मी रुपये देत नाही असें दिसून आल्यावर तुरुगात रवाना केलें "

अनावराव उर्फ अण्णा बाजानी पाटील हे भूमिगत झाल्यावर भोपाल स्टेटमध्ये गेले तेथे त्याना कळलें की, त्याचें घर, शेती व गुरें जप्त झाली आहेत गुराचा लिलाव होऊन चुकला आहे आणि ता १८-१० ४२ ला उमरावतीच्या कोर्टात जर तुम्ही हजर झाले नाही तर तुमचें घर व शेती याचाहि लिलाव करण्यात येईल, "म्हणून"— ते लिहितात—'ता १८-१० ४२ ला दुपारी १ वाजता उमरावतीस आलो व श्री पाडे वकील याचे सल्ल्याने सब डिव्हिजनच्या कोर्टात हजर झालों लागलीच सब डिव्हिजन साहेब मला म्हणाले, 'काहो, नरसिंगपूरचे पाटील, तुम्ही आता का हजर झालात ?' त्यावर मीं त्यास सागितलें, 'तुम्ही जर शेती व घर हर्रास केलें नसतें तर मी तुम्हास केव्हाच सापडलों नसतों '

यावलींतील एकदर आदोलनाच नेतृत्व सुरवातीपासून श्री पजाबराव यानीच केलें असल्यामुळे त्याच्यावर सर्वच अधिकाऱ्याचा अतिशय दात होता १५ तारखेच्या मजकुरावरून पजाबरावावर तीन निरनिराळे आरोप ठेवून खटला भरण्यात आला होता व त्यात प्रत्येक आरोपाबद्दल त्यास पाच वर्ष सक्त मजुरीची शिक्षा देण्यात आली होती पण एवढ्यानेच दुष्ट नोकरशाहीचें समाधान होण्यासारखं नव्हतें त्यानी त्याना केसमध्ये १००० रुपये दड केला श्री पजाबराव याचे घरावर फारच सक्त लक्ष लागले श्री पजाबराव याचे कनिष्ठ बधु श्री विश्वासराव व चुलते अनावराव हे दोघेहि भूमिगत झाले पाठीमागे त्याच्या गैरहजेरींत त्याच्या घरांदारांवर छापे मारून त्याचें सर्वस्व लुटण्यात आले श्री पजाबराव याची इस्टेट त्याना कोणी नातेवाईक व स्नेहीजन नाहीत यासबबीवर पाटील आनद आडानी याना रिसीव्हर नेमून त्याच्या स्वाधीन करण्यात आली या आनंद आडानींनें श्री पजाबराव याचीं गुरें सुमारें १५००रु किंमतीचीं अवघ्या ३५० रू. म हर्रासात विकून

टाकलीं आणि ५००० रु. किंमतीचें पीक हर्रासांत स्वतःच ६५० रु. स विकत घेऊन टाकलें. अखेरीस श्री. पंजाबराव ह्यांचे आतेभाऊ भीमराव यांनी इस्टेटीचा ताबा मागितला व तसा हुकूम मिळविला. परंतु आनंद आमाजी पाटील व त्यांचे हस्तक यांनी ताबा देण्याचें नाकारलें. उलट उभें पीक मात्र कापून आणलें. अखेरीस पुन्हा श्री पंजाबराव यांचे आतेभावाला आनंद आमाजी पाटील यांचेजवळून ताबा घेण्यासाठी पोलीसची मदत घ्यावी लागली, " असो.

फकीर लडशा लिहितो--" शांतता झाली असेल म्हणून गांवात आलों. तसेंच पाटलाने मला माहुलीस पोलीस स्टेशनमध्ये नेलें. स्टेशनमध्ये नेल्यावर त्याठिकाणीं आम्हांला कांहीच न विचारता, मारणेंच सुरू केलें मारणारा गोविंदराव कावळी सबइन्स्पेक्टर हा होता दोन दिवस मला पोलीस स्टेशनमध्येच रहावें लागलें. त्याच अवधींत नरसिंगपूरचे काशिराव महार व सूर्यभान महार व यावलीचे नशीबखा यांना भयंकर मारण्यात आलें. त्याच्या मुंडक्या धरून दिवालीवर आपटण्यांत आल्या नशीबखा व सूर्यभान याना घोडी देऊन मार देण्यात आला. "

शहीद राजारामजी औरंगपुरे यांची आई सयाबाई लिहिते "(राजारामच्या मृत्यूमुळे ) मला फार डोंगर कोसळू लागल्यासारखा झाला. त्यात सरकारी अधिकारी, पोलीस, गुलाब हवालदार, शामदार महार यांनी सारखे येऊन विचारपूस करावी की, विश्वासराव कुठे आहेत ? अजाबराव कुठे आहेत ? एक महिनाभर त्यांनी फार त्रास दिला गोळीबाराच्या तिसऱ्या दिवशीं माझें घर सरकारनीं खोदलें, कुलूप फोडलें आणि विचारलें की, तुझ्या मुलाने तलवार कोठून आणली होती ? आणखी कांही शस्त्रें घरात आहेत काय ? त्यावर मीं त्याना कोणतीहि माहिती सांगण्याचें नाकारलें. "

केवळ नमुन्यादाखल म्हणून पोलीसांच्या अत्याचाराची ही कांही उदाहरणें वर दिलीं आहेत. शितावरून भाताची परीक्षा या न्यायाने, यावलीच्या लढ्यांत ज्याना पकडण्यात आलें त्याच्या कष्टाची वरील उदाहरणांवरूनहि कल्पना येण्यासारखी आहे.

या खटल्यात जे लोक भूमिगत झाले त्याच्या शोधासाठी पोलीसानी कसें आकाशपाताळ एक केलें याची कथादेखील इतरीच अद्भुत व पोलीसाच्या काळ्या अतरगावर प्रकाश टाकणारी आहे

मागील वर्णनावरून वाचकाच्या हें ध्यानात आलेंच असेल की १९४२च्या यावलीच्या आदोलनाचा मूळ उत्पादक व प्रेरक या नात्याने वीर पजाबराव याच्यावर पोलीसचा खरा दात होता श्री पजाबराव याच्या इस्टेटींचें वर्तमान् पूर्वी सागितलेंच आहे वीर पजाबरावच्या खालोखाल पोलीमचा दात त्याचे बधु विश्वासराव व चुलते अजाबराव उर्फ अण्णा पाटील याच्यावर होता हे दोघेहि ता० १८ ला भूमिगत झाले पैकी अजाबराव केव्हा, कधी व कसे पोलीसच्या स्वाधीन झाले याची माहिती त्याच्याच वक्तव्यात पूर्वी दिली आहे आता थोडी विश्वासराव याचीहि हकीकत याठिकाणीं उध्दृत करू

भूमिगत स्थितीतील आपल्या अवस्थेचें एक सविस्तर निवेदन विश्वासराव याना लिहून काढलें आहे त्यातील त्याचा शोध करण्यासाठी इतराचा छळ कसा करण्यात आला या विषयींचा उतारा पुढे देण्यात येत आहे

"मी व अजाबराव हे दोघेहि फरार झाल्यानतर पाटील व सब-इन्स्पेक्टर यानी गावामधून लोकाना काही दिवसानी पकडणें सुरु केलें लोकाना पकडताना व इन्क्वायरी करताना त्यानी लोकाना मारपीट केली व कित्येकाजवळून पैसे खाऊन त्याना सोडून दिलें कित्येकाना धमकावण्या दिल्या व जेल्ची भीति दाखवून पैशाची भरमसाट लूट केली कित्येक लोका या तपासाकरिता गावोगाव त्या त्या लोकाच्या आप्तेष्टाकडे जाऊन तपास केला व जो जेथे मिळेल तेथेच जशा स्थितींत असेल तशाच स्थितींत त्यास अरेस्ट केलें कित्येक आप्तेष्टाना व तेथे असणाऱ्या स्त्री पुरुषाना धमकावण्या देऊन त्याचेकडून फरार लोकाचे पत्ते काढून घेतले मारही व अनाचार याची चौकशी करताना अनेक प्रकार घडले

"आमच्या तपासाकरता ते लोक (पाटील व पोलीस) आम्हा पाठक येथे गेले तेथे अजाबराव याचे जावई होते त्याचे येथे जाऊन त्यानी

त्यांच्या घराची झडती घेतली. त्या घरातील कोनाकोपरा त्यांनी धुंडाळून काढला. पुरुष मंडळीजवळ चौकशी केली व पुढे स्त्रियानाहि विचारावयाचें आहे असें म्हणूं लागले. परंतु या थराला गोष्टी गेल्यावर माधवराव यांनी त्यांना घराच्या बाहेर काढून दिलें.

" कृष्णापूर येथे श्रीराम ठाकरे यांचेकडे त्यांनी आमची चौकशी केली. तेथे तुम्ही विश्वासराव यांचा पत्ता सांगा, नाहीतर तुम्हांलाहि जेलमध्ये टाकण्यात येईल, अशा धमक्या दिल्या.

" मंगरूळ येथे नानासाहेब वानखेडे व कुंडचे मारोतराव पाटील आणि अमरावतीचे डॉ॰ पडोळे यांच्याहि घरांच्या आमच्या चौकशीसाठी झडत्या घेतल्या. अजाबराव यांना पाहण्यासाठी ते आरेगावला गेले व तेथे मारोतराव पाटील यांच्या घराची झडती घेतली. माझ्या तपासाकरिता ते दोन दिवस वर्धेस येऊन राहिले पण आम्ही दोघे व अबदुल रहीम व बारकाजी तडस हे त्यांना शेवटपर्यंत सापडलों नाही. आमच्या इस्टेटी जप्त झाल्यामुळे व हरासाची तारीख निश्चित ठरवल्यामुळे त्या तारखेवर आम्ही दोघेहि हजर झालों व पोलीसच्या स्वाधीन झालों. जेव्हा म॰ गांधीजींनी फरार लोकांना *पोलीसच्या स्वाधीन होण्याची सूचना केली, तेव्हांच अबदूल रहीम व* बारकाजी तडस हे त्यांच्या स्वाधीन झाले. "

*भूमिगतांचा भूमिगत अवस्थेतील अनुभव फार चित्रविचित्र व मनोरंजक* आहेत. कित्येक ठिकाणीं जवळचीं आप्त माणसेंहि आश्रय देण्यास नाराज, तर कित्येकदा खुद्द पोलीस कान्स्टेबल्स यांचेंच अज्ञात राहण्यास अनपेक्षित साह्य मिळे कित्येक ठिकाणीं नातलगांना निश्चित पत्ता असून वाटेल तो छळ त्यांनी सहन केला, पण पत्ता दिला नाही. तर कित्येक ठिकाणच्या नातलगांना ही *आपणावर नसती तोहमत आहे असें वाटलें; व त्यांनी पत्ते सांगितले. कित्येक* ठिकाणीं हिंदु भूमिगतांना मुसलमानांचें साह्य झालें, तर कित्येक ठिकाणीं मुसलमानांना हिंदूंनी साह्य केलें मनुष्य जितका दरिद्री अधिक, तितका तो अधिक प्रामाणिक व देशाविषयीं कळकळ बाळगणारा असा सामान्यतः अनुभव आला तथापि स्थूलमानाने असें म्हणता येईल की, भूमिगत ज्या ज्या

ठिकाणी गेले तेथे प्रामाणिक साह्यकर्तेच त्याना अधिक भेटले आणि बेइमान व देशद्रोही असे लोक कमी भेटले रिसेबेक भूमिगत सुद्द अमरावतात दोन दोन महिने राहिले खटले चालविण्यासाठी वकीलाना मदत करणे, इतर भूमिगताच्या व तुरुगात गेलेल्याच्या कुटुंबियाना मदत करणे इ० कामें अमरावर्तीत राहून करणेच त्याना सोयार्च गेलें रिसेबेक नावें बदलून व रोगी बनून महिना महिना अमरावतीच्या इर्वीन हॉस्पिटलमध्ये राहिले एवढी गोष्ट खरी की, पोलीस व पागील त्याच्या मागावर आहेत ही गोष्ट त्याना बहुधा आगाऊच कळे व त्यामुळे त्याना स्थलांतर करता येई

पण गोळ्या लागून जे भूमिगत झाले त्याचे या सर्वांपेक्षा फार हाल झाले गोळाची जखम ही लपत नाही तिचे उपचार तर चालू ठेवावयाचे, शिवाय पोलीस मागावर आहेत म्हणून गावोगाव भटकत राहावयाच हें अतिशय कठीण कर्म होतें गोळीची जखम आहे हें कळताच पोलीस पकडणार ही ठरलेली गोष्ट होता यावलीचा गोळीबार, त्यानतर यावलीस झालेले अत्याचार, यावलीचे फरार लोक, पोलीस त्याचा करीत असलेला तपास, कोर्टात झालेले खटले या एकाच गोष्टीचा चर्चा सामान्यत मोटारात मोटार स्टडवर, हॉटेलातून व इतर कोणत्याहि अड्ड्यावर चालत असे नवा अनोळखी चेहरा दिसला की, हा यावलीचा तर नाहाना, अशा भावनेने त्याचेकडे सर्वजण पाहात मोटारींतून पोलीस बसलेले असतच सगळीकडून इतकी कडक नाकेबदी होती की, ती सर्व चुकवून फिरत राहावयाच म्हणजे एक अतिशय दुस्तर कर्म होत आणि जखमी लोकाना तर त फारच बिकट होत पण अशाहि स्थितींत पुष्कळसें स्वत च्या बळावर व पुष्कळसें सार्वजनिक सहानुभूतीवर यावलीचे भूमिगत फिरत राहिले व अनेक प्रसगा त्यानी हुशार पोलिसानाहि चागलेच खडे चारले गोविंदराव आनडकार व आणखी दोन गोळ्या लागलेल्या लोकाचा उपचार अशा बिकट स्थितींत अमरावताचे डॉ० पडोळे यानी केला त्याकरता पोलीसानी त्याना अतोनात त्रास दिला तरी ते आपल्या कर्तव्यापासून ढळले नाहीत

---

## प्रकरण ३ रें.

# यावलीच्या हत्याकांडाचा खटला.

ता० १८ ऑगस्ट १९४२ रोजीं झालेल्या गोळीबार प्रकरणीं तब्बल दोन महिने धरपकड, मारझोड, वच्च्या जबान्या वगैरे पूर्वतयारी करून सर्कल इन्स्पेक्टर ऑफ पोलीस मि० वेकरे यानी ता०२३-१०-४२ रोजीं इंडियन पीनल कोडाच्या १४८ कलमाखाली व त्याला १४९, ३३२, ३३३ व ३०७ हीं कलमें जोडून, आरोपपत्रक तयार केलें व खटला दाखल केला

या तऱ्हेचे खटले चालविण्यासाठी त्या काळात खास न्यायाधीश नेमण्यात आले होते व विशिष्ट खटले चालविण्यासाठी प्रांतिक सरकारच्या लीगल रिमेंब्रसरकडून त्याना अधिकार देण्यात येत होते या नव्या पद्धतीस अनुसरून वऱ्हाड-मध्यप्रांत सरकारचे त्या वेळचे लीगल रिमेंब्रसर मि० ए एन शहा यानी १०-१०-४२ व २३-१०-४२ रोजीं दोन वेगवेगळे हुकूम जारी करून, पहिल्या हुकूमाअन्वयें ३६ व दुसऱ्या हुकूमाअन्वयें अधिक १२ अशा एकूण ४८ आरोपींचे खटले चालविण्याचा अधिकार स्पेशल जज्ज मि० डी वी दडे याना दिला या हुकुमात "इ० पी० को० १४८, ३०७ व ३३३ हीं कलमें १४९ कलमा बरोबर वाचून, व आणखी जीं जीं कलमें साक्षीपुराव्यानंतर लागू होण्यासारखीं असतील, तीं लावून" खटला चालविण्यात यावा असें म्हटलें होते

या खटल्यात सरकारतर्फे एकूण २६ साक्षीदार देण्यात आले होते त्यांत डेप्युटी कमिशनर मि० मेल्डूम, सार्जंट ब्रॉन, सिव्हिल सर्जन मेजर डब्ल्यू स्कॉट, हौस सर्जन डॉ० ई० एफ० रोझारियो, डॉ० पावडे,

बडनेऱ्याचे सर्कल इन्स्पेक्टर एम. जी. केकरे, माहोलीचा सब इन्स्पेक्टर गोविंदराव वावळे, यावलीचा पाटील आनंद आनाजी, नायब तहसीलदार अनीस महंमद, नायब तहसीलदार एन् डब्ल्यू चौधरी, इ० महत्त्वाचे साक्षीदार होते

सरकारी व बिनसरकारी लोकांना ज्या जखमा झाल्या होत्या, त्याची तपासणी व उपचार अमरावतीच्या इर्विन हॉस्पिटलमधील सिव्हिल सर्जन व डॉक्टरांनी केलेले असल्याने त्याच्या साक्षीलाहि महत्व प्राप्त झालें होतें.

पुराव्यात दोन फरशी म्ह० कुऱ्हाडी, दोन भाले, एक लोखंडी गर्डर, एक बल्लम ( टोकदार लोखंडी कांब ), एक लोखंडी कांब आणि बारा लाठ्या दाखल करण्यात आल्या होत्या.

ता० २६-१०-४२ पासून साक्षीपुराव्यास प्रारंभ झाला. पहिली साक्ष इर्विन हॉस्पिटलमधील डॉ० पावडे याची झाली. ता० ३०-११-४२ पर्यंत सरकारी साक्षीदाराच्या जबान्या, तपासणी व उलट तपासणी चालली. डेप्युटी कमिशनर मेंट्रम हा शेवटचा साक्षीदार होता. सरकारी साक्षीदाराच्या जबान्यांनी या खटल्याच्या कागदपत्रात एकूण १६० टाईप केलेले फुलस्केप कागद व्यापलेले आहेत.

ता० १०-११-४२ पासून आरोपींची जबानी व तपासणी सुरु झाली व ती ता० २-१२-४२ पर्यंत चालली या जबान्यांनी १४३ टाईप केलेले फुलस्केप कागद व्यापले आहेत यानतर सर्व आरोप कायम करुन, निरनिराळीं आरोपपत्रें ( Charge Sheets ) तयार केलीं. आरोप कायम करण्यांत आल्यावर, त्यावर आरोपींचें काय म्हणणें आहे तें विचारण्यांत आलें. सर्व आरोपींनी वकीलामार्फत पुढीलप्रमाणे आपलें म्हणणें लिहून दिलें—"हा खटला असत्यावर उभारण्यात आला आहे सामुदायिक दंड वसूल करण्याचा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने जो बेकायदा प्रयत्न केला व जो अंदाधुद ( indiscriminate ) गोळीबार केला, तो लपविण्यासाठी हा खटला सुरु करण्यांत आला आहे. आरोपी निरपराध आहे."

साक्षी पुराव्यात जी एक गोष्ट विशेष महत्त्वाची ठरली, ती म्हणजे १८ ऑगस्टचें हत्याकांड झाल्यानंतर डे० क० मि० मेरड्म याने वर्तमान पत्राच्या वातमीदारांना दिलेली एक मुलाखत ६ सप्टेंबर १९४२ च्या 'हितवाद' मध्ये प्रसिद्ध झालेली असून, तिचें मथळ्यासह भाषांतर खाली देण्यात येत आहे —

## उमरावती जिल्ह्यांतील दंगे
## भडकलेल्या जमावावर गोळीबार
## 'केवळ आत्मसंरक्षणार्थ गोळ्या झाडल्या'

( आमच्या वातमीदाराकडून ) अमरावती, सप्टेंबर ५

अमरावती येथील डि० मॅजिस्ट्रेट यानी पुढील पत्रक काढून उमरावती तालुक्यातील यावली येथे घडलेल्या हकीकतींचा तपशील दिला आहे —

" ता० १५ ऑगस्ट रोजीं उमरावती तालुक्यातील यावली नावाच्या खेड्यातील सुमारें २५०० रहिवाशांच्या जमावाने माहुली येथील ठाण्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला परंतु स इन्स्पेक्टरने गोळीबाराचें भय दाखवितांच जमावाची पांगापांग झाली स इन्स्पेक्टरला ५ इसमाना कैदहि करता आलें. डि० मॅजिस्ट्रेट व डि एस पा मोर्शीस जाण्याच्या वाटेवर माहुलीस पोंहच-ण्याच्या पूर्वी थोडा वेळ आधी जमावाची पांगापांग झाली होती त्यावेळीं जी चौकशी करण्यात आली, तीवरून असें दिसून आलें की, माहुली पोलीस स्टेशन आणि यावलीकडे जाणारा रस्ता याच्या दरम्यान सुमारें २ मैल विभागांतील तारेचे खांब जमिनीपासून ५ फूट अंतरावर तोडून टाकण्यात आले होते ता १६ ऑगस्ट रोजीं माहुली येथील रेव्हेन्यू इन्स्पेक्टर आपल्याबरोबर सशस्त्र पोलीस कॉन्स्टेबलचें एक छोटेसें पथक घेऊन गेला असतांना यावली येथील रेहवाशानी जमाव करून त्याला गावांत प्रवेश करण्यास प्रतिबंध केला रे इ ला आदल्या दिवशीं यावली येथे झालेल्या नासधुशीची चौकशी करण्यास पाठविण्यात आलें होतें.

ता० १८ ऑगस्टला दुपारच्या सुमारास पोलीस व मॅजिस्ट्रेट लोकांची एक छोटीशी तुकडी डि० मॅजिस्ट्रेट व डी एस् पी. याच्यासह यावलीस जाण्यास निघाली त्याचा हेतु खेड्यातले लोक व मुलकी अधिकारी याच्या दरम्यान चागले संबध पुन्हा प्रस्थापित करावे हा होता कोणत्याहि तऱ्हेची बळजबरी करणें, हा उद्देशच नसल्यामुळे या तुकडीने आपल्यावरोबर फक्त दोन रायफली घेतल्या होत्या या शिवाय पोलीस सार्जंटच्याजवळ पाच गोळ्या असलेलें एक रिव्हाल्वरहि होतें गावात गेल्यावर या तुकडीला असें दिसून आलें की, गावातील रस्ते ओसाड आहेत आणि घराचे दरवाजे व खिडक्या बद आहेत तथापि पाटलाच्या घराजवळ लाठीबद लोकाचा एक लहानसा जमाव दिसू लागला पण पोलीस पार्टी दृष्टिपथात आल्याबरोबर तो पळून जाऊ लागला म्हणून एक हलकासा लाठीहल्ला करून या आक्रमणशाली जमावाची पागापाग करण्यात यावी असें ठरविण्यात आलें. एका अरुद बोळात व एका उघड्या चौकात हा लाठीहल्ला करण्यात आला या चौकांत लाठ्या, कुऱ्हाडी व इतर भयानक शस्त्रें हातीं घेऊन एका मोठ्या जमावाने पोलीस पार्टीला वेढा दिला आणि त्यातील एकेका माणसावर जबरदस्त हल्ला केला. शिवाय दगडफेकहि करण्यात आली काही दगड बऱ्याच मोठ्या आकाराचे होते या हल्ल्यात लहानशा पोलीस पार्टीतील एकेका माणसाला अतिशय मोठ्या सख्येच्या जमावाशीं तोंड द्यावें लागलें त्यात डि० मॅजिस्ट्रेट, डि० एस् पी व इतरहि सिलेक्ट लोकाना मार लागला पोलीसपार्टी जेव्हा पुन्हा त्या अरुंद गल्लीत जमा झाली, तेव्हा लोकाना असा इशारा देण्यात आला का, ते जर निघून जाणार नाहीत तर पोलिसाना गोळ्या झाडाव्या लागतील जमावाने निघून जाण्याचें नाकारलें आणि पोलिस पार्टीवर दगडफेक चालूच ठेवली गोळीबार करण्यात आला आणि पोलीस पार्टीने मागे फिरून पाटलाच्या घरासमोरील उंचवट्याचा आश्रय घेतला जमावातील ज्या एकदुकट व्यक्ती पुढे आल्या होत्या त्याना जमावाला शांत करण्याविषयीं सागण्यात आलें. परंतु चढाईच्या मनोवृत्तींत असलेल्या जमावासमोर त्याचें काहीच चाललें नाही अधिक रक्तपात टाळावा म्हणून पोलीसपार्टी पाटलाच्या घरांत शिरली आणि तिथे तिने गाव सोडून जाण्याचा निर्णय घेतला गावाच्या बाहेर असलेली दलदलीची जमीन

ओलांडून पोलीसपार्टी जात असताना गावातील जमावाने त्यांच्यावर पुन्हा एक हल्ला करण्याची तयारी केली व दगडांचा मारा केला जमावातील एक दोन व्यक्तींना वेगळें काढून त्यांनी इतरांच्या ठिकाणीं योग्य मनोवृत्ति निर्माण करावा, असा पुन्हा प्रयत्न करण्यात आला पण हे लोक दलदलीची जागा ओलांडून जात नाहीत, तोंच शेंकडों लोकांचा जमाव त्यांच्या पाठीवर आला त्यांच्यापुढे त्यांचा एक धर्मवेडा ( Fanatical ) पुढारीहि होता त्याच्या हातात दोन तरवारीहि दिसत होत्या पुन्हा गोळीबार करण्यात आला व शक्यतों रक्तपात टाळावा हा आपला हेतु स्पष्ट करण्यासाठी पोलीस आणखी दूर गेले

जमाव अंगावर चालून येत होता, पण जेव्हा गोळीबाराने आणखी काही लोक पडले, तेव्हा मात्र तो पुढे येण्यास अनमान करूं लागला पाठलाग करण्याची संधि जमावाला देण्यात यावी म्हणून पोलीस आणखी दूर गेले यावेळीं पहिल्यांदाच त्यांचा पुढारी पुढे आला पोलीस सार्जंटने एक रायफल घेऊन त्याला जागच्या जागींच पाडलें आणखी पुढे येण्याचा त्यांना किंचित् प्रयत्न केला पण आणखी एक इसम गोळी लागून पडताच हा धावता जमावाचें चाल करून येण्याचे आणखी चिन्ह दिसेना म्हणून येथेच ही चकमक संपली केवळ आत्मरक्षणाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कारणासाठी एक देखील गोळी झाडण्यात आली नाहीं पोलीस पार्टीच्याजवळ जो कांही मर्यादित दारूगोळा होता तो बहुतेक सर्व या चकमकीच्या शेवटीं खलास झालेला होता शेवटीं तपास करता असें आढळून आलें की, या चकमकींत चार इसम मेले व अकरा जखमी झाले जखमी लोकांपैकी आणखी एक जण दुर्दैवाने हॉस्पिटलमध्ये नंतर मेला पोलीस व मॅजिस्ट्रेट पार्टीच्या प्राय सर्वच लोकांना जखमा झाल्या व त्यातील कांही गंभीर स्वरूपाच्या आहेत "

उक्त तपासणीमध्ये सदहु पत्रकाविषयीं मि० नेडूम यांनी पुढील उद्गार काढले— "उमरावती यथील पत्रकाराच्या विनंतीवरून लोकांच्या माहितीसाठी मी जें एक पत्रक काढलें होतें तें अधिकारी

नव्हे, असें मीं त्यावेळीं स्पष्ट केलें होतें. कारण यावली प्रकरणात ज्या अधिकाऱ्याचा संबंध आला त्याच्याकडील वृत्तांताच्या आधारावर हें वृत्तपत्रीय पत्रक काढण्यात आलें नव्हतें. सप्टेंबरच्या प्रारंभाच्या सुमारास हें पत्रक काढण्यात आलें होतें. अधिकृत सरकारी पत्रकाचें स्वरूप त्याला येऊं नये या खास शर्तीवरच हें पत्रक प्रसिद्ध करण्याची परवानगी पत्रकाराना देण्यात आली होती " हें पत्रक व मेल्डूम याची जबानी याच्या विसंगतीवर उलट तपासणीमध्ये वकिलानी खासा प्रकाश पाडला. आपल्या हातून घडलेल्या गोळीबाराच्या अपराधावर पांघरूण घालण्यासाठी व लवकरच न्यायाधीन होणाऱ्या या खटल्यात आरोपींच्याविरुद्ध लोकमत कलुषित करण्यासाठी बुद्धिपुरस्सर वरील वर्तमान प्रकाशित करण्याची काळजी मेल्डूम महाशय यानी घेतली होती हें उघड आहे. या पत्रकात त्यानी सांगितलेल्या माहितीशीं त्यानी आपल्या जबानींत प्रगट झालेली माहिती पूर्णपणें विसगत होती आणि या विसंगतीवर पांघरूण घालण्याचा हास्यास्पद प्रयत्न करताना त्याची कोर्टांत चांगलीच फे फे उडाली आपलें हें वार्ताहराना दिलेलें पत्रक अधिकृत सरकारी पत्रक नव्हतें, असें मागाहून कोर्टांत म्हणणाऱ्या या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने तें प्रसिद्ध करताना, हितवादने प्रारंभींच " The District Magistrate Amraoti has issued the following communique giving details of the Yawali incident in Amraoti Taluq " हा जो मजकूर छापला होता त्याचा वेळींच प्रतिवाद करण्याची कोणतीहि काळजी घेतली नव्हती हेंहि ध्यानात ठेवण्यासारखें आहे.

आरोपींच्यातर्फे अमरावती येथील तरुण कॉंग्रेसवादी वकील श्री० ॲडव्होकेट ना० म्य० पाडे व श्री० राजाभाऊ गोखले यानी मोठ्या धडाडीने बचावाचें काम केलें व त्याना ॲड० वि० दा० ब्रम्ह यानी साह्य केलें. ज्या दिशेने त्यानी बचावाची रूपरेषा आखली, ती किती योग्य होती, हें पुढे हायकोर्टाने दिलेल्या निकालावरून स्पष्ट झालें. वकील देण्याच्या बाबतींत आणखी एक महत्त्वाची घटना घडली तिचाहि निर्देश येथे करणें अवश्य आहे. फकीर अकबरशा वगैरे जे पाचगव्हा मुसलमान

लीनगे मुसलमान वकील देण्याचा घाट घातला; पण अकबरशा प्रभृति मुस्लीम आरोपींनी—' आम्हाला वेगळा मुसलमान वकील नको जे सर्वांचे वकील तेच आमचे वकील. त्याच्यावर आमचा विश्वास आहे.'—असें म्हणून हा घाट हाणून पाडला.

बचावाची रूपरेषा पुढील प्रमाणे होती. डि० मॅजिस्ट्रेट मेल्ड्रम याने ता० १६-२-४२ ला यावलीवर बसविलेला २००० रु० सामुदायिक दंड बेकायदा होता. असा दंड बसविण्याचा हुकूम त्यास प्रातिक सरकारकडून त्यावेळीं मिळालेला नव्हता. अशा बेकायदा दंडाच्या वसुलीसाठी ता० १६ ऑगस्ट रोजीं गेलेल्या रेव्हेन्यू इन्स्पेक्टर इ० लोकांच्या पार्टीला दंड वसुलीच्या कामांत प्रतिबंध करणें हें न्याय्य होतें व यावलीच्या लोकानी आपलें हें न्याय्य कर्तव्य बजावलें; याबद्दल त्यांस दोष देता येणार नाही. हाच बेकायदा दंड वसूल करण्यासाठी १८ ऑगस्टला मेल्ड्रमप्रभृति सरकारी पार्टी गेलेली होती. सार्जंट क्वीन वगैरे सरकारी साक्षीदारांच्या जबानींतूनच ही गोष्ट सिद्ध झालेली आहे. तेव्हा, बेकायदा दंड वसुलीसाठी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच.काय, पण केवढाहि मोठा सरकारी अधिकारी गेला तरी त्याचें तें कृत्य कायद्यांच्या भाषेंत निव्वळ दरवडा ठरतें; आणि असल्या दरवड्याचा प्रतिकार करणें, हें जनतेचें कर्तव्यच आहे; व तेंच आरोपींनी बजावलें असल्यामुळे ते दोषी ठरूं शकत नाहीत. शिवाय गांधी चौकात जमलेला जमाव बेकायदा आहे असेंहि डि० मॅजिस्ट्रेटने घोषित केलें नव्हतें. उलट तसें घोषित न करतांच त्याने जमलेल्या लोकावर लाठी हल्ला व गोळीबार केला. म्हणून केवळ आत्मसंरक्षणासाठी लोकांनी उलट हल्ला केला व त्यासाठी मिळतील तीं साधनें त्यांनी वापरलीं. याशिवाय पोलीस पार्टीने गावकऱ्याची एक मोठी चोरी केली. डी० एस० पी० ने गावातील राष्ट्रीय झेंडा चोरला. राष्ट्रीय झेंडा हा केव्हांहि बेकायदा ठरविण्यात आलेला नव्हता. झेंडा ही गावकऱ्यांची मालमत्ता होती, आणि ती चोरून नेण्याचा सरकारी अधिकाऱ्यांना कोणताहि हक्क नव्हता. म्हणून झेंड्यासारख्या सार्वजनिक संपत्तीवर जेव्हा अधिकाऱ्यांनी धाड घातली तेव्हा तिच्या बचावासाठी लोकांनाहि लढावें लागलें. या सर्व प्रकरणांत डि० मॅजिस्ट्रेट

व डी० एस० पी० च्या दर्जाचे मोठे अधिकारी इतक्या मनमान्या पद्धतीने,-दंडेलीने व बेकायदा रीतीने वागले की, लोकांनी त्याचा प्रतिकार करावा हें तर स्वाभाविकच होतें ! पण न्याय व कायदा याची चाड असणाऱ्या सरकारने या अधिकाऱ्यावरच चोरी, दरवडे खोरी, बेकायदा वागणूक, बेकायदा गोळीबार व खून असले आरोप ठेवून खटले भरायला पाहिजेत ! वगैरे प्रश्नें आरोपींची बाजू अतिशय धडाडीने, अधिकाऱ्याची भीडमुर्वत न ठेवता व कोणत्याहि स्वार्थाची अपेक्षा न बाळगता अमरावतीच्या तरुण वकिलांनी मांडली हें त्यास खरोखर भूषणावह आहे १९४२ च्या क्रांतीचाच लढा आपण न्यायालयातून लढत आहोत, हा भाव त्यांनी बऱ्याच प्रमाणात जागृत ठेवला

पण स्पेशल जजाचें कोर्ट म्हणजे कांही हायकोर्ट नव्हे १९४२ सालीं जारी करण्यात आलेल्या काळ्या कायद्याचे अनिर्बंध अधिकार हातीं घेऊन जेथे नोकरशाही खुद्द हायकोर्टाच्या मूलभूत अधिकारावर देखील आक्रमण करण्यास कमी करीत नव्हती, तेथे ल्हान सहान जजानी नोकरशाहीच्या बोटावर नाचावें आणि सर्व सद्सद्विवेक बुद्धि गुंडाळून ठेवून आपले न्यायनिवाडे करावेत हें क्रमप्राप्तच नव्हतें काय ?

यावली खटल्यातले स्पेशल जज्ज मि० दडे यानी ता २२-१२-१९४? रोजीं आपला निर्णय दिला हें निकालपत्रक एकूण ६२ पृष्ठांचें असून ९८ परिच्छेदात तें विभक्त आहे त्यांनी सर्वच आरोपींना दोषी ठरवून दोन वर्षांपासून सात वर्षांपर्यंत सक्त मजुरीच्या शिक्षा ठोठावल्या साहेबादि मंडळी आपल्या जबान्यात फरु शकले नाहीत इतकें त्याच्या बेकायदा कृत्यांचें समर्थन करण्याचा प्रयत्न आपल्या ६२ पृष्ठात्मक निकालपत्रात स्पेशल जजाने केला व आपण मि० सरकारचें मीठ खातों आहोंत हें सिद्ध करुन दाखविलें

' आरोपीने दिलेलें स्पष्टीकरण खोटें आहे, ' ' आरोपीचा खुलासा खरा नाही, ' आरोपी हा बेकायदा जमावात सामील होता ' असे उद्गार त्यानी प्रत्येक आरोपीच्याबाबत आपल्या निकालपत्रांत काढले आहेत सरकारी साक्षीदाराच्या जबान्यातून पोलीसानीच पहिला लाठीहल्ला व गोळीबार केला,

ही गोष्ट सिद्ध झालेली असताना आणि गांधी चौकातील जमाव बेकायदा आहे असें कोण्याहि मॅजिस्ट्रेटने घोषित केलें नसल्याचीहि कबूली सरकारी साक्षीदारांनीच दिलेली असताना, विद्वान स्पेशल जज्जसाहेब आपल्या न्यायपत्रकात लिहितात— "डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व त्याची तुकडी याच्यावर जमावाने हल्ला केला या घटनेबद्दल वाद असू शकत नाही आणि आरोपींच्या विद्वान वकिलानाहि मोठ्या समजसपणें ( rightly ) या घटनेबद्दल वाद घातला नाही. तेव्हा ज्या समान हेतूसाठीं लोक गांधी चौकात जमा झाले होते तो जरीहि असला, तरी ज्याक्षणीं त्यानी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व त्याची तुकडी याच्यावर हल्ला केला, त्याक्षणींच तो जमाव बेकायदा ठरला कागदोपत्रीं उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून हें निःसंदेह दिसून येतें की, अरुंद गल्लींत माघार घेतल्यावर डि० मॅजिस्ट्रेट व त्याचें पथक यांची वागणूक ही शेवटपर्यंत सरक्षणात्मक स्वरूपाचीच होती "

स्पेशल जज्जांची ही तर्कप्रणाली मोठीच वाखाणण्यासारखी आहे, यांत शंका नाही ! डि०मॅजिस्ट्रेट व त्याची तुकडी याच्यावर जमावाने हल्ला केला, या घटनेबद्दल वाद असू शकत नाही,— हे उद्गार काढताना, त्याच्याहि आधी डि० मॅजिस्ट्रेट व त्याची तुकडी यानी जमावावर बेकायदा हल्ला केला होता, ही गोष्ट स्पेशल जज्जसाहेब सोयीस्कर रीतीने विसरले ' ज्या क्षणीं त्यानी ( जमावाने ) डि० मॅजि० व त्याची तुकडी याच्यावर हल्ला केला त्याक्षणींच तो जमाव बेकायदा ठरला '— हें तर्कट लढविताना, जमावाने हल्ला का व कोणत्या परिस्थितींत केला ? हेंहि ध्यानांत घेण्याची गरज जज्ज साहेबास भासली नाही ' डि० मॅजि० व त्याचें पथक यांची वागणूक ही शेवटपर्यंत सरक्षणात्मक होती. '— हें लिहिताना हाच सरक्षणाचा अधिकार कायद्याने लोकानाहि दिलेला होता व तोच ते बजावीत होते, या महत्त्वाच्या मुद्याकडे लक्ष देण्याचीहि जरूरी त्याना वाटली नाही.

एवढ्यानेच या प्रदीर्घ न्यायपत्रकातील विद्वत्ता सरली नाही ! साहेब आणि मंडळीचा बचाव करण्यासाठी आपण मनापासून आहोंत हें दाखविण्याची आवश्यकताहि त्याना वाटू लागली म्हणून साहेब आणि मंडळी यांनी

गाधीचौकात लोकावर हल्ला चढविण्यापूर्वी, लोक जे तेथे जमले होते तेच मुळी साहेब आणि मंडळीस मारण्याच्या उद्देशाने होय! असेंहि तर्कट काढून लोकाच्या मनात काय होतें हें आपणास बरोबर समजलें असें दाखविण्याचा त्यानी प्रयत्न केला कसा तो पहा! निकालपत्रांत स्पेशल जज साहेब म्हणतात—"गोळीबारामुळे झालेली प्रतिक्रिया योग्य रीतीने जमेला धरली," तरी एकंदरीत जमावाची जी वागणूक होती तिच्यावरून असें अनुमान निघू शकतें की, लोक जशा रीतीनें वागले तशा रीतीनें वागण्यातला त्याचा हेतु समयस्फूर्त नसून, गाधी चौकात जमा होण्याच्या आधीच तो निश्चित झालेला होता"

हिंदी लोकाना फासावर चढविण्यासाठी व ब्रि० सरकारचें संरक्षण करण्यासाठी हिंदी लोकच तयार झाल्यानंतर १९४२ च्या प्रचंड आंदोलनातूनहि ब्रि० साम्राज्य येथे सुरक्षित राहिलें, यात काहींच आश्चर्य नाही-"**विनाशमभिकांक्षन्ति जातीनां जातयस्तथा**" हें स्मृतिकाराचें वचन किती यथार्थ आहे याची वरील निकालपत्रक पाहिलें व पाटील आनंद आबाजीसारख्याच्या काळ्या व खुनशी कारवाया ध्यानात घेतल्या म्हणजे खात्री पटू लागते

डि० मॅजि० व त्याची तुकडी पळून जात असताना आपला राष्ट्रध्वज चोरून नेत आहेत व ही चोरी त्याना पचू देता कामा नये, राष्ट्रध्वजाची सुटका करण्यासाठी त्याचा पाठलाग केलाच पाहिजे, हा लोकाचा उदात्त हेतु ध्यानात येण्यासाठी राष्ट्रीय आकाक्षाशीं समरस व्हावें लागतें, आणि तो ध्यानात आलाहि तरी बोलून दाखविण्यासाठी न्यायाचा काटा निर्भीडपणे हातीं लागतो, व वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या रागालोभाविषयीं निरपेक्ष रहावें लागतें!! म्हणूनच गाधीजींनी आपल्या ता० ८ ऑगस्टच्या सस्मरणीय भाषणात 'कायद्याचा अन्याय्य अर्थ करू नका!' असा इषारा हिंदुस्थानातील न्यायाधीशाना दिलेला होता, पण वरिष्ठ अधिकाऱ्याच्या मुखाकडे पाहून न्यायनिवाडे करण्याची आजवर सवय झालेल्या छोट्या छोट्या न्यायाधीशाच्या गळीं गाधीजींचा हा कडू

घोट कसा उतरावा ? तो पचवून त्याप्रमाणे वागण्यासाठी हायकोर्टाच्या न्यायाधीशानाच पुढे यावें लागलें आणि अखेरीस त्यानींच वरील सारऱ्या तोंडपुज्या निकालपत्रकावर जोराचे कोरडे उडविले

गांधी चौकातील जमाव कोणत्या उद्देशाने जमा झाला होता याविषयीं केवळ सूचक उद्गार काढूनच विद्वान स्पेशल जज्ज साहेब थांबले नाहीत, तर त्याच्याहि पुढे जाऊन आपल्या प्रदीर्घ निकालपत्रकाच्या २१ व्या परिच्छेदात ते लिहितात— "म्हणून माझा निर्णय असा आहे की, 'बेकायदा जमाव जमलेला होता, डि० मॅजि० व त्याचें पथक याच्यावर हल्ला करण्याचा सर्वांचा समान उद्देश होता, आणि अशा या बेकायदा जमावातील लोकांनी आपला उद्देश तडीस नेण्यासाठी डि० मॅजि० व त्याची तुकडी यांच्यावर हल्ला चढविला " असें ठासून म्हटल्याशिवाय पुढील जबरदस्त शिक्षा देण्याची भूमिका कशी तयार झाली असती ! पण पुढे हायकोर्टाच्या निर्णयात स्पेशल जज्ज साहेबांचें हे सारें तर्कट त्याच्यावरच उलटलें व ज्या घटनावरुन त्यानी जनतेच्याविरुद्ध कायद्याचा अर्थ लावला, त्याच घटनामुळे कायदा सरकारी अधिकाऱ्याच्याविरुद्ध कसा जातो हें हायकोर्टाने दाखवून दिलें

यावलीच्या खटल्यातल्या आणखी दोन तीन महत्त्वाच्या गोष्टी विशेष ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत. पहिली गोष्ट म्हणजे आरोपींच्या तर्फे साक्षीदार देण्यात आले नाहीत ही होय दुसरी गोष्ट म्हणजे हा खटला चालू असतानाच Enhancement of Punishment Ordinance नावाचा जो काळा कायदा जारी करण्यात आला त्याचाहि फायदा घेण्याचा सरकारतर्फे प्रयत्न करण्यात आला, पण तो फसला; आणि तिसरी गोष्ट म्हणजे खटला चालू असताना कोर्टाची बेअदबी होईल असें वर्तन प्रांताच्या गव्हर्नराने व डेप्युटी कमिशनर मेंडूस यानी केलें पण त्याची दाद घेण्याची हिंमत स्पेशल जज्ज मि० दवे यांस झाली नाही, ही होय या प्रत्येक गोष्टी बाबत थोडासा खुलासा अवश्य आहे

आरोपींच्यातर्फे आपण साक्षीपुरावे दाखल करत नाही, आरोपींच्या वकिलानी एक अर्ज कोर्टात दाखल केला. त्यांत असें

पुढील तीन कारणामुळे आरोपींना बचावाचे साक्षीदार मिळणें असंभवनीय झालें आहे (१) ता० १९-८-४२ रोजीं लष्कराने यावलींत जाऊन जो धुमाकूळ घातला, त्यामुळे तेथील लोकांत इतकी दहशत निर्माण झाली आहे कीं, त्याच्यातून आरोपींच्यातर्फे साक्ष देण्यासाठी पुढे येण्याचीहि लोकांना भीति वाटू लागली आहे (२) या खटल्याची कच्ची चौकशी चालू असतानाच डि० मॅजि० मेल्ड्रम यानी ता० ५-९-४२ ला वार्ताहराना जें वक्तव्य दिलें (हें वक्तव्य मागे उधृत केलेंच आहे) त्यामुळे गावकऱ्यानीच सरकारी अधिकाऱ्यावर हल्ला केला असा भ्रम निर्माण झाला आहे त्याचा परिणाम आधीच लोकमत कलुषित होण्यावर झाला आहे. कच्च्या चौकशीवरहि त्याचा परिणाम झाल्यावाचून राहिला नाही या खटल्यात सरकार तर्फे जी चालान भरण्यात आली ती वस्तुत डि० मॅजि० मेल्ड्रमच्या वरील वक्तव्याची ( Press Communique ) च नक्कल आहे तसेंच (३) हा खटला चालू असतानाच प्रांताच्या गव्हर्नराने मुद्दाम माहोलीस जाऊन यावलीचा पाटील आनद आकाजी यास एक तरवार बक्षीस दिली ही तरवार सार्वजनिक समारंभ करुन देण्यात आली, आणि ती घेणारा इसम आनद आकाजी पाटील हा खटल्यातला एक प्रमुख साक्षीदार आहे. तरवार बक्षीस देत असताना गव्हर्नरने असे उद्गार काढले कीं, **'गांवकरी गुंडांपासून सरकारी अधिकाऱ्यांचे प्राण वाचविण्यावद्दल ही तरवार आनंद आकाजी पाटील यास बक्षीस देण्यांत आली आहे.'**

वस्तुत गव्हर्नरसारख्या प्रांताच्या अत्युच्च अधिकाऱ्याने खटला चालू असताना एका महत्वाच्या साक्षीदाराला समारंभपूर्वक तरवार बक्षीस देऊन व वरीलप्रमाणे उद्गार काढून न्यायाधिशांवर अप्रत्यक्ष का होईना पण अन्याय्य दडपण आणलें यात शंका नाही. प्रांताच्या गव्हर्नराचे न्यायाधीन असलेल्या आरोपींबावत वरील सारखे उद्गार जाहीरपणें ऐकल्यानंतर त्याच्या विरुद्ध जाणारे न्यायाधीश त्या काळात तरी आढळणें विरळाच! गव्हर्नराचे वरील उद्गार हें न्यायाधीशावर अन्याय्य दडपण तर होतेंच, सरकारी अधिकाऱ्यावर प्राणघातक हल्ला करणाऱ्या गावकरी गुंडाना कडक शासन झालें पाहिजे, असा इषाराहि त्या उद्गारात गर्भित होताच. शिवाय

कोर्टासमोर असलेल्या खटल्यात ती ढवळाढवळहि होती, आणि अशी ढवळा-ढवळ करणें ही कोर्टाची बेइज्जत झाली होती

डि० मॅजि० मेल्ड्रम याने वार्ताहराला दिलेलें पत्रक हें मुद्दा एकप्रकारें कोर्टाला बेअदबीकारकच होतें पण अधिकाराची गुर्मी चढलेला तो मदांध जिल्हाधिकारी एवढ्यावरच थांबला नाही भर कोर्टात, कोर्टाच्यासमोर तो आरोपींच्या वकीलाना वाटेल तसें बोलला 'मला इतर कामें आहेत तुमच्या प्रश्नांची उत्तरें देण्यास मी बांधला नाहीं मला वेळ नाहीं तुम्ही मला काय समजलात'— इ० अनेक प्रकारचीं दुरुत्तरें त्याने वकिलाना केलीं व तीं सर्व स्पेशल जज्ज साहेबानी मुकाट्याने ऐकून घेतलीं इतकेंच नव्हे तर त्याचीं जबानी आटोपली तेव्हा मोठ्या समाधानाचा सुस्कारा टाकून 'सुटलों बुवा एकदाचे' असे उद्गार काढल्याचेंहि ऐकिवात आहे न्यायाचा तराजू समतोल-पणें हातीं ठेवणाऱ्या न्यायाधीशाचें, गव्हर्नर व मेल्ड्रम या दोघावरहि कोर्टाच्या बेअदबीचा दावा करणें हें कर्तव्य होतें न्यायालयाच्या इज्जतीचा पडलेला हा खून न्यायाधीशानी उघड्या डोळ्यानी पाहिला पण न्यायदेवतेच्या अधिकाराचें संरक्षण करण्याची हिंमत त्यास झाली नाही वरील सारखे उद्गार काढणारा बिचारा न्यायाधीश ही हिंमत कोठून आणणार !

वीर पंजाबराव हे या आंदोलनातील यावलीचे मुख्य पुढारी असल्याने त्याच्यावर व त्याचे बंधू विश्वासराव याच्यावर नोकरशाहीचा विशेष दात होता हें पूर्वी अनेक वेळा सांगितलेंच आहे पंजाबराव १५ आगस्टलाच पकडल्या गेल्यामुळे त्यास तुरुंगाची शिक्षा देण्यापलीकडे काही करता येण्या-सारखें नव्हतें पण विश्वासरावावर प्रत्यक्ष खून करण्याच्या प्रयत्नात असल्याचा आरोप ठेवून, त्याला फाशी किंवा काळेंपाणी या सारख्या शिक्षेस पात्र करणें शक्य आहे, असें नोकरशाहीला वाटलें म्हणून बाबूशेठ मारवाड्याच्या कोठ्यापलीकडील शेतात पाठलाग करीत येणाऱ्या लोकात विश्वासराव होता व राजाराम औरंगपुरेप्रमाणेच त्याच्याहि हातीं तरवार होती, असें आनंद आकाजी पाटील व गोविंदराव काबळे सब

इन्स्पेक्टर याच्या मुखातून साक्षीच्या वेळीं वदविण्यात आलें. हेतु हा की, शिक्षा वाढविण्याचा जो काळा कायदा "Enhancement of Punishment ordinance" नुक्ताच जारी करण्यात आला होता त्याचा आधार घेऊन विश्वासरावला जबरदस्त शिक्षा ठोठावण्यास मिळावें पण सार्जंट क्वीनच्या व नायब तहसीलदार अनीस महमद याच्या साक्षीनेच ही गोष्ट खोटी ठरली. सार्जंट क्वीनने सांगितलें की, जे दोघेजण शस्त्र घेऊन मेल्ट्रमवर चालून आले त्या दोघानाहि मीं गोळ्या मारल्या व ते दोघेहि गोळ्या घालून पडले विश्वासराव यास गोळी लागलेली नसल्याने तो त्या दोघात नव्हता, हें उघडच सिद्ध झालें ना० त० अनीस अहमदने आपण विश्वासरावला तेथें पाहिलें नाही असें स्पष्टच सांगितलें त्यामुळे हा सर्व व्यूह वारगळला व विश्वासरावावरील आपत्ति टाळली पण त्यामुळे नोकरशाहीच्या कृष्णकृत्याचें आणि आनद आप्पाजी पाटील व गोविंदराव स० इ० याच्या बेईमानीचें स्वरूप कमी होऊ शकत नाही

विश्वासरावावरील या आरोपाचा खोटेपणा स्पेशल जज्जालासुद्धा जाणविल्याशिवाय राहिला नाही पण पुरावेदाराचा खोटेपणा प्रत्ययाला आल्यानतरहि त्याच्याकडे सशयित दृष्टीने पाहण्याऐवजी तो त्याच्या कृत्यावर पांघरूण घालण्यास प्रवृत्त झाला, हें विशेष होय या पुराव्याच्या खोटेपणावर आपल्या न्यायपत्रातील ७९ व्या परिच्छेदात यानी पुढीलप्रमाणे उद्गार काढले —

"विश्वासरावने दगलींत भाग घेतला होता या मुद्याबाबत माझें असें स्पष्ट मत आहे की, गाधाचौकातल्या व नंतरच्या अशा दोन्ही दगलींत त्याने भाग घेतला होता त्याने हातात तरवार घेतली होती याविषयी जो पुरावा पुढे आला आहे तो मात्र तितकासा खात्री पटण्यालायक नाही गोविंदराव स० इ० व सार्जंट क्वीन याना, जमावाच्या आघाडीवर हातात तरवार घेतलेलीं किती माणसें होतीं, हें निश्चित सागता आलें नाहीं आनंदराव जें म्हणतो की, रामाराम औरंगपुरे व विश्वासराव या दोघाच्याहि हातात तरवारी

होता आणि सौंदडच्या झाडाजवळ ते दोघेहि आघाडीवर होते, तें त्याचें म्हणणें अनिरुद्ध अहंमदच्या पुराव्याशीं विसंगत आहे. म्हणून विश्वासराव याच्या हातांत तरवार होती याविषयींचा पुरावा माझ्या मतें खात्री पटविणारा नाही. " विश्वासराव याला जाळ्यांत पकडण्याचें कारस्थान अशा रीतीने बारगळलें.

अस्तु. कोर्टांतील लढाईची एक अवस्था संपली. खालच्या कोर्टाचा निकाल वाचून यावलीचे शूर लढवय्ये व त्यांचे बहादूर वकील यांनी हिंमत सोडली नाही. या खटल्यांतील निर्णयाची फेरतपासणी (*Review*) करण्यात यावी असा अर्ज हायकोर्टाकडे करण्याचें त्यांनी ठरविलें व त्याप्रमाणे त्यांनी अर्ज दाखलहि केला. दरम्यान राष्ट्रीय स्वरुपाच्या अशा कायदेविषयक ज्या घटना घडल्या त्यांचा व न्यायकोर्टांतील यावलीकरांच्या पुढील भांडणाचा परामर्श आगामी प्रकरणांत घेण्यांत येईल.

---

## प्रकरण ४ थें

# गव्हर्नर जनरलच्या अधिकाराला आव्हान.

स्पेशल जज मि० ददे यानी चालविलेल्या व निकाल दिलेल्या या खटल्याच्या निर्णयाची फेरतपासणी व्हावी म्हणून आरोपीच्या वकीलानी रिव्हयू कोर्टाकडे व पुढे हायकोर्टाकडे जे अर्ज केले त्यात प्रथित झालेले मुद्दे अतिशय महत्त्वाचे असल्याने ते प्रथम देण्यात येत आहेत—

(१) हा सर्वच खटला बेकायदेशीरपणे चालविण्यात आला कारण गव्हर्नर जनरल यानी जो स्पेशल क्रिमिनल कोर्टस् ऑर्डिन्स् नावाचा कायदा जारी केला व ज्याच्या अन्वयें हा खटला चालविण्याचा अधिकार स्पेशल जज्जास देण्यात आला, तो ऑर्डिनस् काढण्याचा अधिकारच गव्हर्नर जनरल यास नव्हता

(२) [अ] बेकायदा रीतीने चालविलेले खटले कायदेशीर ठरविण्यासाठी १९४३ चा १९ नबरचा जो ऑर्डिनस् जारी करण्यात आला तो देखाल नियमबाह्य आहे आणि त्यामुळे खाल या कोर्टात चालतेला हा खटला नियमानुकूल चालू शकत नाही

[ब] या १९ नबरच्या आर्डिनसमुळे बेकायदा रीतीने चाललेल्या खटल्याला कायदेशीर स्वरूप प्राप्त होऊं शकत नाही

( ३ ) यावलीतील जमाव बेकायदा होता असें प्रस्थापित झालेलें नाही

( ४ ) [अ] फिर्यादीचें मत ग्राह्य मानलें तरी, डि० मॅजिस्ट्रेट यानी ता० १८-८-४२ रोजीं यावलीस जी भेट दिली ती सामुदायिक दंड वसूल करण्याचा मार्ग सुकर करावा म्हणूनच दिली, परतु कायद्याप्रमाणे डि० मॅजिस्ट्रेटला अशा प्रकारचा दंड बसविण्याचा अथवा वसूल

करण्याचा कोणताच अधिकार नव्हता. कारण तशा अर्थाचें प्रातिक सरकारचें नोटिफिकेशन निघालेलें नव्हतें म्हणून डि० मॅजिस्ट्रेट व त्याच्या बरोबरची मंडळी याच्यावर हल्ला करण्याचा गावकरी लोकांचा समान उद्देश होता असें मानता येणार नाही

[ ४ ] खटला चालविणाऱ्या कोर्टानें, या गोष्टींचा डि० मॅजिस्ट्रेटने यावलीस दिलेल्या भेटीशीं काही संबंध नव्हता असें म्हणण्यात चूक केली आहे.

( ५ ) आत्मसंरक्षणाच्या कायदेशीर हक्काचा आधार आरोपींना मिळू शकत नाही असें मानण्यातहि खटला चालविणाऱ्या विद्वान न्यायाधीशानी चूक केली आहे.

( ६ ) शिवाय त्यानी फिर्यादीचा पुरावा अविश्वसनीय व बचावाचा पुरावा विश्वसनीय मानावयास पाहिजे होता.

( ७ ) तसेंच, त्याना या खटल्यातील वस्तुस्थितीची व संभाव्य गोष्टींची जाणीव ठेवलेली नाही फिर्यादीच्या पुराव्यातील अतर्गत असभाव्यतेकडे सुद्धा त्यानी लक्ष दिलें नाही

( ८ ) त्यानी चुकीच्या दृष्टिकोनातून या खटल्याकडे पाहिलें व त्यामुळे त्यांच्या हातून योग्य न्याय झाला नाही.

( ९ ) आरोपींनी कोणताहि गुन्हा केला नाही असें समजून त्यानी त्याना दोषमुक्त करावयास हवें होतें

( १० ) खटल्याची एकदर परिस्थिति ध्यानात घेतां आरोपींना फार कडक शिक्षा देण्यांत आल्या आहेत, असें तरी खाउ मानावें लागेल.

सेशन्स जज मि० दंडे यानी दिलेल्या निर्णयाच्या फेरतपासणीसाठी दाखल करण्यात आलेल्या व हायकोर्टापुढे येलेल्या आरोपींच्या अर्जांतील

जे मुद्दे वर दिले आहेत, त्यांतील पहिल्या व दुसऱ्या मुद्याचा देशांत घडलेल्या काही कायदे विषयक घडामोडींशीं संबंध असल्यामुळे त्या संबंधींची थोडी माहिती आधी देणें अवश्य आहे.

मागें सांगण्यात आलेंच आहे की, या काळांत खुद्द हायकोर्टा-च्याहि मूलभूत अधिकारावर आक्रमण करणारे काळे कायदे जारी करण्यात येऊन नोकरशाहीच्या हातीं अमर्याद सत्ता देण्यात आली होती अशा कायद्यांपैकीच स्पेशल क्रिमिनल कोर्टस आर्डिनन्स हा काळा कायदा होता १९४२ चें प्रचंड आंदोलन दडपण्यासाठी सामान्य कोर्टे अपुरीं पडतील असें वाटूनच की काय, स्पेशल कोर्टांची योजना या काळ्या कायद्यान्वयें करण्यात आली होती, आणि आरोपी हजर असोत अथवा नसोत, त्यांचे खटले चालवून त्यांना जबरदस्त शिक्षा देण्याचा अधिकार या नव्या स्पेशल कोर्टांना देण्यात आला होता विशेष मौज ही की, सामान्य कायद्याने स्थापन झालेल्या कोर्टांवरच हायकोर्टांचा अधिकार आहे असें म्हणून या स्पेशल कोर्टांवरील हायकोर्टाचा अधिकारहि उडविण्यात आला होता आणि अनिर्बंध व अमर्याद सत्ता स्पेशल कोर्टांच्या हातीं देण्यात आली होती नागरिक स्वातंत्र्यावर या काळ्या कायद्याने भयंकर घाला घातला होता स्पेशल जज्जाच्या अन्याय्य निर्णयाविरुद्ध जनतेला कोणत्याहि तऱ्हेचें संरक्षण मिळविण्याची सोय या कायद्याने ठेवली नव्हती वस्तुत खटले चालविणारे कोणतेंहि कोर्ट झालें तरी त्यावर हायकोर्टाची सत्ता चालते व खटला चालविणाऱ्या कोर्टाने अन्याय केला आहे असें आरोपीस वाटलें तर त्या विरुद्ध हायकोर्टाकडे दाद मागतां येते, पण प्रस्तुत काळ्या कायद्याने अशी परिस्थिति निर्माण केली की, स्पेशल जज्जाच्या अन्याय्य निर्णयाविरुद्ध कोठे दादच मागता येऊं नये अशा रीतीने हा काळा कायदा म्हणजे नागरिक स्वातंत्र्याला लावण्यात आलेला गळफास तर होताच, पण हिंदुस्थानातील हायकोर्टांनाहि त्याने निर्माल्यवत ठरविलें होतें

हायकोर्टांना अशा रीतीनें निर्माल्यवत् करून टाकणारा काळा कायदा जारी करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलास आहे काय ? असा राष्ट्रीय

स्वरुपाचा कायद्याचा प्रश्न या परिस्थितीमुळे निर्माण झाला होता गव्हर्नर जनरलास जर असा अधिकार असेल, तर सर्व वादच मिटला पण जर त्याला तसा अधिकार नसेल, तर त्याने जारी केलेला हा काळा कायदा नियमबाह्य आहे, अनधिकृत आहे असें ठरणार होतें आणि मूळ काळा कायदाच जर अनधिकृत ठरला, तर त्या कायद्यान्वयें स्थापन झालेली स्पेशल कोर्टे, त्यानी चालविलेले खटले, घेतलेले निर्णय व दिलेल्या शिक्षा हीं सर्वच बेकायदा ठरणार होतीं, आणि यावलीप्रमाणेच जे शेकडों खटले देशभर चालविण्यात आले होते व हजारों लोकाना जबरदस्त शिक्षा ठोठावण्यात आल्या होत्या त्या सर्वच बेकायदा ठरुन आरोपींना बधमुक्त करणें अपरिहार्य होणार होतें इतकेंच नव्हे, तर अशा बेकायदा रीतीने नागरिकाना शिक्षा सुनावणारे न्यायाधिकारी व खटले चालू असताना त्याचा अनन्वित छळ करणारे मुल्की अधिकारी हेच गुन्हेगार ठरुन शिक्षेस पात्र झाले असते.

स्पेशल क्रिमिनल कोर्ट्स् ऑर्डिनन्स अनधिकृत ठरताच या इतक्या सर्व गोष्टी घडणें संभाव्य होणार असल्यामुळे देशातील कायदेपंडितानी, गव्हर्नर जनरलास हा कायदा जारी करण्याचा अधिकारच आहे की नाही, हाच मुद्दा प्रथम घसास लावण्याचें ठरविलें

योगायोग असा की, ही परिस्थिति निर्माण होण्याच्या थोडेच अगोदर ब्रि० सरकारने हायकोर्टापेक्षाहि वरिष्ठ असें फेडरल कोर्ट हिंदुस्थानात स्थापन केलें होतें आणि हायकोर्टाच्या निर्णयाविरुद्ध दाद मागण्याचें एक नवें साधन हिंदी जनतेला उपलब्ध झालें होतें परंतु जनतेऐवजी सरकारनेच या फेडरल कोर्टाचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला गोष्ट अशी घडली की, कलकत्ता हायकोर्टाने सर्वांत प्रथम पुढाकार घेऊन स्पेशल क्रिमिनल कोर्ट्स् ऑर्डिनन्स जारी करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलास नाही, असा एका खटल्यात निकाल दिला या निकालाविरुद्ध प्रांतिक सरकारने फेडरल कोर्टाकडे अपील केलें, आणि तेथें गव्हर्नर जनरलास असलेल्या कायदेशीर अधिकाराचा खामा कीस निघून असा निर्णय लागला की,

वरील कायदा जारी करण्याचा अधिकारच मुळीं गव्हर्नर जनरलास नव्हता व हा कायदा जारी करण्यात त्याने आपल्या अधिकाराचा मर्यादाभंग केला आहे. सर्व देशाचें लक्ष या निर्णयाकडे लागलें होतें. फेडरल कोर्टाने हा राष्ट्रीय महत्त्वाचा निर्णय दिल्यानंतर नोकरशाहीच्या गोटात भयंकर खळबळ उडाली.

फेडरल कोर्टाचा हा अत्यंत महत्त्वाचा व मूलभूत निर्णय मिळाल्यामुळे यापुढे स्पेशल कोर्टांची झोटींगशाही तर बंद झालीच; पण हा निर्णय मिळण्यापूर्वी जीं स्पेशल कोर्टें स्थापन झालीं होतीं आणि त्यांनी जे खटले चालविले होते व ज्या शिक्षा दिल्या होत्या त्या सर्व बेकायदा ठरत असल्यामुळे या हजारो बंदिस्ताना बंधमुक्त करावयाचे की काय ? उलट शिक्षा देणाऱ्या लोकांनी बेकायदा खटले चालविले म्हणून त्यांच्यावरच खटले भरावयाचे की काय ? असा पेंच सरकारसमोर निर्माण झाला. फेडरल कोर्टाने घातलेल्या या कोलदाड्यापासून नोकरशाहीचें संरक्षण करण्यासाठी पुनः गव्हर्नर जनरल धावून आला. त्याने फेडरल कोर्टाचा निर्णय झाला, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं आणखी एक काळा कायदा जारी केला स्पेशल कोर्टांत चाललेले खटले आणि झालेल्या शिक्षा कायदेशीर कोर्टाने दिलेल्या शिक्षेइतक्याच प्रमाणभूत मानण्यात येतील असे या नव्या काळ्या कायद्याने घोषित केले.

परंतु हायकोर्टांचे स्पेशल कोर्टाविरुद्ध दाद घेण्याचे अधिकार कायम ठेवणें या नव्या काळ्या कायद्यालाहि भाग पडलें. हा दुसरा कायदा जारी करून पूर्वी चाललेल्या खटल्यांना व झालेल्या शिक्षांना जरी कायदेशीर स्वरुप देण्याचा प्रयत्न करण्यात आला, तरी न्यायसत्तेचा नोकरशाहीवरील एक दणदणीत विजय त्यातहि मान्य करावाच लागला आणि हायकोर्टांचे दरवाजे स्पेशल कोर्टांविरुद्ध लोकांना खुले ठेवावे लागले. यावली खटल्यातील आरोपींनी स्पेशल कोर्टाच्या निर्णयाविरुद्ध जो अर्ज केला होता, त्यातील पहिल्या दोन मुद्यात वरील राष्ट्रीय परिस्थिति प्रतिबिंबित झाली होती हें ध्यानात ठेवलें पाहिजे

परंतु १९४३ चा १९ नबरचा ऑर्डिनन्स या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या काळ्या कायद्यामुळेहि नोकरशाहीचा पोल्दाडा पूर्णपणे सुटला नव्हता. स्पेशल कोर्टांनी चालविलेले खटले व दिलेल्या शिक्षा या जरी गैरकायदेशीर ठरल्या, तरी स्पेशल कोर्टाच्याविरुद्ध हायकोर्टाकडे दाद मागितल्याननर, सरकारी अधिकाऱ्यांनी दडेली केली, अन्याय्य अथवा बेकायदा वर्तन केलें, असें जर हायकोर्टांत दिसून आलें, तर सदरहू अधिकाऱ्यावर उलट खटले भरण्यात आले असते आणि त्याना शिक्षा झाल्या असत्या या आपत्तीपासून आपल्या नोकरवर्गाचें सरक्षण करण्यासाठी गव्हर्नर जनरलास आपल्या खास अधिकाराचा उपयोग करून आणखी एक काळा कायदा जारी करावा लागला या कायद्याचें नाव Act of Indemnity असें ठेवण्यांत आलें आणि त्याच्या अन्वयें सरकारी अधिकाऱ्याना सर्व प्रकारचें सरक्षण देण्यात आलें पूर्वीच्या कायद्याच्या अमलबजावणीसाठी त्याच्या हातून कसलींहि अनन्वित कृत्यें घडलीं असलीं व त्यानी कसलेहि भयकर प्रमाद केले असले, तरी त्याना दोषी समजण्यात येऊ नये, व त्याच्याविरुद्ध कसलीहि कारवाई न्यायालयातून चालू नये अशी व्यवस्था या सरकारी नोकराच्या सरक्षणासाठी अवतरलेल्या काळ्या कायद्याने करून ठेवली

पण काळा कायदा तो काळाच कायदा ! गव्हर्नर जनरलाने आपल्या खास अधिकाराची कितीहि सफेती त्यास पुसली व राज्यकारभाराच्या सुरक्षितीच्या बहाण्याने त्याला कितीहि धुतलें, तरी त्याचे काळेपण थोडेंच नष्ट होणार !! काळ्या कायद्याच्या रूपाने हिंदुस्थानातील ब्रि० शासनाला जो कायमचा कलंक लागला तो लागलाच या कलकाचें प्रतिबिंब यावेळींच्या आरोपींनी केलेल्या अर्जांत उमटलेलें असल्यामुळे त्याला अनुलक्षून वरील ऊहापोह करावा लागला शिवाय हायकोर्टाच्या पुढील निर्णयातहि त्याची छाया उमटली असल्याने त्याचा येथे निर्देश करणें ,अवश्य झालें अपीलाचा निर्णय देताना न्या० मू० पुराणिक यानी काढलेल्या पुढील उद्गारात ही छाया वाचकाना आढळून आल्याशिवाय राहणार नाही न्या० मू० पुराणिक म्हणतात,—" ( सरकारी अधिकाऱ्यानी ) दोन वेळां

केलेला गोळीबार कायदेशीर होता की नाही, तसेंच डि० मॅजिस्ट्रेट व त्याचो पार्टी यांचें संपूर्ण वर्तन कायदेशीर होतें की नाही, या प्रश्नावर माझें मत देण्याची ही वेळ नाही ”

सरकारी अधिकाऱ्यांचें वर्तन इतकें गर्हणीय होतें आणि त्यांनी केलेला गोळीबार हा इतका बेकायदेशीर होता की, वर निर्दिष्ट केलेला सरकारी कर्मचाऱ्यांच्या संरक्षणाचा काळा कायदा जर जारी झाला नसता, तर त्यांच्या वर्तनाची चौकशी करणें आणि गोळीबाराच्या कायदेशीरपणाची शहानिशा करणें प्रांतिक सरकारला भाग पडलें असतें अस्तु

रिव्हयूचा अर्ज नागपूर येथे रिव्हयू जज मि० पोलक याच्यापुढे स्पेशल क्रिमिनल कोर्टस ऑर्डिनन्सच्याच ८ व्या कलमाप्रमाणे सुनावणीस निघाला न्यायखात्यातील या गौर काय अधिकाऱ्यांचें माथें १९४२ च्या आंदोलनाच्या आगीचा शेक लागल्यामुळे इतकें गरम झालें होतें, की, आरोपींच्या वकीलाचें म्हणणें सुद्धा धडपणें ऐकून घेण्याचें सौजन्य तो दाखवीत नव्हता त्या वेळच्या परिस्थितीचा रंग इतका जोरदार होता की, जज पोलक याचा सर्व गरमपणा वकीलांनी, आपल्या पक्षकाराच्या हिताकडे नजर ठेवून सहन केला स्पेशल कोर्टानें दिलेल्या शिक्षा कायम ठेवावयाच्या असाच जणूं काय जज पोलक याचा प्रारंभापासून निर्धार होता किंबहुना, आपल्या वृत्तीनें ते असें दाखवीत होते की, ब्रि० सरकारच्याविरुद्ध उघड बंड पुकारणाऱ्या या लोकांना खाऊं की गिळूं असेंच जणू काय त्यांना झालें आहे!! त्यामुळे रिव्हयूच्या निकालात त्याच्याकडून वित्तपत् न्याय मिळेल याची लोकांना आधीच कल्पना येऊन चुकली होती, आणि हें सर्व जाणीत असूनहि न्यायाच्या दरबारातलें हें भाउण चालूं ठेवणें भाग होतें आरोपींच्या तर्फे बचावाचें काम ॲडव्होकेट पी० वाय० देशपांडे, ना० न्य० पांडे व राजाभाऊ गोखले यांनी चालविलें ता० १ ते ४ फेब्रुवारी १९४३ पर्यंत चार दिवस फिर्यादी व आरोपी यांच्या वकीलांचीं भाषणें झालीं, आणि ९-२-४३ रोजीं रिव्हयू जज्जानें आपला निर्णय जाहीर केला

देशभर झालेल्या उघड बडाऱ्या पुराव्यामुळे आणि सर्व हिंदुस्थानभर नि० सत्तेत बसलेल्या प्रचंड हादऱ्यामुळे रिव्हयू जज्ज पोलर यांचें मस्तक किती भणाणलें होतें आणि कागदोपत्रीं नमूद असलेल्या पुराव्यातील महत्त्वाचा पुरावा कोणता व गैर महत्त्वाचा कोणता इ० गोष्टी ध्यानात ठेवण्याचीहि शुद्ध त्यास कशी उरली नव्हती यांचीं मनोरंजक प्रमाणें त्याच्या यावली प्रकरणाच्या निर्णयात उपलब्ध होऊं शकतात आपल्या निर्णयाचा पहिला परिच्छेद लिहीत असतानासुद्धा त्याचा मेंदू कसा विकृत झाला होता पहा ता० १६ आगस्टच्या घटनेबद्दल ते लिहितात—" डि० मॅजिस्ट्रेटच्या हुकमावरून माहोली सर्कलचा रेव्हिन्यू इन्स्पेक्टर गजानन ता० १६ आगस्टला एक हेडकान्स्टेबल व पाच कान्स्टेबल्स बरोबर घेऊन, आदल्या दिवशीं जे मोडतोडीचे प्रकार झाले होते त्याबद्दल बसविण्यांत आलेला २ ०० रु० सामुदायिक दंड वसूल करण्यासाठी यावलीस गेला ही मंडळी जशी यावलीच्या जवळ गेली तसें त्याना घंटानाद ऐकू आले व तेथील रहिवाशाची उपद्रवकारी मनोवृत्ति (Menacing Attitude) पाहून या मंडळीला दंडाचा अंश देखील वसूल न करताच परत यावें लागलें" आता ही गोष्ट कागदोपत्रीं व सरकारी पुराव्यातहि स्पष्ट आहे की, घंटा, शंख, वगैरे इ० जीं वाजविण्यांत आलीं तीं १८ तारखेला, १६ तारखेला नव्हे १६ तारखेला घंटा वाजविण्यात आल्या असें खुद्द रे० इ० गजानन सुद्धा म्हणत नाही, आणि १६ तारखेला यावलीच्या रहिवाशांनी उपद्रवकारी मनोवृत्तीचेंहि प्रदर्शन केलें नाही, पण घंटानादाची ता० १८ ची घटना १६ ता० स पोलर साहेबानी सहज चिकटून दिली कारण तारखांचा विवेक करण्याइतकीहि त्याची बुद्धि ठिकाणावर नव्हती

१८ आगस्टच्या लढाईंत गांधी चौकातील पहिली मारकाट होऊन डि० मॅ० व त्याची टोळी तेथून परत फिरल्यानंतर पुन्हा ही मंडळी दुसऱ्यादा गांधीचौकांत गेली असें म्हणून पोलर साहेब आपल्या निर्णयाच्या तिसऱ्या परिच्छेदात म्हणतात—" डि० मॅ० व त्याची पार्टी कोणाला जखमा झाल्या आहेत की काय हें पाहण्यासाठी पुन्हा गांधी चौकात गेली, पण कोणालाच जखमा झाल्या नाहात असें त्यांना आढळून

आलें ' डि० मॅ० व त्याची समध टोळी दुसऱ्यादा जा गाथा चौरात गेली, ता मोठ्या दयार्द्रबुद्धीनेच !! कोणता जगमा जागऱ्या राय हे पाहाण्याचा त्याचा हेतु होता !!! हा डि० मॅ० च्या अघानीवर नज्ज पोळक याना दाखविलेला विश्वास त्याच्या उपरिनिर्दिष्ट मस्तिष्क-विकृतीचा दुसरा नमुना होय

आता तिसरा नमुना पहा याच परिच्छेद ३ मध्ये हे विद्वान व इतिहास-संशोधक न्यायाधीश म्हणतात— नरसिंगपूरचा दुसरा जमाव चालून येऊ लागला या जमावाचे उग्र ( threatening ) स्वरूप पाहून डि० मॅ०व त्याची मडळी रामकिसनच्या कोटयात शिरली व तेथून त्यानी गोळीबार केला परंतु आपण वेटले जाऊ या भयाने ते दक्षिणे कडील शेतांत घुसले व ३.१४ चे सुमाराचा हा जमाव त्याचा पाठलाग करू लागला पुन्हा गोळीबार करण्यात आला जमाव क्षणभर थांबला, पण पुन्हा पाठलाग करू लागला यावेळीं डि० मॅ० व त्याची मडळी याची मोठी बिकट अवस्था होती त्याच्याजवळचा दारूगोळा सपत आला होता अशा वेळीं सार्जेन्ट ग्रीन याने एक बंदूक घेऊन गोळी मारली व आघाडीवर असलेल्या जमावाच्या तरवारधारी पुढाऱ्याला जमिनीवर लोळविलें आणखी एक गोळी मारली व दुसरा पुढारी लोळविला गेला हा सर्व पाठलाग नरसिंगपुरहून आलेल्या जमावाने केला होता व त्याचेच तरवारधारी पुढारी ग्रीनने गोळ्या घालून मारले या अभिनव शोधामुळे पोल्क साहेब यांची अभिनव इतिहास -संशोधकात गणना करावी लागेल !

प्रत्यक्ष कागदोपत्रीं नमुद असलेल्या घटनांची आपल्या निर्णयात इतकी विकृति करणाऱ्या या न्यायाधिशाचे डोकें ठिकाणावर होतें असें म्हणता येईल काय ? असो

जज्ज पोल्क यानी आपल्या निर्णयात सेशन्स जज्ज मि० दडे याचा निर्णय बहुतेक मान्य केला त्यानी फरक केला तो इतकाच की सदाशिव बानाईत व विरम माळी याना त्यानी दोषमुक्त करून सोडून दिलें

आणि गोविंद सोनार व इसना मराठा हीं अल्पवयी म्हणजे चौदा वर्षांची मुलें आहेत व त्यांनी दंगलींत घेतलेला भाग गैर महत्वाचा आहे असें म्हणून व खटला सुरू झाल्यापासूनचा त्याचा काळ तुरुंगात गेला हें ध्यानात ठेवून त्याची शिक्षा कमी करून त्याना तीन महिन्याची सक्तमजुरीची शिक्षा फर्माविली आपल्या निर्णयाच्या शेवटी पोलक साहेब म्हणतात—" इतर आरोपींना फार मोठ्या शिक्षा देण्यात आल्या आहेत असें मला वाटत नाही त्रिवहुना, त्यापैकी काही लोकानी तरी स्वत ला भाग्यवानच समजायला पाहिजे ( कारण ४ वर्षे व ७ वर्षे सक्त मजुरी इतक्या हलक्या शिक्षा त्याना स्पेशल जज्जाने दिल्या ) म्हणून वर निर्देशिलेल्या सोहन यांच्या शिक्षा मी कायम ठेवतों "

रिव्ह्यू जज्ज मि० पोलक याच्यासमोर जेव्हा या खटल्याच्या निर्णयाची फेरतपासणी चालू होती, तेव्हा आरोपींचे वकील ॲड० ना० म्य० पाडे व जज्ज पोलक याची आत्मसंरक्षणाच्या मुद्यावर जी चकमक उडाली ती विशेष सस्मरणीय असल्याने तिच्यातील प्रश्नोत्तरें देऊन हें प्रकरण सपवूं

रिव्ह्यू जज्ज पोलक व आरोपींचे ॲड० पाडे याचा उपरिनिर्दिष्ट संवाद पुढील प्रमाणे आहे.

जज्ज पोलक—गांधी चौकात जमा होण्यात लोकाचा उद्देश काय होता ?

ॲड० पाडे-सामुदायिक दंड वसुलीस प्रतिकार करणें हा उघड उद्देश होता.

प्रश्न—खेड्यांतील लोकाना सामुदायिक दंडाच्या ऑर्डिनन्समधील सर्व परिणामाचें ज्ञान होतें, यावर मी विश्वास ठेवावा असें तुम्हाला म्हणावयाचें आहे काय ?

उत्तर--न्यायाधीश महाराज, कायद्याचें अज्ञान ही कांही सबब नव्हे. या सिद्धातानुसार आपण जर लक्षावधि लोकांना शिक्षा देऊं शकतां तर त्याच सिद्धांतानुसार आपण हें गृहीत धरायाला पाहिजे की, प्रत्येक मनुष्याला ऑर्डिनन्सचें ज्ञान होतें

प्रश्न—खासगी सरक्षणाचा हक्क किती मर्यादेपर्यंत पोहचू शकतो ?

उत्तर—दुष्ट गोळीबाराला जबाबदार असणाऱ्या डेप्युटी कमिशनर व डि० सुप० ऑफ पोलीस याना ठार मारण्यापर्यंत खासगी सरक्षणाचा हक्क पोहचू शकतो

शेवटी ॲड० पाडे म्हणाले—"न्यायाधीश महाराज फिर्यादीच्या म्हणण्याप्रमाणे, यावलीस जाण्यातला उद्देश गावकऱ्यांशी स्नेहसबध प्रस्थापित करणे हा होता, परतु गावात प्रवेश करण्याच्या वेळेपासून आपण त्याच्या कृतीकडे पाहिले तर, त्यानी स्थापन केलेला एकच सबध आपल्या दृष्टोपत्तीस येतो व तो म्हणजे त्यांच्या लाठ्या व गावकऱ्यांची फुटलेली मस्तकें हाच सबध होय "

---

# प्रकरण ५ वें

## न्या. बोस यांचा संदर्भ

रिव्ह्यू जज पोलक काय निकाल देणार याचा अदाज लोकाना आधीच असल्यामुळे त्याच्या निकालाचें कोणालाच आश्चर्य वाटलें नाही १९४३ न्या १९ नंबरच्या आर्डिनन्सप्रमाणें आता हायकोर्टाचें द्वार, स्पेशल जज व रिव्ह्यू जज यान्या निकालाविरुद्ध दाद मागण्यासाठी खुलें झालें होतें म्हणून कोर्टाच्या लढाईची आणखी एक पायरी चढण्याचें आरोपींनी ठरविलें व हायकोर्टाकडे ता. २७-७-४४ रोजीं यावलीचें अपील दाखल केलें चीफ जस्टिस् ग्रिल यानी हें अपील ऐकण्यासाठी न्या मू व्हिव्हियन बोस याची नेमणूक केली

ता २२ व २३ आगस्ट १९४३ रोजीं अपीलाची सुनावणी झाली. ॲडव्होकेट मुधोळकर व घाटे यानी आरोपींची बाजू न्या. मू. बोस याच्या-समोर जोरदार भाषेत बिल्कूल गोलमाल न करतां माडली त्यात डि मॅ. मल्हूम हा असत्यवादी आहे, कायदेशीर अधिकार नसताना त्याने सामुदायिक दड वसूल करण्याचा बेकायदा प्रयत्न केला त्याच्या या प्रयत्नाचा अर्थ असा होतो की, त्यानेच पोलीसची टोळी बरोबर नेऊन बेकायदा जमाव उभारला व यावलीवर दरवडा घालण्याचा प्रयत्न केला, त्यात ५ इसमाचे खून पाडण्यात आले त्याने गांवकऱ्यांवर केलेल्या हल्ल्यापासून स्वत चें सरक्षण करण्यासाठी गांवकऱ्याना लढावें लागलें इ गोष्टी न्यायमूर्तीच्या नजरेस आणण्यात आल्या

असलेला अति विकटपणा याची त्याना अतिशय तीव्र जाणीव झाली २३ ता चें अँड• घाटे यांचें भाषण ऐकल्यावर न्या बोस घरीं गेले व रात्रीं त्यानी न्याया-यांचीं पुस्तकें पाहिलीं तीं पाहू लागल्यानतर खटल्याचें गांभीर्य, निर्णयाचा कठीणपणा व कायद्याची गुंतागुत त्यांना अधिकच जाणवू लागली यावलीच्या खटल्याचा त्याच्या मनश्चक्षूसमोर एक निराळाच प्रकाश पडू लागला खटल्याचें स्वरूप किती घोर आहे व त्याच्या निर्णयात भविष्यकाळाचा ओघ वदलून देण्याचें कवढें सामर्थ्य साठलें आहे याच्या जाणिवेने त्याचें चित्त अधिकच व्यथित होऊ लागलें निर्णयाची जबाबदारी अतिशयच मोठी होती यात शका नाही स्पेशल जज्ज मि दहे व रि जज्ज मि पोलक या-याशीं सहमत होण्यास व त्यानी आरोपींना दिलेल्या बेफाम शिक्षा मजूर करण्यास न्या बोस यांची सदसद्विवेकबुद्धि तयार नसावी हें स्पष्ट आहे मि दहे व मि पोलक यांचा निर्णय-प्रमाद त्यांना स्पष्ट दिसू लागला असावा संयम, शिस्त, प्रसगा वधान, धैर्य, स्वार्थत्याग, स्वदेशभक्ति आणि राष्ट्रध्वजावरील प्रीति इ आरोपींच्या गुणाचा ठसा त्याच्या मनावर खास उमटल्यावाचून राहिला नसेल तसेंच, डि मॅजिस्ट्रेट व डी एस पी याच्यासारख्या अधिकाऱ्यानी केलेली दंडेलीची वागणूक, गावकऱ्यावर करण्यात आलेले अत्याचार, अधिकार नसताना सामु-दायिक दड बसविण्याचें त्याचें धार्ष्ट्य आणि बेकायदा रीतीने वसूल करण्यासाठी त्यानी केलेला सरकारी सामर्थ्याचा दुरुपयोग, परिणामत पाच गावकऱ्याचा पडलेला बळी, गांधीचौकात वाहिलेलें रक्त, चौदा चौदा वर्षाच्या मुलांना आणि सत्तर सत्तर वर्षाच्या म्हाताऱ्याना झालेल्या जखमा, बेफामपणें करण्यांत आलेला गोळीबार, आणि अखेरीस अधिकाऱ्यानी भ्याड व नामर्दासारखें केलेलें पलायन इ सर्व गोष्टींचा परिणाम कोणाहि सहृदय व न्यायप्रिय मनुष्याच्या अत करणा वर झाल्यावाचून कसा राहील? त्यांतून न्या बोस यानी, 'न्यायदेवतेचा करारा पुजारी' असा लौकिक आजवर सपादन केलेला होता या आपल्या रास्त लौकिकास आपल्या हातून बट्टा तर लागणार नाही ना, अशा विचाराने त्याचें मन अगदी भडावून गेलें असलें पाहिजे म्हणून या परिस्थितींत न्यायाची जबाबदारी एकट्यावर घेण्यापेक्षा फुलबेंचाचा निर्णय घेणेंच श्रेयस्कर असें त्यानी ठरविलें न्या बोस याच्या मन स्थितीचें जें वर्णन वर करण्यांत आलें आहे तें

केवळ कल्पनाविलास नव्हे चीफ जस्टिस् मिल याचेकडे संदर्भ करताना त्यानी लिहिलेलें निर्णयपत्रक जसेंच्या तसें अनुवादित करून खाली देण्यात येत आहे त्याच्या ओळीओळींतून त्यांच्या चित्ताची विकलता व निर्णयाच्या जबाबदारीची त्याना वाटत असलेली गभीरता व्यक्त होण्यासारखी आहे

## न्यायमूर्ति घोस यांचें संदर्भ-पत्र

"या खटल्यामुळे सार्वजनिक महत्त्वाचे गभार प्रश्न उपन्न होत आहेत. डि मॅजिस्ट्रेटने, तो जातीने ज्यात हजर होता अशा (यावली येथील) घटनाबद्दल जें एक सार्वजनिक वक्तव्य दिलं त्यात एक्तर बुध्दया अशत खोटीं विधान केलीं आहेत, अथवा कोर्टासमोर त्याने दिलेल्या जबानी तरी खोटी आहे, असा आरोप करण्यात आलेला आहे पोलीसाना गोळीबार केला होता व त्यात पाच इसम मरण पावले, तसेंच, कायदेशीर अधिकार मिळण्याच्या सुमारें एक महिना अगोदर, प्रस्तुत खटल्यातील खेड्यातून सामुदायिक दड वसूल करण्याचा त्याने जो प्रयत्न केला तें त्याचें कृत्य देखील गैरकायदा होतें असाहि आरोप करण्यात आलेला आहे

या प्रकरणात ज्यांचा सबध आला त्या सरकारी अधिकाऱ्याचा दर्जा लक्षात घेता व त्याच (त्यानी केलेल्या कृत्यांचे) सभाव्य परिणाम ध्यानात घेता यातील सत्य हकीकत शोधून काढणें हीच-एक अतिशय गभीर अशी सार्वजनिक महत्त्वाची बाब बनलली आहे यातून निर्माण होणारे कायद्याचे प्रश्नहि तितकेच गभीर व दूरगामी परिणाम करणार आहेत आणि ते अतिशय गुतागुतीचेहि आहेत बेकायदा लूट व अपहरण करण्याचा जो प्रयत्न डि म च्या नेतृत्वाखाली सरकारी अधिकाऱ्यानी केला असें म्हणण्यात येत आहे, त्याविरुद्ध खाजगी सरक्षणाचा अधिकार किती आहे याच्याशीं हे कायद्याचे प्रश्न निगडित आहेत त्यांचीं हीं कृत्यें बेकायदा होतीं काय आणि त्याचा अर्थ लूट व अपहरण असा होतो काय हे प्रश्नहि तितकेच गंभीर महत्त्वाचे आहेत

"या प्रकरणाचें गभीर स्वरूप पाहता व त्यातून निर्माण होणाऱ्या मुद्यांचा बिकटपणा लक्षात घेता, तसेंच या अथवा त्या कोणत्याहि एका बाजूनें

निर्णय झाला तरी त्याचे जे परिणाम होणार आहेत त्याचें महत्त्व ध्यानात घेता, मला असें वाटतें की, या अपीलाचा संदर्भ आमचे लार्ड चीफ जस्टिस याच्याकडे, या कोर्टाच्या कलम ९ (१) या नियमान्वयें करणें आणि हें अपील दोन जज्जाच्या बेंचाने ऐकावें अथवा शक्य असल्यास, त्या दोघांचा मतभेद झाल्यास पुन्हा तिसऱ्या जज्जाकडे त्याचा संदर्भ करण्याची आवश्यकता नाहीशी करण्याच्या दृष्टीने फुलबेंचानेच तें ऐकावें अशी शिफारस करणें रास्त होईल

"या खटल्याचें महत्त्व व त्यांत गुतलेल्या कायद्याच्या प्रश्नाचा बिकटपणा दोन दिवसाच्या अर्ग्युमेंटनंतर माझ्या ध्यानात आला, ही खेदाची गोष्ट आहे, पण कालच्या अर्ग्युमेंटपर्यंत या प्रश्नांचा आविष्कार (emergant) च झाला नव्हता आणि जेव्हा घरीं जाऊन काल रात्रीं या बाबतींतलें प्रमाणभूत वाङ्मय मीं वाचलें, तेव्हाच त्यांतील आत्यंतिक बिकटपणा व त्याचें अतिशय गुतागुतीचें स्वरुप माझ्या ध्यानात आलें.

म्हणून हे कागद पुढील आज्ञेसाठी माझे लॉर्ड चीफ जस्टिस याच्यासमोर ठेवण्यात यावेत " ता २४-८-१९४४

सही

व्हिव्हियन बोस जज्ज.

---

## प्रकरण ६ वें

# नागपूर हायकोर्टाचा ऐतिहासिक निर्णय

मागाल प्रकरणांत निवेदिल्याप्रमाणे यावलीच्या खटल्याच्या निर्णयाची गभीर जबाबदारी ध्यानात घेऊन न्या मू. घोस यांनी खटला फुलबेंचाकडे पाठविण्यात यावा, अशा आमल्या शिफारशीसह त्याचे सर्व कागदपत्र व आपलें सदर्भपत्र प्रधान न्यायाधीश मि० ग्रिल याच्याकडे पाठविलें चीफ जस्टिस ग्रिल यानी, ते स्वत, न्या० मू० भवानीशकर नियोगी व न्या० मू० काकासाहेब पुराणिक या तिघाच मिळून फुलबेंच बनविलें ज्या अर्थी न्या० मू० घोस यानी सदर्भ केला आहे त्याअर्थी त्याना बेंचावर घेण्यात येईल अशी लोकाची अपेक्षा होती, पण त्याना वगळूनच पूर्ण बेंच बनविण्यात आल

स्पेशल जज्जाकडून रिव्हू जज्जाकडे, रिव्हू जज्जाकडून न्या० मू० घोस याच्याकडे व त्याच्याकडून पूर्णबेंचाकडे जाता जाता यावलीचा खटला बराच गाजू लागला. मि० पोलक याच्यासमोर तो आला त्यावेळींच जनतेचें कुतूहल त्या विषयीं वाढलेलें होतें तशात न्या० मू० घोस यांचें सदर्भपत्र वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाल्यानतर यावलीने सर्वांचें लक्ष एकदम वेधून घेतलें व खटल्याचें महत्त्व सर्वांच्या ठळक रीतीनें लक्षात आलें वस्तुत यावलीच्या जनतेने १८–८–४२ ला दिलेली लढाई अपूर्व होती राष्ट्रीय आदोलनाच्या इतिहास निर्मितींत १९२१ पासून यावली सुसगतपणें व वाढत्या तेजाने भाग घेत होती हुतात्म्याची परपरा यावलीस निर्माण होत होती १९३० पासून १९४२ पर्यंत पुढील लढ्यासाठी तयार राहण्याच्या अविचल उद्देशाने तिने पद्धतशीर शक्ति-सग्रह केला होता १५ ऑगस्ट १९४२ ला अहिंसात्मक पद्धतीने तिने सपूर्ण क्रांति करून दाखविली होती डि० मॅ० मेल्ड्म व त्याचे सहकारी यानी स्वर्तन यावलीवर नि० साम्राज्य सत्तेच्या वर्तानें जें भयकर आक्रमण केलें त्यापासून पद्धतशीर लढाई देऊन व तींत विजय मिळवून तिने आपला बचाव केला होता

यावलाने शिस्त, सयम, सघटना व पराक्रम हे चारहि युद्धोपयोगी गुण प्रकट केले होते, परतु आष्टी चिमूर सारखे लाल भडक प्रकार यावलीला घडले नाहीत यावलीच्या स्वातंत्र्यवीरानी शिस्त व लढाईच्या मर्यादा सोडल्या नाहीत ब्रि० अधिकाऱ्याना त्यानी प्रत्यक्ष कैद केलें व ते शरण आल्यावर त्याना सोडूनहि दिलें, पण त्याची हत्त्या करण्याची कल्पनाहि त्याच्या मनात उद्भवली नाही त्यानी त्याचा पाठलाग केला तो केवळ आपला झेंडा परत मिळविण्याच्या हेतूने, त्याना मारण्याच्या हेतूने नव्हे' यावलीच्या खटल्याचें हें स्वरूप प्रारभीं प्रारभीं जनतेच्या घ्यानात आलें नाही, परतु तीन तीन कोर्टातून गाजत हा खटला जसा वरवर गेला तसतासा तो लोकाचें ध्यान अधिकाधिक आकर्षित करू लागला आणि न्या० मू०घोस याच्या सदर्भपत्रामुळे यावलीचें महत्व अगदी कळसास चढलें राष्ट्रीय पुढाऱ्याचें चित्त त्याने एकदम वेधून घेतलें

म्हणून हायकोर्टाच्या फुलबेंचासमोर जेव्हा हा खटला गेला तेव्हा तो चालविण्यासाठी राष्ट्रीय विख्यातीचा वकील आणण्याचें ठरलें म० गाधी याच्या कानावर सर्व हकीकत घालण्यात आली खटल्याचें स्वरूप त्यांच्या निदर्शनास आणून देण्यात आलें त्यानी त्याचे कागदपत्र वाचले त्यानाहि त्याचें महत्त्व पटलें त्यांनी स्वत मुंबईचे माजी मत्री व सुविख्यात ॲड्व्होकेट श्री० कन्हय्यालाल मुन्शी याना पत्र दिलें व खटला चालविण्याची शिफारस केला हायकोर्टाच्या फुलबेंचासमोर यावलीचा खटला ॲड० मुन्शी यांनी आपल्या नित्याच्या कौशल्याने चालविला आणि आरोपींची बाजू दणदणीतपणें मांडली

ता० १९-१२-४४ रोजीं फुलबेंचाचा निर्णय जाहीर झाला न्या० मू० चीफ जस्टिस ग्रिल यानी सर्वच आरोपींना दोषी ठरविलें व त्याच्या बहुतेक शिक्षा कायम ठेवल्या, परतु न्या० मू० नियोगी व न्या० मू० पुराणिक यानी इ० पी० को० ३३२ व ३३३ कलमाखाली आरोपींना पूर्ण दोषमुक्त केलें व आत्मसरक्षणाच्या हक्काच्या मर्यादा त्यानी ओलाडल्या असें म्हणून इ० पी० को० १४७, ३२४, ३२५, (१४९ कलमा बरोबर वाचून) या कलमाखाली त्याच्यावर दोष ठेऊन व त्यानी भोगल्या इतक्या शिक्षा पुरे झाल्या असें म्हणून त्याना बधमुक्त करण्यात यावें, असा निर्णय दिला फुलबेंचातील बहुमताचा निर्णय अशा प्रकारचा झाल्यामुळे आरोपींची मुक्तता करण्यांत आली



ॲडव्होकेट कन्हैयालाल मुन्शी, मुंबई

फकीर अकबरशहा व त्याचे तीन बहादूर बेटे



१ जिग्गू शहा, २. मताब शहा, ३ लड्डू शहा (उभा)

१ ]

न्या० मू० नियोगी व न्या० मू० पुराणिक यांनी आपला निर्णय देताना जीं निकालपत्रें लिहिलीं त्याचा यथार्थानुवाद प्रस्तुत काडात पुढे दिला आहे. न्या० मू० ग्रिल याच्याहि निकालपत्राचा सारांश महत्त्वाच्या अवतरणासह त्याच्यासोबत देण्यात आला आहे हीं तीनहि निकालपत्र इतिहासात अतिशय महत्त्वाचीं ठरतील न्या० मू० बोस यानी जी आशंका बाळगली ती नि संशय खरी ठरली भविष्यकाळाचा प्रवाह बदलून देण्याचं प्रचड सामर्थ्य या निर्णयात वसत आहे, यात शका नाही हे निर्णय म्हणजे दयायाचनेच्या अर्जाचीं निकालपत्रें नव्हत आरोपींनी दिलेला लढा ब्रि० सरकारच्या कायद्यानी सुद्धा समर्थनीय कसा होता, याचें मार्मिक विवेचन या निकालपत्रांत आहे त्याचे कायदेशीर हक्क त्यात मान्य करण्यांत आले आहेत ब्रि० अधिकाऱ्याच्या उद्दाम वर्तनावर, अत्याचारी मनोवृत्तीवर, बेकायदा वागणुकीवर, सत्यापलाप करण्याच्या अनीतिमान मार्गावर. त्यात कोरडे ओढण्यात आले आहेत या निर्णयामुळे यावलीचा सग्राम हा एका निराळ्याच तेजस्वी स्वरुपात प्रकट झाला आहे तो मूळचाच तेजस्वी व उज्ज्वल होता यात शंका नाही पण न्यायमूर्तींच्या अधिकारी लेखणींतून त्याचें स्वरुप जेव्हा माडलें गेलें, तेव्हा वार्तानियंत्रणाच्या मुस्कटदाबीची जी राखड त्यावर पडत चालली होती ती सर्व उडून गेली आणि त्याची उज्वल तेजस्विता लोकांच्या दृष्टीसमोर अभिनव स्वरूपात चमकूं लागली.

वरील न्यायमूर्तींच्या निर्णयामुळे त्याच्या निकालपत्राच्या आधारें यावलीच्या ता० १८ ऑगस्ट १९४२ च्या प्रतिकाराची जी संगतवार व तेजस्वी अशी वीरगाथा तयार झाली ती या ठिकाणीं सागणें आवश्यक आहे घडलेल्या प्रकाराचा यावलीच्या ग्रामस्थाकडून फक्त इतिहास पूर्वी दुसऱ्याकाडात दिलाच आहे त्याच इतिहासाचें सुवर्ण तीन तान नि० कोर्टाच्या अग्नींतून शुद्ध होऊन बाहेर पडल्यानतर त्याला किती अभिनव चमकदारपणा प्राप्त झाला आहे हें पाहणें व न्यायमूर्तींच्या गोमुखातून बाहेर पडलेल्या यावली वीरांच्या गायागगेचें उदक प्राशन करणें याचकानाहि अधिक पावनकारी वाटेल अशी आशा आहे

हायकोर्टाच्या निर्णयपत्राच्या आधारें तयार होणारी यावली प्रकरणाची कथा पुढीलप्रमाणे आहे —

अमरावतीच्या डि० मॅजि० मेल्कम याने यावलीच्या नागरिकावर २००० रु० चा बेकायदा सामुदायिक दंड बसविला आणि रेव्हे० इन्स्पेक्टरच्या मार्फत तो वसूल करण्याचा ता० १६-८-४२ रोजीं प्रयत्न केला, त्याचा लोकानी जो प्रतिकार केला तो न्याय्य होता लोक आपल्या कायदेशीर हक्काच्या मर्यादेंतच वागले (न्या० मू० मिल यांचा निर्णय पृष्ठ पहा) रेव्हेन्यू इन्स्पेक्टरला अपयश आलेलें पाहून ता० १८-८-४२ रोजीं, डि० मॅजि० मेल्कम स्वत च बेकायदा उद्देशाच्या सिद्धीसाठी म्हणजे सदर्हू सामुदायिक दंड वसूल करण्यासाठी यावलीस गेला या अन्याय्य धमुलीच्या प्रतिकारासाठी लोक गांधीचौकात जमा झाले अशा तऱ्हेने जमा होताना अथवा जमाव करतांनाहि त पूर्णपणे आपल्या कायदेशीर हक्काच्या मर्यादेंतच वागले (न्या० मू० नियोगी याचा निर्णय प० ५ पहा) या जमावाने निघून जावें असा कोणताहि हुकूम त्यास देण्यात आला नव्हता जमावहि शातच होता तथापि डि० मॅ० व डा० एस० पी० हे लोकाच्या *समावर धावून गेले व हुटर पडले, आणि गांधीचौकात फडकत असलेला* कॉंग्रेसचा राष्ट्रध्वज उपटण्याचा त्यांनी प्रयत्न केला अशा रीतीने त्याच्या हातून झेंड्याचा उपमर्द होईपर्यंत लोकानी त्याच्यावर कोणतीहि दगडफेक केली नाही अथवा लाठ्याचाहि उपयोग केला नाही (न्या० मू० नियोगी प ६, ९, व ११)

झेंडा ही गावकऱ्यांची दौलत होती व त्याबावतीत गावकऱ्याना काही कायदेशीर हक्क होते म्हणून डि० मॅजि० च्या टोळीने झेंडा उपटण्याचा, फाडण्याचा या काढून नेण्याचा जेव्हा प्रयत्न केला तेव्हा त्याचा गावकऱ्यांनी प्रतिकार केला (न्या० नियोगी प० १५) प्रतिकार करण्याच्या हेतूनेच त्यांनी दगडफेक केली व लाठ्याहि उपयोगात आणल्या झेंड्याचें सरक्षण करीत असता व तो काढून नेण्याचा प्रतिकार करीत असतानाहि लोक आपल्या कायदेशीर हक्काच्या पूर्णपणें मर्यादेंतच वागले (न्या० नियोगी प० १५) त्यात इतकेंच झालें की असें करताना त्यानी जरूरीपेक्षा अधिक बलप्रयोग केला व खासगी सरक्षणाच्या हक्काच्या मर्यादाचें उल्लघन केलें (न्या० नियोगी प० १५) डि० मॅ० च्या टोळीने गोळीबार केल्यामुळे लोक पागले याच वेळीं अधिकाऱ्याच्या टोळीने गाव सोडून जावयास पाहिजे होतें कारण त्यावेळीं कोणीहि त्याचा पाठलाग करीत नव्हते लोक आधीच पांगले होते पण अधिकाऱ्यापैकीं

डी० एम्० पी० पुन्हा गांधी चौकात गेला व त्याने तेथे कोणी नसताना झेंडा काढून आणला हें त्याचें कृत्य अनावश्यक व अन्यायाचें होतें मध्ययुगीन काळाला शोभण्यासारखें त्याचें हें कृत्य होतें त्यामुळे लोकक्षोभाचा पारा अधिक भडकला (न्या० ग्रिल प० १८ पहा) लोकांनी झेंडा परत मागितला, पण तो परत देण्याऐवजीं अधिकाऱ्यानी उलट दुसऱ्यादा गोळीबार केला पण लोकांचा निर्धार पाहून ते पाटलाच्या घरात लपले तेथें त्यांनी झेंडा परत देण्याच्या शर्तीची लोकांच्यावरोबर नामुष्कीची वाटाघाट केली व ती फसला (न्या० ग्रिल प १८) तेथूनहि मागल्या दाराने ते पळून गेले लोक पुन्हा जमा झाले व दगडफेक करून त्यांचा पाठलाग करूं लागले अधिकाऱ्यांनी पळता पळताहि गोळीबार चालूच ठेवला

हा जो गोळीबार करण्यात आला तो कोणत्याहि अवस्थेंत न्याय्य होता की नाही आणि अधिकाऱ्यांनी जीं कृत्यें केलीं तीं कृत्यें तितक्या थरास नेऊन करणें कायद्याच्या दृष्टीने समर्थनीय होतें किंवा नाही हें ठरविण्याची मागणी हायकोर्टाकडे करण्यांत आलेली नव्हती (न्या० पुराणिक प० ५), म्हणून त्यानी ह्या प्रश्नावर निर्णय दिला नाही तथापि हे सरकारी अधिकारी त्या ठिकाणीं आपलें कायदेशीर व सार्वजनिक कर्तव्य बजावण्यासाठी गेलेले नव्हते आणि म्हणून त्यांना आपल्या बचावासाठी इ० पी० को० च्या ३३२ व ३३३ ह्या कलमाचा आश्रय घेण्याचा अधिकार नव्हता (न्या० नियोगी प० १६) ज्या घटना घडल्या म्हणून प्रस्थापित झालें आहे, त्याच्या आधारें कायद्याचीं पुढील अनुमानें निघू शकतात —

(१) डि मॅजि मेल्हूम याने ता १६-८-४२ रोजीं यावलीवर २००० रु बेकायदा सामुदायिक दंड बसविला व बलप्रयोगाने तो वसूल करण्याचा प्रयत्न केला, तो वसूल करण्यासाठी पाठविलेल्या रे इ बरोबर सशस्त्र कान्स्टेबल्स देण्यात आले होते अशा तऱ्हेने दंड बसविणें व बलप्रयोगाने तो वसूल करण्याचा प्रयत्न करणें म्हणने डाका घालणें व लूटमार करणेंच होय

(२) बेकायदा उद्देशाच्या सिद्धीसाठी म्हणजे वरील सामुदायिक दंड वसूल करण्यासाठी ता १८-८-४२ रोजीं डि मॅ मेल्हूम स्वत सशस्त्र पोलीस बरोबर

घेऊन यावलीस गेला. त्याने बसविलेला सामुदायिक दंडच बेकायदा असल्याने तो वसूल करण्यासाठी त्याने स्वत जो हा प्रयत्न केला त्याचा अर्थ त्यानेहि डाका घालण्याचा व लूटमार करण्याचाच प्रयत्न केला असा होतो

(३) लाठीहल्ला करून जमावाची, पागापाग करण्यापूर्वी एरव्ही शांतपणे उभा असलेला जमाव बेकायदा होता असेंहि त्याने जाहीर केले नाही त्याच्या सांगण्यावरूनच डी एस पा ने झेंडा उपटण्याचा प्रयत्न केला लोकांच्या संमतीवाचून आणि त्याच्या इच्छेविरुद्ध, डि मॅ मेल्ड्रम व डी एस् पी प्रेंट यानी आपल्याबरोबर पाचापेक्षा अधिक सशस्त्र पोलीस बरोबर घेऊन हा जो झेंडा उपटण्याचा प्रयत्न केला तो चोरीच्या गुन्ह्यापेक्षाहि अधिक भयंकर स्वरुपाचा गुन्हा होता ( न्या० नियोगी प० १५ )

(४) झेंडा काढून नेण्याचा हा प्रयत्न बेकायदा होता आपलें कर्तव्य बजावीत असताना त्याच्या हातून ही गोष्ट घडली असेंहि म्हणता येणार नाही (न्या पुराणिक प २ )

(५) प्रक्षोभाचें कोणतेंहि कारण नसताना त्यानी जो गोळीबार केला तो समर्थनीय नव्हता निदान असें खास म्हणता येईल की, खासगी सरक्षणाच्या हक्काची मर्यादा त्यानीच गोळीबार करून उल्लंघलेली होती म्हणून त्याच्या हातून झालेला मनुष्यवध हा निंदास्पद आहे

(७) निदान लोक पागून गेल्यानतर त्यानी तावडतोब गांव सोडून निघून जावयास पाहिजे होते त्याऐवजीं चौकांत कोणी नाही असें पाहून त्यांनी झेंडा काढून नेला कायद्याच्या भाषेत याचा अर्थ चोरी असा होतो.

(८) त्यानी दुसऱ्यादा केलेला गोळीबार मुळीच समर्थनीय नव्हता. म्हणून अधिकारी व त्याची टोळी हे मनुष्यवधाच्या गुन्ह्यास पात्र ठरतात.

साराश डि मॅ मेल्ड्रम व त्याची टोळी यावलीस गेली ती सरकारी अधिकारांत नव्हे त्यांनी तेथे जाऊन डाका घालण्याचा प्रयत्न केला. लोकानी

त्याचा प्रतिकार केला मेल्ड्म व त्याची टोळी यांनी लाठ्या व बंदुकी याचा उपयोग केला म्हणून प्रश्न असा आहे की, आक्रमण करणाऱ्या इसमाला खासगी संरक्षणाचा काही हक्क आहे काय आणि वरील परिस्थितींत लोकाना ठार मारण्याच्या मर्यादेपर्यंत त्या हक्काची व्याप्ति वाढू शकते काय? वस्तुस्थिति अशी होती की, मेल्ड्म व त्याची टोळी हेच आक्रमक होते. त्याना खासगी संरक्षणाचा हक्क नव्हता आणि जरी यदाकदाचित् तो असला तरी त्यांनी त्याच्या मर्यादेचें उल्लंघन केलें आणि त्याचे हातून लूट करणें, डाका मारण्याचा प्रयत्न करणें इ० गुन्हे घडले.

यावलीच्या खटल्याचें वरील स्वरूप ध्यानात घेऊनच न्यायमूर्तींचीं निकालपत्रकें वाचलीं पाहिजेत, अथवा उलट असें म्हणणेंच योग्य होईल की, त्यांचीं निकालपत्रकें वाचलीं म्हणजे यावली येथील घटनांचें वरील स्वरूप ध्यानात आल्या वाचून राहात नाही. पाण्यापेक्षा रक्त अधिक घट्ट असतें या म्हणीचें प्रत्यंतर हायकोर्टाच्या निर्णयातहि आलें. न्या० मू० बोस यांच्या मनःस्थितीचें विवरण मागील प्रकरणात केलेलेंच आहे. नियोगी व पुराणिक या न्यायमूर्तिद्वयानी लोकाच्या नाडीवर अचूक बोट ठेवलें. ते हिन्दी असल्यामुळे हिंदी लोकाच्या आशा–आकांक्षांशीं ते अधिक समरस होऊं शकले व त्यांच्या मनोवृत्तींत शिरून खऱ्या प्रकारचें मर्म त्यांना बरोबर शोधून काढतां आलें उलट चीफ जस्टिस मिल याना इंग्लिश लोकाचा व ब्रि. सत्तेचा अभिमान असणें स्वाभाविक असल्यामुळे त्या सत्तेचें उन्मूलन करणाऱ्या लोकाच्याकडे 'बंडखोर' या नात्यानेच ते पाहूं शकले, आणि साहजिकपणेच ती सत्ता कायम ठेवण्यासाठी जिवाचें रान करणाऱ्या मेल्ड्मविषयीं त्यांना आदरयुक्त सहानुभूति वाटली आणि म्हणून त्याच्या अनेक अवास्तव [illegible] समर्थन करण्याची [illegible] त्याच्या ठिकाणीं दिसून आली.

परंतु एकंदर प्रकरणात मि. [illegible] दृष्टिकोनाचें पारडें [illegible] होतें की, त्यापुढे न्या. मिल यांच्या [illegible] वृत्तीचें वजनसुद्धा [illegible] आणि त्यांनाहि मधून मधून [illegible] दृष्टिकोन थोडे उडविणें [illegible] कांही उदाहरणें देऊन हा मुद्दा [illegible] अधिक मनोरंजक [illegible]

गावात शिरल्याबरोबर पोलीसानी जो पहिला लाठीहल्ला केला त्याविषयी न्या मिल म्हणतात –"या बाबतींतल्या प्रत्यक्ष घटनाचें स्वरूप फिर्यादीच्या साक्षीदारानी सौम्य करून दाखविलें जमावाने निघून जावें असा औपचारिक हुकूम दण्यांत आला नव्हता हेंहि मला मान्य आहे '

"या लहानशा जमावाचा चौकापर्यंत पोलीसांनी पाठलाग केला नसता तर तें अधिक शहाणपणाचें झालें असतें, असें पुढील घटनावरून म्हणता येईल "

डि मॅ मेल्ड्रम याच्या जबानींतली विसगतिहि चीफ जस्टिस यांना मान्य करावी लागली ते म्हणतात –"इतर साक्षीदाराशीं तुलना करता त्याचें तपशीलाबाबतचें वक्तव्य गोलमाल (Vague) आह "

प्रातिक सरकारच्याहि वर्तनावर कोरडे उडविणें न्या मू मिल यांस अवश्य वाटलें सामुदायिक दड बसविण्याचा हुकूम प्रातिक सरकारनेच डि मॅ मेल्ड्रम यास दिला असला पाहिजे त्याच्यासारखा तरुण जिल्हाधिकारी स्वत च्या जबाबदारीवर बेकायदा कृत्य करण्यास प्रवृत्त होईल असें न्या मिल यास वाटत नाहीं या बाबतींत त्यानी मेल्ड्रमचें समर्थन करण्याचा कसा प्रयत्न कला आहे हें पाहणें मनोरजक आहे न्या मू मिल म्हणतात –'मि मेल्ड्रम यांनी आपल्या जबानीत सागितलें आहे की, प्रातिक सरकारने दिलेल्या अधिकारान्वयेंच आपण सामुदायिक दड बसविला ता १२ ते १५ ऑगस्टच्या काळात त्या बाबतींतल्या सूचना प्रा सरकारकडून टेलिफोनवर मिळाल्या होत्या कोणत्या खेड्यावर किती दड बसवावयाचा हें तारतम्य पाहून ठरविण्याचा अधिकारहि प्रां सरकारनें आपणासच दिला होता या मुद्याला उत्तर देताना विद्वान ॲडव्होकेट जनरल यानी सागितलें की सरकार व मि मेल्ड्रम याच्या दरम्यान टेलीफोनवर बातचीत झाल्याचा सुगावा (trace) सरकारला लागत नाहीं पुढे तर त्यानी निश्चितपणें असें सागितलें की, या प्रश्नाबाबत चीफ सेक्रेटरीने मि मेल्ड्रम यास कोणताहि फोन केला नव्हता "

परतु मेल्ड्रम हा दोषी आहे ही गोष्ट न्या० मिल याना पटत नव्हती, याची कल्पना त्यांच्या पुढील उद्गारावरून येण्यासारखी आहे :—

"आमच्या मनावर असा ठसा उमटला आहे की, **'चीफ सेक्रेटरी'** या शब्दावर जोर देण्यात आला होता. पण सरकारजवळ काही चीफ सेक्रेटरी हा एकच ऑफिसर नाही.............मि० मेल्डूमसारखा नवीन (Junior) डि० मॅ० १९४२ च्या नं. २० च्या ऑर्डिनन्सची, सामुदायिक दंड वसविण्याच्या पद्धतीच्या बाबतींत अवज्ञा करील आणि प्रां० सरकारचे सर्व अधिकार आपणासच आहेत असें समजून वागेल, हें आम्हांला संभवनीय वाटत नाहीं.............प्रांतिक सरकारनेच हुकूम दिलेले असले पाहिजेत. मि० मेड्रम यांच्या मेंदूंतून सामुदायिक दंडाची कल्पना निघाली नाही, याविषयीं आम्हाला संदेह नाही." चीफ सेक्रेटरीने जर हुकूम दिला नव्हता, तर तो खुद्द गव्हर्नराने दिला असला पाहिजे अशी न्या० ग्रिल यांची गर्भित सूचना आहे काय?

डि० मॅ० मेल्डूमच्या तोडीचा दुसरा जो अधिकारी ता० १८-८-४२ च्या आक्रमक टोळीबरोबर यावलीस गेला होता तो म्हणजे डि० सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस' मि० प्रॅट हा होय. परंतु सरकातर्फे या प्रॅटला साक्षीदार म्हणून शेवटपर्यंत बोलावण्यांत आलें नाही. साक्षीदारांच्या यादींतून प्रॅटला वगळण्यांत सरकारचा हेतु दुष्ट होता ही गोष्ट न्या० ग्रिल यांनाहि मान्य करणें अपरिहार्य झालें. किंबहुना, त्यामुळे सरकारच्या वर्तनावर जबरदस्त लांछन आलें अशी त्यांची निश्चित धारणा झाली असली पाहिजे. या विषयाबाबतचे त्याचे पुढील उद्‌गार मोठेच उद्‌बोधक आहेत यांत शंका नाही. ते म्हणतात.—"मि० प्रॅट यांना साक्षीदार म्हणून बोलावण्यांत आलें नव्हतें. याबाबत सरकारच्या तर्फे असें स्पष्टीकरण देण्यांत आलें आहे की, दंगेखोरांपैकी कोणालाच तो ओळखूं शकला नसता, म्हणून त्याला बोलावण्याची आवश्यकता नव्हती." हें स्पष्टीकरण पर्याप्त आहे असें आम्हांला वाटत नाहीं............(मि० प्रॅट) यांनी स्वत:च दुसऱ्यांदा चौकांत जाऊन झेंडा काढून आणलेला होता आणि दंगलीच्या वेळींहि त्यांनीच प्रथम झेंडा धाढण्याचा प्रयत्न केला होता. म्हणूनच त्यांना साक्षींत बोलावण्यांत आलें नव्हतें असा आमचा ठाम समज झाला आहे. त्यांची (मि० प्रॅट यांची) ही कृति (झेंडा काढण्याची) जरी बेकायदा

नसली, तरी तिच्यामुळेच जमावाच्या क्षोभाचा पारा, एरव्ही भडकला नसता इतका भडकला. झेंडा काढून नेण्याचा पहिला प्रयत्न विफल झाल्यानंतर मागाहून पुन्हा पोलीसदल बरोबर घेऊन चौरात जाणें व झेंडा काढून आणणें अनावश्यक व अन्यायाचें ( Unnecessary and injudicious ) होतें. मध्ययुगीन लढाईच्या ज्या विचित्र तऱ्हा होत्या व विजयपताका आणण्याची त्या काळची जी पद्धति होती त्या सारखाच हा प्रकार होय. या त्यांच्या कृतीचाच आणखी एक दुर्दैवी व अपरिहार्य परिणाम असा झाला की, पोलीस पार्टी जेव्हा पाटलाच्या घरात दडली व जेव्हा त्यांना लोकांनी वेढा दिला तेव्हा कोणत्या शर्तीवर आपण झेंडा परत करण्यास तयार आहोंत या विषयीं नामुष्कीचीं बोलणीं करण्याचा प्रसंग त्यांच्यावर ( पोलीस दलावर ) आला व तीं बोलणींहि फसलीं; आणि परिणामतः लोकांचा क्षोभ पुन्हा भडकला त्यांच्या समोर अधिक माघार घेणें त्यांना भाग पडलें ! मि० ग्रँट यांच्या या सारासार विवेकहीन ( Injudicious conduct ) वर्तनावर बसून होणारी उलटतपासणी टाळवी, म्हणूनच फिर्यादीनें त्यांना साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत बोलाविलें नाही असें आम्हांला वाटतें

स्पेशल जज श्री० दडे व रिव्हयू जज मि० पोलक यांच्यावरहि जातां जाता एक फटकारा न्या० मिल यांनी मारला आहे. ३३२ व ३३३ कलमाखाली आरोपींना शिक्षा दिल्यानंतर पुन्हा त्याच लोकांना ३२४ व ३२५ कलमाखाली शिक्षा सुनावण्यात आल्या होत्या. त्याविषयीं न्या० मू० मिल म्हणतात " ३३३ व ३३२ कलम १४९ कलमाबरोबर वाचून शिक्षा दिल्यानंतर त्याच लोकांना ३२४ व ३२५ कलमान्वयें शिक्षा देणें बाबफूल ( Superfluous ) होतें "

हायकोर्टाच्या जड कागदपत्रांतून यावली खटल्याचें जें नारसिंहरूप प्रकट झालें त्याची कल्पना येण्यास वरील विवरण पुरेसें होईल असें वाटतें.

ता० १८-८-४२ च्या लढाईबाबत एकंदर ४८ इसमांवर खटले भरण्यांत आले. त्यांपैकीं दोन शेवटपर्यंत फरार राहिले. हायकोर्टाचा निर्णय

झाल्यावर ते पोलीसच्या स्वाधीन झाले व त्याना नतर सोडून देण्यात आले ते सर्व लोक कामकरी शेतकरी वर्गांतल्च होते ट्रायल कोर्टाने त्यापैकी चार इसमाना दोषमुक्त करून सोडून दिलें व बेचाळीस इसमाना दोषी ठरवून चार वर्षांपासून सात वर्षांपर्यंत सक्त मजुरीच्या शिक्षा ठोठावल्या रिव्ह्यू अर्जाने आणखी चार इसमाना सोडून दिलें व अडतीस जणाच्या शिक्षा कायम केल्या हायकोर्टाने ३०७, ३३२ व ३३३ कलमांखाली झालेल्या सर्व शिक्षा रद्द ठरविल्या ३२५ कलमाखालील शिक्षा कायम ठेवल्या पण भोगली इतकी शिक्षा पुरे झाली असें म्हणून सर्वांनाच बंधमुक्त केलें असा न्यायालयांतील लढाईचा थोडक्यात मतितार्थ आहे

या खटल्यात हायकोर्टानेहि काही शिक्षा कायम ठेवल्या असल्या तरी व्यवहारत सर्वच आरोपी बधमुक्त झाल्याने सर्वांना विजयाइतकाच आनद वाटला शिवाय हायकोर्टाच्या निर्णयात यावलीकराचा नैतिक विजय फार मोठा झाला जनतेच्या बाजूने कायद्याचे कैक सिद्धात प्रस्थापित झाले तिरगी ध्वज हा बेकायदा नव्हता व ती त्या गावची संपत्ति होती व तिच्या सरक्षणासाठी त्या गावाने समुचित होऊन लढणें हा त्याचा हक्क होता, ही गोष्ट कायद्याने प्रस्थापित झाली अधिकाऱ्यानी बसविलेला बेकायदा सामुदायिक दड वसूल करण्यास प्रतिकार करणें हाहि जनतेचा हक्क प्रस्थापित झाला असल्याने अन्याय्य दडाचा प्रतिकार करण्याचा आपला निश्चय सभा भरवून व्यक्त करण्याचा लोकाना हक्क आहे हीहि गोष्ट कायद्याने प्रस्थापित झाली हे सर्व प्रश्न राष्ट्रीय स्वरूपाचे होते जनतेच्या या हक्कावर नोकरशाहीने गदा आणली होती पण यावलीने प्रथम नोकरशाही बरोबर ता० १६ व १८ ऑगस्टला प्रत्यक्ष लढाई करून आणि नतर कोर्टातील लढाया देऊन आपले हे हक्क प्रस्थापित केले एकट्या यावलीने राष्ट्राला दिलेली ही देणगी होय या देणगीबद्दल राष्ट्र तिचें ऋणी राहील

यावलीने आणखी एक धडा राष्ट्राला शिकविला तो म्हणजे, असले मूलभूत महत्त्वाचे हक्क प्रस्थापित करण्यासाठी त्यागहि तितकाच मोठा करावा लागतो त्यासाठी यावलीचे सात वीर हुतात्मे झाले व त्याशिवाय

तेवीस वीर गोळ्या लागून कायमचे जायबंदी झाले नोकरशाहीकडून अनन्वित छळ व जुलूम बरदास्त करावा लागला सामुदायिक निर्वासनाचें तप आचरावें लागलें आणि तीन तीन कोर्टें चिकाटीनें आपला लढा लढत रहावें लागलें व सतत दोन वर्षे कारागृहवासातील यातना भोगाव्या लागल्या गावचागाव जेव्हा इतक्या महान त्यागास–यज्ञास तयार झाला, तेव्हाच वरील हक्काचें पसायदान त्याच्या-नव्हे सबंध राष्ट्राच्या पदरात पडलें

पण एवढ्यानेच यावलीच्या विजयमालिकेंतील मणी संपले नाहीत. नागपूर हायकोर्टाने यावली खटल्यात दिलेल्या निर्णयानें नोकरशाहीचे धकेपणे उडाले यावली खटल्याला प्राप्त होऊ लागलेल नारसिंहरूप पाहून तिची पाचावरच धारण बसली या प्रकरणातला मुख्य गुन्हेगार अमरावतीचा डेप्युटी कमिशनर मेल्डूम हायकोर्टाच्या निर्णयाच्या आधीच हिंदुस्थान सोडून पळून गेला त्याने दक्षिण आफ्रिकेंतली नोकरी पत्करली सरकारी अधिकाऱ्यांच्या धुंदीचा पारा यावलीच्या निर्णयानें शून्याशावर उतरविला. आपल्या वर्तनाची चौकशी होणार काय, १९४२ सालातील आपल्या दुष्कृत्याचा पाढा यापुढे भरकोर्टातून वाचला जाणार काय या भीतीनें त्यांची गाळण उडू लागली कालपर्यंत ताठ माना करून चालणारे अधिकारी खाली मान घालून चालू लागले किस्येकांनी राष्ट्रीय पुढाऱ्यांची खुशामत करण्यास प्रारंभ केला सारांश, नोकरशाहीला धैर्य विगलित करणे ( loss of morale ) हा या खटल्याच्या रुपाने यावलीने मिळविलेला मोठाच विजय होता यावलीच्या निर्णयाने भविष्यकालाचा प्रवाह बदलून टाकला यात शंका नाही सरकारी अधिकाऱ्यांच्या संरक्षणाचा काळा कायदा प्रा० ग्वरारने यावलीच्या निर्णयानंतरच जारी केला पण त्यामुळे नोकरशाहीची घमेंड लागलेली हिंमत सावरली गेली नाही. यावलीने तिचा एवढा मोठा कुरून जमीन दोस्त केला होता की तें भगदाड बुजविणें मि० सरकारला त्यानंतर केव्हाच शक्य झालें नाही

# प्रकरण ७ वें

# निःस्वार्थ साह्यकर्ते.

ता० १८-८-४२ रोजीं झालेल्या युद्धाच्या घटनेंत व त्यांतून निर्माण झालेल्या कोर्टाच्या भांडणात आपण आतापर्यंत इतके रंगलों की, ता० १५ आगस्टला ज्यांनी संपूर्ण अहिंसक क्रांति केली व यावलीपासून माहोली-पर्यंतच्या टापूवर काँग्रेसचें राज्य प्रस्थापित केलें आणि माहोली पोलीसस्टेशनवर सत्याग्रह करून त्यावर क्रांतीचा पूर्ण ताबा केल्यानंतर जे सत्याग्रही या नात्याने पोलीस सबइन्स्पेक्टरने 'तुम्हांला कैद केलें आहे' असे म्हणतांच, आपणहून त्याच्या स्वाधीन झाले त्या वीर पंजाबराव प्रभृति क्रांतिवीरांचें पुढे काय झालें हें पाहण्यास आपणांस आतापर्यंत सवडच मिळाली नाही.

मागे क्रांतिकांडात सांगण्यांत आलेच आहे की, त्यांना त्या रात्रीच म्हणजे १५ तारखेलाच अमरावतीच्या तुरुंगांत नेऊन पोहचविण्यांत आलें. नंतर १८ ता. च्या धडामोडींबाबत धरपकड झाल्यानंतर व त्या प्रकरणांतील आरोपींचा सतत दोन महिने पाठलाग करून दोषारिसरीज यांच्या सर्वांना पकडण्यांत आल्यानंतर १५ आगस्टच्या सत्याग्रहाबद्दल एकूण २५ इसमांवर सरकारी मालमत्तेचा विध्वंस केल्याच्या आरोपावरून खटले भरण्यांत आले. त्यांत लड्डुशा फकीर, विश्वासराव, रामराव टापरेणे, सूर्यभान हरिजन, अमृतराव हरिजन, काशिराव हरिजन, जयदेव मानेकर व सिताराम तेली हे आठ आरोपी असे होते की, त्यांना १८ तारखेच्या खटल्यांतहि गोवण्यांत आलें होतें आणि १७ इसमांवर केवळ १५ ता० च्या घटनांबद्दल खटले भरण्यांत आले होते.

या सतरा जणांचीं नांवें पुढीलप्रमाणे आहेतः—(१) वीर पंजाबराव यावलीकर (२) अण्णासाहेब मडघे.-(३)-सितारामजी राऊत (४)

रानाराम झिंगानी काडल्कार (५) राजाराम गोपाळजी (६) नथूजी कारी (७) वामनराव ढोक (८) नथूजी घोंगड (९) मिर्चा बेग (१०) अमृतराव पहिलवान (११) रानारामजी पाचघरे (१२) पूर्णाजी हरिजन* (१३) साहेबराव नागपुरे (१४) सदाशिवराव मडघे (१५) अण्णासाहेब पंढरपुरकर (११६) नथूजी काडल्कार (१७) विठोबा हरिजन

हे सगळे ॲडिशनल डि० मॅजिस्ट्रेट मि० अमानुल्ला यांच्यापुढे चालले जे दहा सत्याग्रही १५ आगस्ट १९४२ ला आपणहून पोलीसच्या स्वाधीन झाले होते त्यांनी सर्व आरोप कबूल केले सत्याग्रही या नात्याने काँग्रेसचा कार्यक्रम आपण अमलात आणला व त्याबद्दल होईल ती शिक्षा भोगण्यास आपण तयार आहोत, असें सत्याग्रहीस शोभण्यासारखेंच तेजस्वी उत्तर त्यांनी कोर्टास दिलें पण वाळल्यावरोबर ओलेंहि जाळण्यात आलें सर्वच आरोपींना पाच वर्षांपासून एक वर्षापर्यंतच्या शिक्षा ठोठावण्यात आल्या

वकिलांनी त्याचेंहि अपील सेशन कोर्टांवर चालविलें, पण आरोपींना आरोप मजूर असल्याने अपिलांना काही अर्थ उरत नव्हता अर्थात खालच्या कोर्टाच्या सर्व शिक्षा कायमच राहिल्या १५ ता० च्या सत्याग्रहींचे खटले हा वस्तुत भांडणाचा विषयच नव्हता त्यांना जबरदस्त शिक्षा देण्याची सरकारची जिद्द होती एवढेच सत्याग्रही वाटेल त्या शिक्षा बिनतक्रार भोगण्यास तयारच होते

अजाबराव व विश्वासराव फरारी होते त्यांच्या जमिनी हर्रासास निघाल्यानंतर ते आपणहून पोलीसच्या स्वाधीन झाले होते त्या दोघांचाच खटला निराळा चालला ॲ० डि० मॅ० मि० बंगाले यांनी अजाबराव यांना १८ आगस्टच्या दंगलींत भाग घेतल्याबद्दल चार वर्षे सक्त मजुरीची शिक्षा ठोठावली परंतु विश्वासराव यांना १५ ता० चा सत्याग्रह व १८ ता०ची दंगल या दोन्हींत गोवण्यात आलें व त्यांना सत्याग्रहाबद्दल चार वर्षे सहा महिने व दंगलींत भाग घेतल्याबद्दल चार वर्षे अशी दुहेरी शिक्षा फर्मावण्यात आली पुढे त्या दोघांचेंहि अपील इतरांच्या बरोबरच चालले

## निःस्वार्थी साह्यकर्ते



श्री. भीमराव ब्राह्मणवाडेकर



श्री. मारोतराव कुडकर



श्री अण्णासाहेब हिरेकर

वीर पंजाबराव यास कोणी जवळचा नातलग नाही असें म्हणून त्याची सर्व शेती व मालमत्ता सरकारने जप्त केली होती व आनंद आप्पाजी पाटील यास रिसीव्हर नेमून ती त्याच्या स्वाधीन केली होती. ही इस्टेट त्याच्या ताब्यांत असेपर्यंत त्याने पुष्कळच मलई खाल्ली. परंतु कुंडचे श्री० मारोतराव पाटील यानी ती इस्टेट आपल्या ताब्यात मिळावी म्हणून मि० अमानुल्ला ॲ० डि० मॅ० याचेकडे अर्ज केला. श्री० मारोतराव पाटील व वीर पंजाबराव याचे अतिभाऊ भीमराव माधवराव ब्राम्हणवाडेकर याचे संबंध ध्यानात घेऊन मि० अमानुल्ला यांनी वरील इस्टेट त्याच्या ताब्यांत मिळावी असा हुकूम दिला. पाटील आनंद आप्पानी एवढ्यावर ताबा देईना. तेव्हा मारोतराव यानी पोलीसची मदत घेतली व इस्टेटीचा ताबा मिळविला.

या ठिकाणीं श्री० मारोतराव पाटील, भीमराव व आणखी काही कार्यकर्ते याच्याबद्दल दोन शब्द लिहिणें जरूर आहे ज्यावेळीं सर्व गांव हवालदील झाला होता आणि ता० १९-८-४२ ला फौजी आक्रमण गावावर येणार म्हणून सामुदायिक निर्वासन करण्यात येत होतें, त्यावेळीं अब्बासभाई, अवदुल्ला व शिवमंगलसिंह याच्या आग्रहावरून विश्वासराव यानींहि भूमिगत होण्याचें ठरविलें, परंतु त्यांचें मन गाव अनाथ टाकून निघून जाण्यासाठी धजेना. तीच स्थिति अजाबराव यांचीहि होती. त्यावेळीं अब्बासभाई यानी त्याना पुन्हा सांगितलें की, " तुम्ही गांवात राहणें धोक्याचे आहे तुमचा जो घरच्या इस्टेटीचा कारभार आहे तो आम्ही सांभाळूं, पण तुम्ही गांव सोडलेंच पाहिजे. मी तुम्हाला यापुढे तुमच्या घरीं वापस जाऊ देणार नाही. तुम्हाला जर काही मागावयाचें असेल तर तें मला सांगा मी तें पूर्ण करीन तुमच्याबरोबर शिवमंगलसिंह ठाकूर व अवदुल रहीम यानाहि न्या, म्हणजे तुम्हाला कोणत्याच गोष्टीचा त्रास होणार नाही " याप्रमाणे निवेदन करून विश्वासराव आपल्या वक्तव्यात पुढे म्हणतात—" निघण्यापूर्वी मी अब्बासभाई याच्यावर, माझ्यावर असलेली सर्व जबाबदारी सोपवून दिली. त्याना मीं सांगितलें की, प्रथम तुम्ही आमच्या घरीं जा. घरासमोर असलेल्या गोठ्या लागलेल्या लोकांना

अमरावतीला नेण्याची व्यवस्था लावा. त्याकरिता बैलगाड्या तयार ठेवल्या आहेत निदान त्याच्यासाठी डॉक्टर घेऊन या आमच्या जमिनीची, बैल, गाई, म्हशी या गुरांची जोपासना करा व जखमी व पीडित लोकाच्या खाण्याची व्यवस्था करा व त्याची काळजी वहा."

निर्वासनप्रकरणात देण्यासारखा विश्वासराव याच्या वक्तव्यातील हा उतारा येथे देण्याचे कारण इतकेच की, लढाई लढत असताना अथवा निर्वासन करीत असताना काही प्रामाणिक व विश्वासु कार्यकर्ते मुद्दाम मागे राहिले होते लढवय्याच्या अथवा तुरुगात जाणाराच्या यादींत त्याची नावें अर्थात् येण्यासारखी नाहीत. पण त्यामुळे त्यानी केलेल्या सेवेचें मूल्य कमी होऊं शक्त नाही किंबहुना, मारोतराव पाटील, अब्बासभाई व रामकिसनजी उर्फ बाबूशेठ याच्यासारखे जे कार्यकर्ते बुद्धया पाठीमागे राहिले, पण ज्यानी यावलीच्या विपन्न स्थितींत तिची सेवा केली, तिला धार दिला व तिचें स्वातन्त्र्यप्रेम कायम राखलें त्याच्या मूक सेवेचें मूल्य लढवय्याच्या पराक्रमापेक्षा कमी गणता येणार नाही विदुर पाडवावरोबर कौरवाच्याविरुद्ध लढला नाही, पण पांडव वनवासात व अज्ञातवासात असताना त्याने पाडवाची माता कुंती हिचा जो प्रतिपाळ केला व भारतीय आख्यानात तो जितका प्रशसेस पात्र झाला, तितक्याच दर्जाचें काम मारोतराव पाटील, अब्बासभाई, भीमराव, रामकिसनजी उर्फ बाबूशेठ, नानासाहेब मगरुळकर इ॰ कार्यकर्त्यांनी यावलीच्या वीराच्या अज्ञातवासात करून दाखविलें व तितक्याच प्रशसेस तेहि पात्र झाले

जखमी लोकाचे उपचार करणें, निराश्रिताना साह्य करणें, भूमिगताची माहिती ठेवून त्याच्या गरजाच निवारण करणें, कोर्टातील भाडणें लढत राहणं, वकिलाना सर्व तऱ्हेची माहिती व मदत उपलब्ध करून देणें आणि वीर पजावरावच्या इस्टेटीचें भाडण लढणें इ॰ प्रकारची सर्व कामें या मंडळींनी केलीं. मारोतराव पाटील घुडसर यानी पजाबरावें याची अनन्य मैत्री निभाविली कोर्ट कचेऱ्यातील भाडणासाठी स्वत ची सर्व इस्टेट फुकून देण्यास ते तयार झाले 'माझें सर्वस्व बरबाद झाले तरी चालेल, पण यावलीचा लढा तीनहि कोर्टातून लढला गेलाच पाहिजे.' असा त्याचा आग्रह होता व तो त्यानी

शेवटास नेऊनच दाखविला यावलीस गोळीबार झाला हें समजल्यावर मारोत-राव पाटील व मारोतराव ढोबळे एका लॉरींत डॉक्टरला घेऊन माहोलीस आले पण ब्रि० लष्कर गावात आहे हें समजल्यावर ते वापस गेले पजाबराव याच्या इस्टेटीवर कर्ज होत रिसीव्हर आनंद आकाजी याच्या ताब्यातून सोडवून मारोतराव व भामराव यानी ती आपल्या ताब्यात घेतली, तेव्हा तर तिची अधिकच धुळधाण उडालेली होती गुरेंढोरें लिलाव झालीं होतीं उभें पीकहि कापून नेण्यास दुष्ट आनद आकाजी याने कमी केलें नव्हतें परंतु मारोतराव व भीमराव यानी ती ताब्यात घेतली व त्यानी तिची मशागत केली इतक्या आत्मीयतेने व चोख रीतीने त्यानी ती साभाळली की, पजाबराव सुटून येण्या-पूर्वीच त्याचें सर्व कर्ज फिटलेलें होतें कर्जाच्या निरसालाचें सर्व श्रेय मगरूळकर नानासाहेब यानाच आहे गुरेंढोरें नादू लागलीं होतीं व शेतें पिकानी डुलूं लागलीं होतीं मैत्रीचा हा नमुना खरोखर अनन्यसाधारण नव्हे काय? किती ठिकाणीं तो सापडूं शकेल? तसेंच श्री रामकिसनजी अचलदासजी उर्फ बाबूशेट याच्या व त्याच्या मातोश्रींच्या साह्याचाहि कृतज्ञतापूर्वक निर्देश करणें अवश्य आहे ता १९-८-४२ ला यावलींत शिल्लक राहिलेल्या सर्व लोकाना त्यानी शिधासामुग्री दिली जखमी लोकाना वैद्यकीय साह्य मिळविण्यासाठी रोख रकमेची मदत केली आणि पजाबराव सुटून येईपर्यंत आणखी ज्या ज्या तऱ्हेने शक्य होईल त्या त्या सर्व तऱ्हानी निराश्रिताना साह्य केलें एवढे नि स्वार्थ व जिव्हाळ्याचे कार्यकर्ते यावलीस होते म्हणूनच तिचें नाव प्रारंभापासून अखेर-पर्यंत उज्ज्वल राहिलें तिला कालीं मान खाली घालण्याचा प्रसग आला नाही व प्रचड ब्रि० साम्राज्यशाहीशीं झुज देण्यात ती यशस्वी झाली

आता अमरावतीच्या व नागपूरच्या वकील मंडळीबद्दलहि दोन शब्द या ठिकाणीं लिहिणें अत्यावश्यक आहे यावलीचा खटला तीन तीन कोर्टें लढला गेला, पण एकाहि अवस्थेंत वकीलानी पैसा घेतला नाहीं पाटे, गोखले, ब्रम्ह, पी वाय देशपाडे, मुधोळकर, घाटे व चन्द्रयानशकरी मुनशी इतक्या कायदेपडिताना या खटल्यात विनामूल्य काम केलें स्वातंत्र्याच्या लढ्याचा एक भाग या बुद्धीनेच ते लढले कायद्याचा कीस तर काढलाच पण बऱ्या सरकारी अधिकाऱ्यांची दोन्हीहि ...

भय न बाळगता त्यांनी त्याच्या अपकृत्याचें स्वरूप व यावलीच्या प्रतिकारार्ची तेजस्विता इतक्या ओजस्वी रीतीनें प्रकट केली की, न्यायाधीशानाहि माना डोलाव्या लागल्या

विशेषत अॅड० ना० त्र्यं० पाडे व राजाभाऊ गोखले यानी सहा महिनेपर्यंत सर्व उद्योगधदा व कामकाज सोडून दिलें व अनन्यभावानें ते खटल्याची तयारी करीत राहिले या त्याच्या देशसेवेच्या कालांत अॅड० पाडे याचे मित्र अॅड० वि० दा० ब्रम्हे यानी त्याना कोणतीहि घरगुती काळजी भासू दिली नाही तसेंच अॅड० राजाभाऊ गोखले याचे चुलते अॅड० बाबासाहेब गोखले यानी पुतण्याचा सर्व भार साभाळला हे दोघेहि तरुण दिवसचे दिवसच काय, पण महिनेच्या महिने तुरुंगांत राहिले आरोपींची बाजू त्यानी पूर्णपणें समजून घेतली आरोपींच्या दमदारपणाची व हिंमतबाजीची खणखरता पाहून त्यांचीहि हिंमत द्विगुणित होत गेली. त्यानी नागपूर अमरावतीच्या तर किलेक वाऱ्या केल्या असतील पण सेवाग्राम व मुंबईच्याहि वाऱ्या केल्या अतिशय मन लावून व अगमेहनत करुन त्यानी कष्ट केले या दोन तरुण वकिलांनीच खरें म्हटल्यास यावलीचा लढा अखेरपर्यंत लढविला कागदपत्रें तयार करून देण्याच्या कामीं त्याना श्री० वसतराव केनकर व श्री० बाबुराव पागारकर या दोन तरुण वकिलानी मदत केली बारअसने आपल्या सदस्यातून वर्गणी करून त्याचा सर्व तागाखर्च व प्रवासखर्च दिला सर्वांचा जिव्हाळा या खटल्यात गुंतला होता

या ठिकाणीं सरकारी वकिलांचाहि निर्देश करणें अवश्य आहे. रावबहादूर सरजामे हे पब्लिक प्रॉसिक्युटर होते व रावबहादूर शिंदोरे हे त्याचे सहाय्यक होते वरिष्ठ कोर्टांत अॅडव्होकेट जनरल खान बहादूर हिदायत उल्ला यांनी सरकार पक्षाचें काम चालविलें डि० म० मेढ्रम यांनी बगमिरेला सामुदायिक दंड बेकायदा होता हें सरकारच्या तर्फे हायकोर्टांत त्यांनीच कबूल केलें सरकारी वकिलांनीहि आरोपींच्या वकिलाशी सहानुभूतीचें वर्तन ठेवलें होतें हें नमूद करणें अवश्य आहे

याशिवाय आणखी एका निःस्वार्थ कार्यकर्त्याचा निर्देश करणें अवश्य आहे हा कार्यकर्ता म्ह० कॅांग्रेसच्या अज्ञातवासात ज्यांनी अमरावतीलील कॅांग्रेस कार्याची धुरा सांभाळली ते श्री० देवकिसनजी क्षवर अमरावतीकर हे होत. कॅांग्रेसचीं सर्वसाधारण कामें तर त्यांनी सांभाळलींच, चळवळीची ज्योत जळती ठेवण्याचाहि त्यांनी सर्वतोपरीनें प्रयत्न केला, पण यावलीच्या खटल्यात त्यांनी अतिशय जिव्हाळ्याने मदत केली. अडीअडचणीला लागणारी द्रव्याची मदत त्यांच्यामुळेच मिळत गेली. प्रारंभापासून अखेरपर्यंत यावलीच्या खटल्याशीं तेहि तादात्म्य झाले आणि आपल्या सामर्थ्यानुसार त्यांनी त्यात हातभार लावला. तसेंच अमरावतीचे श्री० रघुनाथमलजी कोचर एम्. एल् ए यांनीहि स्वत तुरुंगातून सुटून आल्यावर यावलीच्या निराश्रितांना अतिशय मदत केली व नित्येकाचीं घरेंहि बांधून दिलीं

भूमिगत कार्यकर्त्यांना इतक्या अनेक ठिकाणच्या व अनेकविध लोकांची मदत झाली की, विस्तारभयास्तव त्या सर्वांचा नामनिर्देश करणें अशक्य असलें, तरी त्यांच्या आत्मीय साह्याची नोंद करणें अवश्य आहे



## प्रकरण ८ वें

# न्यायमूर्तींचीं निकाल-पत्रें

वस्तुत हीं निकाल पत्रें परिशिष्टात यावयास पाहिजेत परंतु प्रस्तुत प्रकर्णी त्यांचें महत्व लक्षात घेता आणि त्यात ग्रथित झालेल्या विचारसपदेचें मूल्य ध्यानात आणता, त्याना प्रकरण रूपाने मूळ ग्रंथाचाच अंगभूत भाग बनविणें अधिक इष्ट होईल न्या० मू० बोस यांचें सदर्भपत्र पाचव्या प्रकरणात दिलेलें आहे प्रस्तुत प्रकरणांत न्या० मू० नियोगी न्या० मू० पुराणिक व न्या० मू० भिडे याचीं निकालपत्रें देण्यात येत आहेत हिंदी स्वातंत्र्याच्या इतिहासवाङ्मयात या निकाल पत्रांना अतिशय महत्त्वाचें व मानाचें स्थान मिळण्यासारखें आहे

### न्यायमूर्ति नियोगी याचें निकाल पत्रक —

"मुख्य घटनाच्याविषयी वाद नाही त्या घटना अशा—डि० मॅ० व डि० सुप० ऑफ पोलीस यांच्यावर काटानी हल्ला करण्यात आला व पोलीस पार्टीवर दगडफेक करण्यात आली आणि गोळीबार करण्यात आला वादाचे जे मुख्य मुद्दे आहेत, ते असे की, डि० मॅ० व त्याची टोळी याचा बावलीला जाण्यांत हेतु कोणता होता ? तसेंच गांधी-चौकात जमलेल्या लोकाचाहि हेतु कोणता होता ? आणि कोणत्या मूळ घटनेमुळे डि० म० व डि० सुप० ऑफ पोलीस याच्यावरहि हल्ला झाला ?

"डि० मॅ० व त्याच्या बरोबरीची सशस्त्र पोलीस टोळी याचा बावलीला जाण्याचा उद्देश काय ? आरोप-पत्रात म्हटल्याप्रमाणे हा उद्देश 'रेव्हेन्यू अधिकारी व रेस्ट्यातील लोक यांच्यात चागले सबंध प्रस्थापित करणें' हा होता उलट, आरोपींनी आपल्या वारत्यानार्फत एक गुप्त अस सागितलें की, त्यांचा उद्देश मामुदाविरु दंड वसूल करणे हा होता

"शांतता प्रस्थापित करण्यासाठी जिल्ह्यातील खेडे-विभागात पोलीसच्या टोळ्या घेऊन डि० मॅ० फिरत होता, ही गोष्ट खरी आहे पण प्रस्तुत खटल्यातील मुख्य प्रश्न असा आहे की, डि० मॅ० त्या विशिष्ट दिवशीं जो यावलीस गेला तो फक्त राज्यव्यवस्था कायम ठेवण्यासाठीच गेला होता काय? अथवा त्याच दिवशीं सामुदायिक दंडाची वसुली सुलभ व्हावी म्हणून खेड्यातील लोकाना भातिग्रस्त करणें व धाकदपटशा दाखविणें यासाठी गेला होता? **सामुदायिक दंड बसविणें हें बेकायदा होतें, ही गोष्ट सरकारतर्फे मान्यच करण्यांत आली आहे आणि म्हणूनच या प्रकरणाशीं निगडित असलेले सरकारी अधिकारी या मुद्यावर सरळ कबुली देतील अशी अपेक्षा बाळगणें अशक्य आहे.** अर्थात् सरकारी साक्षीदारानी जीं निरनिराळीं वक्तव्यें केलीं आहेत त्यांतील सुसंगतपणा शोधून त्यातून सत्यान्वेपण करणें भाग आहे

"सरकारी साक्षीदार नं० ७ रे० इन्स्पेक्टर म्हणतो कीं, ता० १६-८-१९४२ रोजीं पाच कॉन्स्टेबल्स व एक हेड कॉन्स्टेबल याची तुकडी बरोबर घेऊन २००० रु० सामुदायिक दंड वसूल करण्यासाठी आपण यावलीस गेलों होतों, आणि आपण रामकिसन अवादास याजजवळून ५०० रु० व रामराव टाकोने याज-जवळून २०० रु० मागितले त्यावेळीं रे० इन्स्पेक्टरच्याबरोबर जागल्या (साक्षीदार नं० २), पाटील (साक्षीदार नं० ५), पटवारी (साक्षीदार नं० १६), व इतर काही महारहि होते जागल्याने (साक्षीदार नं० २) म्हटल्याप्रमाणे एका कॉन्स्टेबलजवळ बंदूक होती हेंहि ध्यानात ठेवावयास पाहिजे आता, **सामुदायिक दंडाची ही मागणी सर्वस्वी बेकायदा होती आणि ज्याना तो मागण्यांत आला होता त्यांना, कायद्याप्रमाणे दंड देण्याचा इन्कार करणें, इतकेंच नव्हे तर त्याच्या वसुलीचा प्रतिकार करणें याचा पूर्ण हक्क होता.**

"डि० मॅजिस्ट्रेट (साक्षीदार नं १७) म्हणतो—'सरकारकडून मला मिळालेल्या सूचनाच्या अनुसार ता १६-८-४२ रोजीं मी सामुदायिक दंड बसवूं शकत होतों. म्हणून मीं त्या अधिकारान्वयें रेव्हेन्यू इ० याला २००० रु०

सामुदायिक दंड बसवून वसूल करण्याची आज्ञा दिली होती.' तेव्हा, डि० मॅ० च्या आदेशानुसार रे० इ० यागत होता हें स्पष्ट आहे. ज्या लोकांकडे रे० इ० गेला होता त्याच्याजवळूनच दंडाची रक्कम मागावी अशी प्रत्यक्ष सूचना त्याला मिळाली होती काय? हा प्रश्न येथे गैरलागूं आहे. तसा हुकूम त्याला तहसिलदाकडूनहि कदाचित् मिळाला असेल. अर्थात्, **विशिष्ट माणसाकडून ठराविक रकमांची मागणी करणें हें रे० इ० चें कृत्य कायद्याच्या विरुद्ध होतें यांत शंकाच नाही.**

"परंतु रे० इ० चा हा प्रयत्न विफल झाल्यानतर त्याने ती गोष्ट डि० मॅ० ला सागितली. या मुद्यावर डि० मॅ० म्हणतो—'यावली येथे घडलेल्या घटना जेव्हा ता० १६–८–४२ रोजीं रे० इ० ने मला सांगितल्या तेव्हा मीं त्याला म्हणालों की, परिस्थितीप्रमाणे शक्य तितक्या लौकर आमच्या अधिकारांत असेल ती सर्व मदत आम्ही तुला करूं' असें म्हणून डि० मॅजिस्ट्रेट पुढे म्हणतो—'१८–८–४२ रोजीं यावलीला जाण्यात आमचा उद्देश दड वसूल करण्याचा नव्हता, तर मुख्यत्वेंकरून दंड–वसुलीचा मार्ग सुलभ करून ठेवावा हा होता' यानंतर प्रश्न असा उत्पन्न होतो की, त्याच दिवशीं दड वसूल करण्याचा त्याचा हेतु होता काय? या मुद्यावर इतर साक्षीदारानी दिलेली कबुली विशेष महत्वाची आहे

"सार्जंट क्वीन (साक्षीदार नं० १०) म्हणतो—'यावली गावावर बसविण्यात आलेला सामुदायिक दड वसूल करणें हाच तेथे जाण्यात आमचा उद्देश होता १८ तारखेलाच मला या कामासाठी बोलाविण्यात आलें. त्या दिवशीं सकाळीं डी० एस० पी० आला व त्याने मला सिटी कोतवालीमधून आपल्या बरोबर घेतलें.' परंतु पुढे आपला उद्देश लपविण्याचा प्रयत्न करण्यासाठी तो म्हणतो—"सरकारी अधिकाऱ्याविषयीं वचक उत्पन्न करण्याच्या उद्देशामागे सामुदायिक दंड वसूल करणें सुलभ जावें ही कल्पना होती किंवा नाही, हें मला माहित नाहीं.' पण लगेच पुन्हा तो कबूल करतो—डि० मॅजिस्ट्रेट व डी० एस० पी० याचें जें संभाषण मीं उमरावती व माहोली या दोन्ही ठिकाणीं ऐकलें *त्यावरून माझा असा समज झाला की, दंड वसूल करण्यासाठीच आपण यावलीस*

जात आहोंत ' तो आणखी असेंहि म्हणाला यात शंका नाही की, आपण यावलीस कशाकरिता जात आहोंत हें त्या दोघापैकी कोणींहि मला सांगितलें नव्हतें,' पण या त्याच्या म्हणण्याला काही महत्व नाही

' माहोला पोलीस स्टेशनचा अधिकारी सब् इन्स्पेक्टर (साक्षीदार न० ११) हा त्या (१८-८-४२ रोजींच्या) विकट प्रसगीं डि० मॅजिस्ट्रेटच्या बरोबर होता तो म्हणतो —'अशा तऱ्हेचीं (प्रतिकाराचीं) कृत्यें करण्यात भाग घेणें चागलें नाही हें लोकाना समजून सागण्याकरिता आणि शक्य झाल्यास सामुदायिक दड वसूल करण्याकरिता आम्ही यावलीस जाण्यास निघालों होतों ' एका जखमी माणसाची परीक्ष करण्यासाठीं पाठविलेल्या मागणीपत्रांत त्याने असें म्हटलें आहे की, '१८-८-४२ रोजीं यावलीस जाण्यात डि० मॅजिस्ट्रेटचा हेतु दड वसूल करणें हा होता ' हें असें का म्हटलें याविषयीं खुलासा विचारला असता तो म्हणाला की, '१६-८-४२ रोजीं रे० इ० व पोलीस याना दड वसुलीसाठी यावलीस पाठविण्यात आले होतें आणि पुन्हा १८-८-४२ रोजीं तोच रे० इ० व नायब तहसीलदार हे डि० मॅ० याच्याबरोबर होते यामुळे डि० मॅ० व त्याची टोळी दड वसुलीसाठीच यावलीस गेली असें अनुमान मीं काढलें आणि म्हणून माझा तसा समज मीं सदर्हु पत्रात लिहिला ' डि० मॅ० व डि० सुपरिंटेंडेन्ट ऑफ पोलीस याच्या वैद्यकीय तपासणीसाठी जें मागणी-पत्र पाठविण्यात आलें होतें त्यात सुद्धा यावलीस जाण्यातला उद्देश दंडाची वसुली करणें हा होता, असेंच म्हटल आहे

**"वरील वक्तव्यावरून एकच अप्रतिरुद्ध अनुमान निघूं शकतें व तें असें की, त्याच दिवशीं सामुदायिक दड वसूल करण्यासाठी डि० मॅ० ने यावलीस भेट दिली हाच त्याचा उघड-उघड व मुख्य हेतु होता "**

"(आता दुसरा प्रश्न) गाधी चौकात जमा होण्यामध्ये खेड्यातील लोकाचा हेतु काय होता? या बाबतींत ज्या महत्त्वाच्या गोष्टी विचारात घेणें जरूर आहे, त्या अशा की, ता १५ ८ ४२ रोजीं ज्या लोकांनी मोडतोडीचीं

कृत्यें केलीं होतीं त्यांना पोलीसने (१८-८-४२) पूर्वीच अटक केली होती असें पाटील (सा. नं. ५) याने सांगितलें आहे. जागल्या (सा नं. २) व पाटील (सा. नं. ५) यांच्या जबान्यावरून आणखी हेंहि स्पष्ट झालें आहे की, १६ व १७ ऑगस्टला कोणतींहि वाईट कृत्यें घडलेलीं नव्हतीं. तथापि या दोन्ही दिवशीं गांवकऱ्यांनी सभा केल्या होत्या आणि सामुदायिक दंड द्यावयाचा नाही असा निश्चय केला होता. त्यांनी जर असा निश्चय केला असेल तर सामुदायिक दंड बसवणें हेंच बेकायदा असल्यामुळे तो न देण्याचा निश्चय करण्याचें त्यांचें कृत्य पूर्णपणें न्याय्यच होतें. गांधी चौकांत जमा होण्यांत, आपण दंड देणार नाही हा आपला निश्चय जाहीर करण्याचाच जर त्यांचा हेतु असेल तर त्यांचा तो जमाव गैरकायदा होता असें म्हणतां येणार नाही. याचें कारण उघडच आहे की, दंड देण्याचा इन्कार करणें हें कायद्याला धरूनच होतें."

"बेकायदा रीतीने लादलेला दंड देण्याचें नाकारण्याचा अधिकार जसा प्रत्येक व्यक्तीला होता, तसाच सर्वांनी मिळून एकत्र जमून संयुक्त रीतीने आपण दंड देणार नाही हें जाहीर करण्याचाहि अधिकार त्यांना होताच. लॉ ऑफ कान्स्टीट्यूशन नामक पुस्तकांत पृष्ठ २७१ वर डायसीने म्हटल्याप्रमाणे व्यक्तीला जें व्यक्तिस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य आहे त्याविषयीं कोर्टांनी जो दृष्टिकोन धारण केला आहे त्याहून जमाव करण्याचा अधिकार ही वेगळी बाब नाही; म्हणून एकत्र जमा होण्यांतलें गांवकऱ्यांचें कृत्य हें सर्वस्वी कायदेशीर व विधियुक्त (Constitutional) असेंच होतें. मॉंटेग्यू चेम्सफर्ड रिपोर्टांत (परिच्छेद १२५ पृष्ठ ८१)—'लहान लहान लाचलुचपती व जोरजुलूम' याचा निर्देश करताना असें म्हटलें आहे की—'लोक सहसा तक्रारी करीत नाहीत आणि प्रतिकाराची तकलिफ करण्यापेक्षा मुकाट्याने जुलूम सहन करणेंच ते पसंत करतात.········पण या बाबतींत सार्वत्रिक लोकमताच्या जागृतीशिवाय सर्व साधारण सुधारणा होणार नाहीत.' बेकायदा बसविण्यात आलेल्या सामुदायिक दंडाचा त्या त्या व्यक्तींनी

प्रतिकार करणें आणि त्याच्या विरुद्ध लोकमत खडें करणें,—जसें गाधी चौकातल्या जमावाने करून दाखविलें,—हें वरील उद्‌गारातील शब्द व तात्पर्यार्थ ह्या दोन्हींशी पूर्णपणे सुसगतच होतें ”

“या नतरचा प्रश्न असा आहे की, दगलीला सुरुवात कोठून झाली? भडक्याचें मूळ कारण काय? या दगलींत एका बाजूला डि० मॅ० व त्याची टोळी यांना झालेल्या जखमा आहेत, तर दुसऱ्या बाजूला गावकऱ्यांपैकी ५ मेले, १७ इसमाना गोळ्या लागून जखमा झाल्या व इतर रीतीने जखमा झाल्या साक्षी-पुराव्यावरून हें स्पष्ट दिसतें की, १६ तारखेस गैर कायदा बसविलेला दड वसूल करण्याचा रे० इ० चा प्रयत्न निष्फल झाल्यानतर लवकरच डि० मॅ० यावलीस भेट देईल अशी अपेक्षा होतीच १८ तारखेलाच तो येणार आहे या विषयीं गावकऱ्यांना निश्चित माहिती होती किंवा नाही हा महत्वाचा मुद्दा नाही कारण १६ तारखेनतर कोणत्याहि दिवशीं तो येईल अशी त्याची अपेक्षा होती जेव्हा केव्हा डि० मॅ० व त्याची टोळी येईल, तेव्हा गावकऱ्यांना एकत्र जमविता यावें या हेतूनेच घट्या वाजविण्याची योजना करण्यात आली होती अशा पद्धतीने गावकऱ्याना एकत्र बोलाविलें, एवढ्यानेच केवळ सरकारी दलावर हल्ला करण्याचा त्याचा मनोदय होता हें सिद्ध होऊ शकत नाही चौकात जमा झालेल्या लोकाची सख्या किती होती याविषयीं निरनिराळ्या साक्षीदारानी निरनिराळे अदाज दिले आहेत कित्येकाच्या मतें ही सख्या शमर दीडशे होती तर कित्येकाच्या मतें ५०० ते ७०० होती सार्जंट ग्रीन (सा० नं० १०) याच्या मतें सुमारें शभर लोक जमले असावेत (वस्तुत ) ज्या वेळीं हे **लोक चवताळले तो क्षण जितका महत्त्वाचा आहे तितकें महत्त्व त्यांच्या संख्येला नाही.** डि० मॅ० व त्याची टोळी यानी गावातून गाधी चौकापर्यंत जी चाल केली तिचा मागोवा घेतला असता, लोकांच्या चवताळण्याचा क्षण स्पष्ट होणार आहे (या बाबतींत) डि० मॅ० (सा० न० १७) म्हणतो की, मैदान ओलाडल्यावर पोलीस दल ववायती पद्धतीने नज झालें ही मडळी जेव्हा पाटलाच्या घराजवळ आली, तेव्हा त्याना लोकांचा एक छोटासा जमाव दिसून आला या जमावाशी पाठापाठ करण्यासाठी पोलीस द्रुतगती जोराची चाल (Rapid advance) केली तिचें, डि० मॅ० चे वरील उद्गार म्हणजे

कांहीसे वाङ्मय वर्णन (somewhat picturesque description) होय. अशा रीतीने दसार पट्टीचे लोक गांधी-चौकाकडे जाणाऱ्या गल्लीकडे गेले, त्यातला एकहि गांवकरी परत फिरला नाही व त्याने डि० मॅ० व त्याची टोळी यांच्यावर हल्ला करण्याचा दम भरला नाही, हे विशेषेकरून ध्यानांत ठेवावयास पाहिजे. तसेंच गांधी-चौकांत गांवकरी जमा झाले होते एवढ्यावरूनच केवळ ते हल्ला करण्याच्या मनोवृत्तींत होते असें सुचित करण्यासारखेंहि कांही घडलें नाही. कोणतांहि अपघात (incident) न होतां डि० मॅ० व त्याची टोळी गांधी-चौकांत पोहचूं शकली पण ते जेव्हा एका विशिष्ट ठिकाणीं आले, तेव्हांच भाषण सुरू झालें व आगीची ठिणगी पडली.

"नकी ज्या ठिकाणीं मारामारी सुरू झाली तें ठिकाण आणि जेव्हा गोळीबार सुरू करण्यांत आला ती वेळ व स्थान हीच या खटल्यातील निर्णायक निदर्शकें (Crucial Points) होत. गांधी चौक हा गांवाच्या उत्तरेस आहे चौकाच्या दक्षिणेकडे असलेल्या गल्लींतून चौकांत जातां येते या गल्लीकडे तोंड असलेलें एक देऊळ आहे. या देवळाच्या वायव्येस शाळा आहे या शाळेला बाहेरचें कुंपण असून त्याला गांधी चौकाकडे तोंड असलेला दरवाजा आहे या दरवाजाच्या जवळच बारा फूट उंचीचा एक स्तंभ आहे व त्यावर एक ध्वज उभारलेला आहे. ही जागा नकाशांत P या खुणेने दाखविली आहे व ती गल्लीपासून दूर आहे. गल्लीच्या तोंडापासून ती सुमारें ६५ फूट दूर असावी. ज्या जागेवरून गोळीबार सुरू झाला त्या ठिकाणीं नकाशात तारकाचिन्ह केलेलें असून तें गल्लीच्या मुखापासून सुमारें ३० फूट आंत आहे.

दोन्ही पक्षांत झगड्याची पहिली ठिणगी कशी पडली याविषयी दोन मतें आहेत. फिर्यादीचें म्हणणें असें की, डि० मॅ० व त्याचें दल यांनी चौकांत प्रवेश केला न केला तोंच दगडफेकीला प्रारंभ झाला व डि० मॅ० व डी० एस० पी० यांच्यावर हल्ला करण्यात आला. याच्या उलट, आपण गांधी चौकांत हजर होतों अशी कबुली देणाऱ्या कांही आरोपींचें म्हणणें असें आहे की, सरकारी दलाने प्रथम लाठी हल्ला सुरू केला व झेंडा काढून नेण्याचा प्रयत्न केला. फिर्यादीच्या साक्षीदारांचें, सरकारी दल गांधी चौकांत येताच जमावाने दगडफेक

करण्यास प्रारंभ केला, असें म्हणणें आहे यात शंका नाही पण उलट तपासणीत बाहेर आलेल्या हकीकतीवरून असें दिसतें की, डि० मॅ० व डी० एस्० पी० याच्यावर हल्ला झाल्यानंतर दगडफेक सुरू झाली.

"जागन्या (सा नं २) म्हणतो —'गांधी चौकातील विहिरीजवळ जेव्हा आम्ही पोचलों तेव्हा जमावाने दगडफेकीस प्रारंभ केला, त्यापूर्वी नव्हे' आणि आमची टोळी जेव्हा झेंड्याकडे चाल करू लागली तेव्हा साहेबावर हल्ला झाला ' पाटील (साक्षीदार नं. ५) म्हणतो —'देवळाच्या वायव्येकडील कोपऱ्याच्या थोडेसें पुढे जेव्हा आमचें दल गेलें, तेव्हा जमावाने दगडफेकीस प्रारंभ केला ' रेव्हेन्यू इन्स्पेक्टर (सा. नं. ७) म्हणतो.—'दलाच्या अग्रभागी डि० मॅ० होता. दल शाळेच्या इमारतीच्या दरवाजाजवळ गेलें. तत्काळ गांधी-चौकात जमा झालेल्या लोकानी आम्हांला दगड मारण्यास प्रारंभ केला. ······ दगडफेक व डि० मॅ० व डी० एस्० पी० यांचेवरील (लोकाचा) लाठी हल्ला हीं एकदमच सुरू झालीं ' सार्जंट ब्रीन (सा. नं. १०) म्हणतो—'आम्ही ज्या क्षणीं तेथे पोहचलों त्याक्षणींच आम्हाला घेरण्यात आलें आणि दगड व लाठ्या याचा मारा आमच्यावर सुरू झाला.······शाळेच्या आवाराच्या आग्नेयेकडील कोपऱ्यावर जमाव उभा होता ·········त्याच्या जवळपासच डि० मॅ० व डी० एस्० पी० याना घेरण्यात आलें ' सब इन्स्पेक्टर (सा नं. ११) म्हणतो — 'बार्नीच्या दलाच्या अग्रभागीं असलेलें डि० मॅ० व डी० एस्० पी० शाळेच्या आवाराच्या दरवाजापर्यंत गेले ······शाळेच्या दरवाज्याजवळ झेंडा होता ······ डि० मॅ० व डि० एस्० पी० हे झेंड्याच्या दोन कदम अंतरावर पूर्वेस होते. ······ आम्ही गांधी चौकात पोहचून शाळेच्या इमारतीच्या दरवाज्याजवळ जात नाही, तोंच जमावाने आमच्यावर एकदम हल्ला करण्यास प्रारंभ केला शाळामास्तर (सा० न० १५) यानें एका साहेबाला झेंड्याजवळ पाहिलें. डि० मॅ० (सा० न० १७) म्हणतो—'चौकाच्या दुसऱ्या टोकाजवळ जेव्हा मी होतों, तेव्हा एका दाट जमावानें (Dense crowd) आपणांस घेरलें आहे असें मला आढळून आलें. माझ्यावर हल्ला करण्यांत येत होता.'

वरील वक्तव्यावरून हें स्पष्ट होत आहे की, जेव्हा डि० मॅ० व त्याचें दल शाळेच्या दरवाज्याजवळ झेंडा होता त्या ठिकाणीं गेलें, तेव्हाच जमावाने ~

हालचाल केला ( became Active) आपणांवर हल्ला होण्यापूर्वी लोकांनी दगड फेक केली असें डि० मॅ० सुद्धा म्हणत नाही, हें विशेषेकरून ध्यानांत ठेवण्यासारखें आहे सब इन्स्पेक्टरचा पुरावाहि हाच आशय व्यक्त करतो डि० मॅ० व त्याचें दल गाधी-चौकाकडे जात असताना पाठीमागून कोणींहि दगड मारले नाहीत, असेंच जागल्याचेंहि म्हणणें आहे डि० मॅ० वर हल्ला होण्यापूर्वीच दगडफेक सुरू झाली होती ही गोष्ट दोन महत्त्वाच्या गोष्टींमुळे असिद्ध होत आहे त्या म्हणजे, पोलीस अधिकाऱ्याच्या शरिरावर ज्या ठिकाणीं जखमा झाल्या तो भाग ही एक, आणि जेथून गोळीबार सुरु करण्यात आला तें स्थळ ही दुसरी. पोलीसदलापैकी मार लागलेल्या अनेक इसमातून तिघाची फिर्यादीतर्फे तपासणी करण्यात आली सार्जंट ग्रीन, सब इन्स्पेक्टर व नायब तहसिलदार हे ते तीन इसम होत ( गाधी चौकातून ) माघार घेऊन गर्दींत जात असताना विहिरीजवळ सार्जंट ग्रिन यास मार लागला डि मॅ व डी एस् पी याची सुटका करीत असताना सबइन्स्पेक्टरला मार बसला नायब तहसिलदाराला, आपणांस कोणत्या ठिकाणीं (घटना स्थलाच्या) मार लागला हें सागता आलें नाही त्याला फारच बारीक जखम झाली होती आणि म्हणूनच बहुधा मार लागण्याचें स्थळ ध्यानात ठेवण्याची काळजी त्याने घेतली नसावी पोलीस दलाने गर्दींत माघार घेतल्यावर तारकाचिन्हाकित ( नकाशातील ) स्थळापासून गोळीबार करण्यात आला वरील सर्व प्रमाणावरून हेंच दिसून येत की, शाळेच्या आवाराच्या दरवाजाजवळ डि० मॅ० व डी० एस० पी० जाऊन पोहचेपर्यंत जमावाकडून कोणत्याहि गभीर स्वरूपाचा उपद्रव सुरु करण्यात आला नव्हता म्हणून या ठिकाणीं ज्या घटना घडल्या त्यातच या खटल्यातील खरी ग्यानबाची मेख साठलेली आहे

"जागल्या म्हणतो की, जेथे झेंडा उभा आहे त्या ठिकाणीं डि० मॅ० ची टोळी पोहचल्याबरोबर दगडफेक सुरु झाली व ती चालू असतानाच साहेबांपैकी एकाने ध्वजासुद्धा झेंडा धरला व तो खत करडे ओढला यानतर काय घडलें इकडे आपलें लक्ष नव्हतें असें हा साक्षीदार म्हणतो, पण त्याच क्षणात मोठा जोर देऊन त्याने असेंहि सागण्याचा प्रयत्न केला की, साहेब लोकांवर हल्ला झाल्यानंतरच त्याच्यांपैकी एकाने झेंडा पकडला—'जेव्हा साहेबांपैकी एकाने

झेंडा पकडला तेव्हा एकाएकी लोक जमा झाले आणि त्यांनी लाठ्या व दगड यांच्या साह्याने साहेब लोकांवर हल्ला केला '—ही पोलीससमोर दिलेली त्याचीच जबानी खास दाखविण्यात आली, तेव्हा आपण आठवण विसरलों असें तो म्हणूं लागला सार्जंट क्वीन म्हणतो की, गोळीबार करून जमावाची पांगापांग केल्यानंतर, डि० मॅ०, डी० एस्० पी० व आपण स्वत काही कान्स्टेबल्स बरोबर घेऊन गांधीचौकात परत गेला व काँग्रेसचा झेंडा काढून आणला सब इन्स्पेक्टर, रे० इ०, जागल्या व पाटील यानीहि हुबेहूब अशीच हकीकत सांगितली पण डि० मॅ० च्या जबानींत त्याच्या या हकीकतीला पाठिंबा मिळाला नाही पाटील म्हणतो की, सरकारी दलाने चौकात प्रवेश केल्याबरोबर लगेच लाठ्या व दगड यांचा हल्ला सुरू झाला आणि काही लोकानी डी० एस्० पी० व डि० मॅ० यांना पकडल्याचेंहि आपण पाहिलें'

—'त्याच्यापैकी कोणीतरी, गांधी-चौकात फडकत असलेला खादीचा तिरंगी झेंडा खाली ओढण्याचा प्रयत्न केला पण दंगेखोर लोक मोठ्या त्वेषाने धावून आले व त्यानी झेंडा हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला '—ह्या त्याने पोलीससमोर केलेल्या विधानाकडे जेव्हा पाटलाचें लक्ष वेधण्यात आलें, तेव्हा आपण हें विधान केलें होत व तेंच बरोबर आहे असें त्यास कबूल करावें लागलें त्याच्या तोंडातून आणखी अशीहि कबूली मिळाली की, डी० एस्० पी० हा झेंड्यानजवळ उभा होता आणि जेव्हा तो झेंड्याकडे गेला तेव्हाच त्याला लाठीचे काही तडाखे बसले नायब तहसीलदारानेंहि असच सांगितलें की, जमावानें डि० मॅ० व डी० एस्० पी० याना घेरण्यापूर्वी झेंडा काढून घेण्याचा कोणताहि प्रयत्न करण्यात आला नव्हता पण पोलीससमोर त्याने जें विधान केलें व जें पोलीसच्या केस डायरींत नमूद आहे—आणि हें विधान पाटलाच्या विधानासारखेंच आहे—त्याच्याकडे जेव्हा त्याचें लक्ष वेधण्यात आलें, तेव्हा आपण तसें विधान केलेंच नव्हतें असं तो म्हणूं लागला पाटलासारखेंच विधान रेव्हिन्यू इन्स्पेक्टरनेंहि केलें होतें पण त्यानेहि पुढे तें नाकारलें पण सर्कल इन्स्पेक्टर [सा० दा० न० १३] याने या बाबतींतलें त्याचें म्हणणं खोडून काढलें त्यानेच त्याच्या जबान्या लिहून घेतल्या होत्या एका साक्षीदाराने दुसऱ्यासारखेंच सांगितलं असें जें त्याने लिहून घेतलें त्याचा अर्थ विचारला

असता, सर्कल इन्स्पेक्टरने खुलासा केला की, पहिल्या साक्षीदाराने जें सागितलें तेंच व तसेंच सपूर्णपणें दुसऱ्यानेहि सागितलें यावरून हें स्पष्ट दिसतें की, जागल्याने सागितलेल्या हकीकतीसारखीच हकीकत नायब-तहसिलदार, रेव्हिन्यू इन्स्पेक्टर व पाटील यानाहि [पोलीसमसोर जबानी देताना] सागितली, पण कोर्टासमोर त्यानी पलटी मारली

'(सा० दा० न० ७ च्या जबानीप्रमाणे) जमावाची पागापाग झाल्यानतर, यदा रेव्हिन्यूइन्स्पेक्टर याच्या हातीं असलेल्या प्रत्यक्ष दिसला आरोपी न० ३० राजाराम याने, मार्टिन क्वीन व इतराना झेंडा घेऊन पाटलाच्या घराकडे जाताना पाहिलें तेथेच मि० मॅ० बसलेला होता ही घटना, झेंड्या जवळ झालेल्या पहिल्या मारामारीला असिद्ध करीत नसून उलट सिद्ध करीत आहे पोलास डायरीमध्ये नोंदण्यात आलेल्या जबान्या हेंच दर्शवीत आहेत की, झेंडा खाली ओढण्याचा प्रयत्न करण्यात आला आणि पाटलाने रहस्य स्फोट केलाच आहे (disclosed) की, डी० एस्० पी० झेंड्याजवळ उभा होता यावरून असें अनुमान काढण्यास प्रबळ जागा आहे की, त्यानेच झेंडा खाली ओढण्याचा प्रयत्न केला डा० एस्० पी० ला साक्षीदाराच्या पिंजऱ्यात फिर्यादीने बोलावलें नाही, ही घटना, झेंड्याबाबत फिर्यादीने जी कथा रचली तिच्या दुष्ट कारवाईवर प्रकाश टाकीत आहे, आणि अशा अनुमानास प्रोत्साहन देत आहे की शपथ देऊन विचारलें असतें, तर डी० एस्० पी० नेंहि जागल्याच्या हकीकतीसच पाठिंबा दिला असता फिर्यादीच्या साक्षीदाराना, या घटनेला बगल देण्याचा अथवा त्याचे खुलासे देण्याचा जो प्रयत्न केला तो इतका उथळ आहे की, ध्यानात आल्याविना राहात नाही हा प्रयत्नच कपटताशून्य (disingenious) आहे आणि त्यामुळे, झेंड्याजवळ आल्या बरोबर अधिकाऱ्यानी तो काढून घेण्याचा प्रयत्न केला हें आरोपींचें म्हणणें सत्य असल्याबद्दल भक्कम पाठिंबा मिळत आहे आरोपी नं० ८ गोविंदा, न० १० लक्ष्मण, न० २१ सिताराम, न० ४० मारोती, न० ४१ गणपत व न० ४४ तुळशीराम यांनी, कोर्टानी केलेल्या तपासणींत या घटनेचा निर्देश केला आहे

"तेव्हा, पुराव्यावरून जें स्वाभाविक व संभाव्य अनुमान निघू शकतें तें हेंच की, डिस्ट्रिक्ट सुप० ऑफ पोलीस याने झेंडा काढण्याचा प्रयत्न केला पण त्याच्यावर व डि० मॅ० वर जो अकस्मात हल्ला झाला त्यामुळे हा प्रयत्न विफल झाला व त्याचा परिणाम असा झाला की, जमावाच्या दबावामुळे त्याना पिछेहाट पत्करावी लागली नैतिक विजय मिळविल्याची जी खुशी (sense) गावकऱ्याना झाली होती ती नष्ट करण्यासाठी झेंडा ध्वजस्तंभावरून उपटून आणणेंहि आता त्यांच्या (सरकारी अधिकाऱ्यांच्या) इभ्रतीची गोष्ट (Point of honour) होऊन बसली म्हणून थोड्या वेळाने शांतता प्रस्थापित झाल्यावर पोलीस अधिकारी पुन्हा चौकात गेले व झेंडा काढून घेऊन परत आले

"आता या खटल्यात जे कायद्याचे मुद्दे निघत आहेत त्याचा विचार करू हे मुद्दे दोन आहेत —

(१) डी० मॅ० व डी० एस्० पी० हे बेकायदा सामुदायिक दंड वसूल करण्यास गेले असल्यामुळे त्याच्यावर हल्ला करण्याचें जमावाचें अथवा त्यातील विशिष्ट व्यक्तीचें त कृत्य कायद्यानें समर्थनीय ठरू शकतें काय?

(२) डि० मॅ० व डी० एस्० पी० यांनी जेव्हा झेंडा काढण्याचा प्रयत्न केला तेव्हा लाठ्या व दगड याच्या साह्याने त्याच्यावर बेछूट (indiscriminate) हल्ला करण्याचें त्यांचें कृत्य समर्थनीय आहे काय?

पहिल्या मुद्यासंबंधात बोलताना क्वीन एम्प्रेसविरुद्ध तुळजाराम (I L R B Bom 168) आणि क्वीन एम्प्रेस विरुद्ध जोगेंद्रनाथ मुकर्जी (I L R 24 Cal 321) यांच्या खटल्यांचीं प्रमाणें देण्यात आलीं आहेत आणि असें सांगण्यात आलें आहे की, ज्या अर्थी, डि० मॅ० व त्याची टोळी एका बेकायदा उद्दिष्टाच्या सिद्धीसाठी चालून गेली होती, त्या अर्थी चौकात जमलेल्या गावकऱ्याना शारीरिक बळ वापरूनहि त्यांचा प्रतिकार करण्याचा हक्क होता प्रस्तुत खटल्यातील घटना ध्यानात घेता, उद्धृत केलेली प्रमाणें मोठीशी लागू होण्याजोगी नाहीत त्यांच्यातील कोणाहिजवळून अथवा प्रत्येकाजवळून दंड वसूल करण्यासाठी डि० मॅ०

व त्याचें दल तेथे गेलेलें नव्हतें डि० मॅ० व त्याची टोळी यांचा जमावच बेकायदा असें जरी गृहीत धरलें तरी, हिंसात्मक उपायांनी त्यांची पांगापांग करणें शक्य होतें काय? आपण स्वत अथवा आपली मालमत्ता यांच्या हृक्कावर आक्रमण होण्याचें भय जोंपर्यंत प्रत्यक्ष निर्माण होत नाही, तोंपर्यंत कोण्याहि खाजगी व्यक्तीला हिंसेचा अवलंब करण्याचा अधिकार असू शकत नाही उध्दृत केलेल्या खटल्यावरून फक्त एवढाच सिद्धांत प्रस्थापित करता येईल त्यापेक्षा जास्त त्यापासून निष्पन्न होत नाही रेव्हिन्यू इन्स्पेक्टरच्या आक्रमणाविरुद्ध आपला बचाव करताना रामसिंग किंवा रामराव यांनी जर हीं प्रमाणें उध्दृत केलीं असतीं, तर तीं बरोबर लागू पडलीं असतीं पण गांधी चौकातील लोकांच्या बचावासाठी त्याचा काहीहि उपयोग नाही कारण स्पष्ट आहे त्यांच्यापासून ( गांधी चौकातील लोकांपासून ) कोणतीहि ( दंडाच्या ) रकमेची जबरीनें वसूली करण्यात आलेली नव्हती

" दुसऱ्या मुद्याबाबत **सिद्ध झालेल्या घटनांवरून हें मान्य करणें भाग आहे की, झेंडा खाली ओढण्याच्या प्रयत्नांचा प्रतिकार करण्याचा गांधी चौकांत जमलेल्या लोकांना हक्क होता** झेंडा हा जप्त करण्यात आलेला नव्हता अथवा तो चौकांत फडकविणें बेकायदाहि नव्हतें जोंपर्यंत, डि० मॅ० व त्याची तुकडी येणार आहे हें लक्षात घेऊन मुद्दाम तेथे झेंडा लावण्यांत आला होता हें सिद्ध करणारा पुरावा दाखल करण्यात येत नाही, तोंपर्यंत, सरकारच्या अधिकाराला तुच्छ लेखण्यासाठी झेंड्याचें अस्तित्व कारणीभूत होत होतें असें अनुमान सयुक्तिकरीत्या काढता येणार नाही डि० मॅ० ने झेंड्याकडे कोणत्याहि नजरेनें पाहिलें असो झेंडा उपटण्याचा प्रयत्न का करण्यात आला यांचें कायदेशीर समर्थन फिर्यादीनें करावयास पाहिजे होतें पण असें कायदेशीर समर्थन करण्यात आलेलें नाही

**झेंडा ही खेड्याची दोलत होती आणि तो उपटण्याच्या प्रयत्नाचा गावकऱ्यांनी जो प्रतिकार केला तो पूर्णपणें**

समर्थनीय होता. चोरी, अपहरण किंवा इं० पी० कोडाच्या ' मिश्चीफ सेक्शन. ' ९७ यांच्या ज्या व्याख्या देण्यांत आल्या आहेत त्यांच्या अनुसार ज्याला गुन्हा म्हणतां येईल अशा कोणत्याहि कृतीपासून स्वतःच्या अथवा दुसऱ्या कोण्याहि व्यक्तीच्या मालमत्तेचें संरक्षण करण्याचा प्रत्येक व्यक्तीला अधिकार आहे. ज्याच्याबरोबर सशस्त्र अशा पांच इसमांपेक्षा अधिक इसमांचें बळ आहे अशा माणसानें, गांवकऱ्यांच्या संमतीवाचून त्यांच्या इच्छेविरुद्ध झेंडा काढून नेणें हा अपहारापेक्षाहि अधिक गंभीर स्वरूपाचा गुन्हा होता. झेंड्याचें संरक्षण करतांना व त्याच्या अपहरणाचा प्रतिकार करतांना लोक पूर्णपणे आपल्या अधिकाराच्या कक्षेंतच वागत होते.

"पण असें करताना, डि० मॅ० व डी० एस० पी० याना गभीर स्वरूपाच्या जखमा करून आपल्या अधिकाराच्या उचित मर्यादांचें लानी उत्पन्न केलें प्रत्यक्ष हल्ला करणारे वेगळे व जमाव वेगळा असें पार्थक्य घडलेल्या घटनावरून प्रस्थापित करणें अशक्य आहे कारण, डि० मॅ० व डी० एस० पी० यांचें पोलीसदलाने सरक्षण करण्याचा प्रयत्न केल्यानंतर ते गर्दीत माघार घेऊ लागले तरी देखील पोलीस दलावरील दगडफेक जमावाने चालूच ठेवली म्हणून प्रत्यक्ष गुन्हे ( गंभीर जखमा करण्याचे ) करणारे हे जितके अपराधी ठरतात, तितकाच अपराधी जमावातील प्रत्येक इसम ठरावयास पाहिजे '

"आता शेवटीं एकच प्रश्न उरला तो म्हणजे ( या खटल्यात ) इं० पी० कोडाचीं ३३० व ३३३ हीं कलमें लागू होतात की नाही, हा होय कॉंग्रेस झेंडा हा ( नि० सरकारच्या ) अधिकाराच्या विरोधाचे प्रतीक होता, असें डि० मॅ० च्या दृष्टिकोनातून पाहिलें असता म्हणता येईल तसेंच व्यवस्था प्रस्थापित करण्याचें काम, दगेधोपे थांबविणें व ...

शासन करणे एवढ्यानेच केवळ भागणारें नव्हतें, तर झेंड्याच्या प्रतीकामुळें गुन्हे करण्याची जी मानसिक प्रेरणा मिळत होती ती नष्ट करण्यामाठी झेंडा काढून नेणेंहि आवश्यक होतें असेंहि डि० मॅ० च्या दृष्टिकोनातून पाहणारा म्हणू शकेल पण उलट बाजूने असेंहि म्हणता येईल की, झेंडा उभारणें हें कायद्याने मना करण्यात आलें नव्हते म्हणून तसें नेण्याने कायद्याचा भग झाला असें म्हणता येणार नाही

## ध्वज ही गांवकऱ्यांची संपत्ति होती व तिच्याबाबत गांवकऱ्यांना जे कायदेशीर अधिकार होते त्यांचा आदर करण्याचें बंधन अधिकाऱ्यांनी पाळणें अवश्य होतें

मुहमद चस्रअली विरुद्ध हनुमतसिंग ( बुइक्ली नोट ५ पृ० ५९ ) या खटल्यात वायव्य सरहद्द प्राताच्या हायकोर्टाचे चीफ जस्टिस एर्ज व जस्टिस ब्लेअर यानी असें म्हटलें आहे की, " कलेक्टर किंवा मॅ० या अधिकारावर काम करणाऱ्या गृहस्थानी कायद्यास धरूनच आपलें वर्तन ठेवलें पाहिजे आणि आपण कलेक्टर किंवा मॅजिस्ट्रेट आहोंत एवढ्यावरूनच, कायद्याने जे अधिकार त्याना दिलेले नाहीत तेहि आपणास आहेत असें त्यानी गृहीत धरता कामा नये "

झेंडा काढून नेण्याचा प्रयत्न हा जर गैरकायदा होता, तर तसें करणें कितीहि आवश्यक वाटलें असलें तरी, आपलें कर्तव्य बजावण्यासाठी तसें करणें आवश्यकच होतें, असें सरकारी अधिकाऱ्याना म्हणता येणार नाही, आणि जे सरकारी अधिकारी, ज्यांचा प्रतिकार समर्थनीय ठरेल अशीं बेकायदा कृत्यें करतील, त्यांना इं० पी० को० च्या ३३० व ३३२ कलमांच्या आड लपून स्वत:चें संरक्षण करतां येणार नाही. ( प्रमाण–नेहरू वि० बादशहा ( १९३२ ) ३४ कि० एल्० जे० ४६० ) म्हणून ३३२ व ३३३ कलमाखाली ज्याच्यावर आरोप ठेवण्यात आले आहेत ते दोषमुक्त ठरले पाहिजेत आणि त्याच्या शिक्षा रद्द केल्या पाहिजेत

परंतु इं० पी० को० चीं १४७, ३२४, व ३२५ हीं कलमें १४९ कलमा-बरोबर वाचून त्याच्याअन्वयें अपराध शाबीत करून ज्या शिक्षा देण्यांत आल्या असतील त्या मात्र कायम राहतील

**झेंडा काढून नेण्याचा ( सरकारी अधिकाऱ्यांनी ) जो अप्रस्तुत प्रयत्न केला, त्यामुळे लोकांचा झालेला प्रक्षोभ हेंच या दुर्दैवी घटनेचें कारण होतें हें लक्षांत घेऊनच शिक्षा देण्यांत आल्या पाहिजेत.** शिक्षा कमी करण्यासाठी, माझ्या मतें, हें सबळ कारण आहे. अपील करणारे आरोपी, अगोदरच दोन वर्षे झालीं, तुरुंगात आहेत. म्हणून भोगली एवढी शिक्षा पुरे झाली असें म्हणूनहि, माझ्या मतें, न्यायाचा उद्देश सिद्ध होणार आहे.

सही—
**एम्. वी. नियोगी, जज्ज.**
२९-१२-१९४४

---

## न्यायमूर्ति पुराणिक यांचें निकालपत्र

*"माननीय चीफ् जस्टिस व न्या० मू० नियोगी या दोघांचींहि निकाल-पत्रें मला वाचण्यास मिळालीं. खटल्यातील एकूण घटनाचा व त्याबाबत करण्यात आलेल्या भाषणाचा काळजीपूर्वक विचार करता, माझें मत न्या० मू० नियोगी याच्याप्रमाणेच बनलें आहे.*

"वरील दोघानींहि आपापल्या निकालपत्रकात खटल्यातील घटनाची मीमांसा केली तिचीच पुनरावृत्ति करण्याची माझी इच्छा नाही. **ज्या दिवशीं ही घटना घडली त्या दिवशीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व डिस्ट्रिक्ट सुप० ऑफ पोलीस यांच्या नेतृत्वाखाली जी टोळी यावलीस गेली होती तिनें गांवांत प्रवेश केल्यापासूनच उद्दामपणाची व**

चढाईची मनोवृत्ति धारण केली होती, असें माझें मत बनलें आहे.

"कायदा व सुव्यवस्था याविषयीचा आदर प्रस्थापित करण्यासाठी ही टोळी यावलीस गेली होती असें फिर्यादीपक्षाचें म्हणणें आहे असें जर होतें, तर गांवांत प्रवेश केल्यानंतर गांवकऱ्यांकडून कोणताहि विरोध झालेला नसतांना आणि त्यांच्या गांवांत प्रवेश करण्यालाच गांवकऱ्यांनी विरोध केला किंवा प्रतिबंध केला हें प्रदर्शित करणारें कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नसताना, प्रारंभापासूनच त्यांनी जो हलका लाठीहल्ला केला त्याचें कोणत्याहि प्रकारें समर्थन करतां येणार नाही गांवाच्या सीमेवर जे काही गांवकरी जमा झाले होते ते कोणताहि प्रतिकार न करता गाधीचौकात पळून गेले होते, आणि गांधी चौकातदेखील, जोंपर्यंत या टोळीपैकीच एकाने, झेंडा ज्यावर उभारलेला होता तो ध्वजस्तंभ, धरुन उपटण्याचा प्रयत्न केला नाही, तोंपर्यंत काहीहि वेडेंवाकडें घडलें नाही

"कागदोपत्रीं दाखल असलेल्या पुराव्याने माझ्या मनावर असा ठसा उमटविला आहे की, झेंडा काढून नेण्यासाठी किंवा फाडून टाकण्यासाठी ध्वजस्तंभ धरून वाकविण्यांत आला त्यानंतरच तावडतोब गांवकऱ्यानी हल्ला केला, नंतरच दगडफेक करण्यात आली व अधिकाऱ्यांनाहि गचांड्या मारण्यांत आल्या, (roughly handled), लाठ्यांचाहि उपयोग करण्यात आला. परंतु या टोळीच्या लोकांना झालेल्या जखमाचें स्वरूप आणि ज्या सुलभतेने त्यांची सुटका करण्यात आली ती (या दोन्ही गोष्टी) लक्षात घेतां, मला वाटतें, माझ्या समोरील आरोपी ज्यांत समाविष्ट होते तो गांवकऱ्यांचा जमाव, झेंडा व त्याचा स्तंभ याचें अपहरण करण्याच्या कामीं डि० मॅं० च्या टोळीला प्रतिबंध करण्याच्या हेतूनेच प्रेरित झालेला होता. असे करताना त्यांनी केली इतकी हिंसा करण्याची आवश्यकता नव्हती शिवाय टोळीने भापार

घेतल्यानंतर तिचा आरोपींनी केलेला पाठलागहि अनावश्यक होता तसेंच टोळी माघार घेत असतांना जी दगडफेक करण्यात आली तिचेंहि समर्थन करता येणार नाही (डि० मॅ० च्या) **टोळीनें माघार घेत असतांना गोळी-बार केला व त्यांत कांहीं मारले गेले व कित्येक जखमी झाले. परिणामतः गांवकऱ्यांची पांगापांग झाली. आता आपला कोणीहि पाठलाग करीत नाही, असें पाहून डि० मॅ० च्या टोळीनें त्याचवेळीं गांव सोडून जावयास पाहिजे होतें. पण फिर्यादीनें दिलेल्या पुराव्यावरूनच असें दिसतें की, टोळींतले कांही लोक (गार्धीचौकात) परत गेले व त्यांनी झेंडा काढून आणला. यामुळेच पुढील दंगल घडून आली.**

"आपला झेंडा परत मिळावा अशी गावकऱ्याची इच्छा होती म्हणून निरनिराळ्या दिशानी ते एकत्र जमू लागले व दगडफेक करू लागले डि० मॅ० व त्याचे साथीदार मागच्या दाराने पळून गेले, आणि याच्याहि नतर काही गावकरी जेव्हा त्याचा पाठलाग करण्याचें धाडस करू लागले, तेव्हा गोळीबार करण्यात आला व त्यात एक गावकरी मेला यानंतर डि० मॅ० च्या टोळीने गाव सोडलें अशा रीतीने या दिवसाची ही दुर्दैवी घटना समाप्त झाली

आपल्या ध्वजस्तंभाची व ध्वजाची मोडतोड करणाऱ्याना प्रतिबंध करण्याचें गावकऱ्याचें कृत्य समर्थनीय असलें, तरी आत्म-सरक्षणाच्या अधिकाराच्या मर्यादाचा त्यांनी भग केला होता, हें मीं वर दाखविलेंच आहे. म्हणून ते अपराधी आहेत

**दोनदा करण्यांत आलेला गोळीबार समर्थनीय होता काय, अथवा डि० मॅ० च्या टोळीनें ज्या मर्यादेपर्यंत जीं कृत्यें केलीं तीं त्या मर्यादेचीं त्यांचीं कृत्यें समर्थनीय होतीं काय, यांचा निर्णय माझ्याकडून मागण्यांत आलेला नाही.** म्हणून, न्या मू. नियोगी याच्याशीं सहमत होऊन मीहि आरोपींना १४७, ३२४ व ३२५ हीं इ पी को. चीं कलम १४९ कलमाबरोबर वाचून त्याच्याअन्वयें

झालेल्या गुन्ह्यांबद्दल अपराधी ठरविता आणि इं पी को, च्या ३३२ व ३३३ कलमांप्रमाणे त्यांनी गुन्हा केला आहे असे मला वाटत नाही

"या दुर्दैवी घटनेत यावलीचे ५ इसम मेले व शिपायांना जखमा झाल्या आणि शिवाय त्याच्यांतरी २८ इसम आज सुमारें दोन वर्षे झालीं तुरुंगांत खितपत आहेत या सर्व गोष्टी लक्षांत घेतां न्या० मु० नियोगी यांच्या प्रमाणेंच माझाहि असें मत आहे की, त्यांना झाली इतकी शिक्षा पुरे झाली असें समजून सोडून देण्यांत यावें ता० २९-१२-१९४४

सही

डब्ल्यू आर् पुराणिक, जज

---

## चीफ जस्टिस् ग्रिल याचें निकाल पत्र

' हें अपील एरव्ही एका जजापुढे चालले असते व तसे तें न्या० मू० बोस यांच्या पुढे गेलेहि होतें परंतु त्यांना असें वाटलें की, त्यांत उत्पन्न झालेले प्रश्न गंभीर स्वरूपाचे व दूरगामी महत्वाचे आहेत, म्हणून हाय कोर्टाचा नियम १ (१) च्या अन्वयें, हें खटला पुन्हबचानेच ऐकणे चांगले, असें म्हणून त्यांनी तो आमच्याकडे पाठविला आहे

"ता० १८-९ १९४२ रोजीं मौजा यावली जि० अमरावती येथें डि० मॅ० व डि० सुप० ऑफ पोलीस यांच्या नेतृत्वाखाली एक सार्जंट, २ हेड कान्स्टेबल्स व ८ कान्स्टेबल्स यांचे जे एक पथक गेले होतें त्यावर झालेल्या हल्ल्याबाबत इं० पी० कोडाच्या निरनिराळ्या कलमांन्वये, अपील करणारांना शिक्षा झालेल्या आहेत या पथकाबरोबर एक सब इन्स्पेक्टर ऑफ पोलीस, एक नायब तहसिलदार एक रे० इ० आणि एक यावलीचा पटवारी, पाटील व आणखी इतकी मंडळीहि होती त्यांच्यावर झालेल्या हल्ल्यांत त्यांना लाठ्या व दगड यांचा मार लागला आणि डि० मॅ० च्या डोक्यांत हाड तुटलें म्हणजे

त्याला गंभीर स्वरूपाची इजा झाली होती. या परिस्थितींत गोळीबार करणें आवश्यक झालें. गेलेल्या पथकांत दोघा कॉन्स्टेबल्सजवळ बंदुकी होत्या व सार्जंटजवळ रिव्हॉल्व्हर होतें. अनेक वेळा गोळ्या झाडण्यांत आल्या आणि अखेरीस शेजारील पाटलाच्या घरांत माघार घेतल्यानंतर, पथकानें खेडेंच सोडून जाण्याचें ठरविलें. आणि ते गावाच्या बाहेर उघड्या शेतांतून माघार घेत असतांना, ह्या वेळपावेतों अधिकच फुगलेल्या जमावानें आपली दहशत-वादी मनोवृत्ति चालूच ठेवली. पुन्हा गोळीबार करावा लागला. प्राय अखेरचें काडतुसहि खलास झालें. सार्जंट ग्रीन यानें थंड डोक्यानें व धैर्यानें एका कॉन्स्टेबलजवळून बंदूक घेऊन-खत त्याजवळचीं काडतुसें संपलीं असल्यामुळे-जमावाचे दोन पुढारी जर जमिनीवर लोळविले नसते, तर संभव असा होता कीं, सर्वच्या सर्व पथक घेरलें गेलें असतें व ठार मारलें गेलें असतं."[1]

यानंतर २ ऱ्या परिच्छेदांत यावलीची भौगोलिक माहिती व १५ ऑगस्टला झालेल्या सत्याग्रहाची व मोडतोडीची माहिती देऊन डि० मॅ० ने २००० रु० सामुदायिक दंड यावलीवर बसविण्याचा हुकूम रे० इन्स्पेक्टरला कसा दिला, गांवकरी लोकांनी दंड देण्याचें नाकारल्याची बातमी डि० मॅ० ला कशी कळली व त्यानें रे० इ० ला सर्व प्रकारची मदत करण्याचें आश्वासन कसें दिलें, आणि अखेरीस १८-८-४२ ला डि० मॅ० व त्याचें पथक यावलीस कसें गेलें इ० हकीगत निवेदन करून पुढे चीफ् जस्टिस ग्रिल आपल्या निकाल-पत्रांत लिहितात—"गांवात प्रवेश केल्यावर पोलीस कवायती-पद्धतीनें सज्ज झाले व गांधी चौकाकडे जाऊ लागले. गांधी चौकाचा मार्ग जेथे पूर्वेकडून पश्चिमेकडे जातांना एकदम उत्तरेकडे वळतो तेथें १० किंवा १५ लोक जमा झालेले होते. फिर्यादीचें म्हणणें असें की, तुम्ही येथून निघून जा असें त्यांना विनंती करण्यांत आली होती, तरी ते लोक तेथून हालले नाहींत. नंतर तो पोलीसदल पुढे चाल करूं लागलें तेव्हां त्यांतील बहुतेक लोक गांधीचौकाकडे जाणाऱ्या गल्लींत शिरले व त्यांच्या पाठोपाठ पोलीसहि गेले. गांधी चौकाच्या उत्तरेकडील टोकाला लोकांचा जमाव जमलेला होता. कांहीं म्हणतात त्यांची संख्या १५० होती, तिसऱ्याच्या मतें तीं ५००-६०० होती. फिर्यादीचें म्हणणें असें का, या लोकांच्या पाठोपाठ हें सरकारी-दल जेव्हां गांधीचौकांत शिरलें,

तेव्हा त्याच्यावर दगडाचा वर्षाव सुरु झाला आणि जमावाने त्याला घेरुन त्याच्यावर हल्ला केला "

"अपील करणाराचे जें म्हणणें आमच्यासमोर सागण्यात आलें तें असें की, पोलीसदल लोकाचा पाठलाग करीत जें आलें त्याने गाधीचौकातील जमावाला एकदम तडाखेबद मारपीट सुरु केली व म्हणून सरक्षणासाठी लोकाना आपला बचाव करणें भाग पडलें डि० मॅ० व डी० एस्० पी० हे आपल्या दलाच्या काहीसे पुढे होते त्याना घेरुन लोकानी वेढा दिला, पण शेवटीं मागे असणाऱ्या अधिकाऱ्यानी त्यांची सुटका केली ही जी दगल उडाली तींत दलातील लोकाना मार लागला ते कसेबसे गल्लीत परत फिरले लोकानीं आपल्या अत्याचारी मनोवृत्तीची पर्वा टिली पट्ट दिली नाही, म्हणून गल्लीत काही अतर मागे गेल्यानतर गोळीबार सुरु करण्यात आला गल्लीतून माघार घेत असताना मधून मधून गोळ्या झाडण्यात येत होत्या·· ·· अखेरीस दल पाटलाच्या घरात शिरलें, आणि जमावाची अखड विरोधाची वृत्ति पाहून त्याने माघार घेण्याचें ठरविलें दुसऱ्या एका दसनाच्या घरातून त्याने आपला मार्ग काढला जमावाने हें पाहिलें व तो पाठलाग करु लागला दल पळू लागलें नाल्याच्या परतीरावर रामकिसन मारवाड्याच्या कोठ्यात तें थाबलें बाटाघाटींचा काहीच उपयोग नाही हें पाहून त्याने माघार चालूच ठेवली अखेरीस सार्जंट ब्रीनच्या निशाणबाजीनेच हा हल्ला थाबविला "

आपल्या निकालपत्राच्या तिसऱ्या परिच्छेदात फिर्यादी व आरोपी यानी आपापली बाजू माडताना उपस्थित केलेल्या मुद्याचें निवेदन करुन ४ थ्या परिच्छेदात चीफ् जस्टिस मिल म्हणतात-"याप्रमाणे दोन्ही पक्षानी आपापली आमच्या समोर माडली बचावाची रूपरेषा सर्वसाधारण (general) ३८ आरोपीपैकी, प्रत्येकाची अशी स्वतत्र बाजू माडण्यात आली नाही. सामान्यतः असें म्हणण्यात आलें आहे की, बचावाची हकीगत जर आम्हाला मान्य होत नसेल, तर शिक्षा तरी कमी करण्यात याव्या "

५ व्या परिच्छेदात चीफ जस्टिस म्हणतात—"आपली कर्तव्यें पालन करण्याच्या बुद्धीनेच डि० मॅ० व डि० सुप० ऑफ पोलीस वागले की, कायद्याची

ज्याना मुळीच मान्यता नव्हती असें काहीतरी कृत्य करण्यासाठी ते यावलीस गेले होते, हा प्रश्न प्रथम निकालात काढला पाहिजे" असा प्रश्न उपस्थित करून ६ व्या परिच्छेदात ते म्हणतात, "दंड वसूल करण्यास गेले असताना १६ ता० म रे० इ० चा लोकानी विरोध केला होता ही, गोष्ट डि० मॅ० व त्याच्या दफ्तरीतल इतर सर्व लोकाना माहित होती यात शंका नाही रे० इ० चे, दंड वसुलाचा प्रयत्न करणें हें, कृत्य गैरकायदेशीर होतें, हें विधान ॲड० जनरल यांनीहि मान्य केलेंच आहे १६ ता ला लोकानी जो प्रतिकार केला त्याबद्दल शिक्षा होऊं शकत नाही हेंहि त्यानी मान्य केलें"

यानतर यावलीस जाण्यात सरकारी अधिकाऱ्याचा उद्देश काय होता याविषयी डि० मॅ०, नायब तहसिलदार व सार्जंट ग्रीन याच्या जबान्या उद्धृत करून चाफ जस्टिस म्हणतात—"जेव्हा उठावण्या होतात व सामुदायिकरीत्या लोक कायदा मानीनासे होतात, तेव्हा डि० मॅ० चें मुख्य कर्तव्य व्यवस्था प्रस्थापित करणें (restore order) हें असतें. याच उद्देशाने पोलीसपथकें बरोबर घेऊन या काळात तो जिल्हाभर फिरत होता याच उद्देशाने व हें कर्तव्य बजावण्यासाठीच १५ तारखेला मोर्शीस व १६ तारखेला नादगावपेठ व वेनोडा येथे तो गेला होता यावली हेंच असें ठिकाण आहे की, तेथे तो सशस्त्र दल बरोबर घेऊन गेला ह्या आरोपींच्या विद्वान वकिलाच्या म्हणण्यांत तथ्य दिसत नाही.** काही वेळा फक्त पोलिसाचीं तर काही वेळा फौजी सैनिकाचीं सशस्त्र दलें, ज्या ठिकाणीं दंगे धोपे व मोडतोडीचे प्रकार झाले, तेथे गेलेलीं होतीं व्यवस्था प्रस्थापित करणें व अजून सरकारी सत्ता देशांत कायम आहे हें दाखवून देणें आणि सरकारी सत्ता कार्यक्षम नाही हा दंगेखोराचा जो भ्रमन झाला होता तो नाहीसा करणें या उद्देशानेच हीं दलें ठिकठिकाणीं जात असत यावलीची भेटहि या नियमास अपवाद नव्हती यावलीच्या लोकानी माहोला पो० स्टेशनवर हल्ला केला होता त्या बाबतींत काही लोकांना गिरफ्तारहि करण्यात आलं होत, मुख्य रस्त्यावरील तारेचे खांब त्यानी तोडले होते शिवाय त्याना आपल्या गावांतील सरकारी मालमत्तेवर हल्ला चढवून तिचीहि नासधूस केली

होती दोन दिवसांपूर्वी त्या खेड्यावर सामुदायिक दंड बसविलेला असो अथवा नसो, त्याला भेट देणें व सरकारी अधिकार प्रस्थापित करून सरकारी सत्तेच्या बाबतींतला विश्वासहि प्रस्थापित करणें हें डि० मॅ० चें कर्तव्य होतें. तो जर यावलीस गेला नसता, तर या बाबतींत कर्तव्यच्युकारपणा त्याच्या पदरीं आला असता. तो व डि० सुप० ऑफ पोलीस हे यावलीस गेले होते, हें अगदी ठाम आहे. म्हणून सामुदायिक दंड—कायदेशीर अथवा बेकायदेशीर—बसविण्याचा हुकूम त्याने दिला होता हा मुद्दा या विशिष्ट बाबतींत फारच अप्रस्तुत आहे."

७ व्या परिच्छेदात सामुदायिक दंड बसविण्याचा अधिकार डि० मॅ० मेल्ड्रम यास होता कीं नाही, याची चर्चा सुरु करून चीफ् जस्टिस म्हणतात—
"मि० मेल्ड्रम यांनी आपल्या जबानींत सांगितलें आहे कीं, 'प्रांतिक सरकारने दिलेल्या अधिकारान्वयेंच आपण सामुदायिक दंड बसविला. ता. १२ ते १५ ऑगस्टच्या दरम्यान त्या बाबतींतल्या सूचना प्रांतिक सरकारकडून टेलिफोनवर मिळाल्या होत्या; कोणत्या खेड्यावर किती सामुदायिक दंड बसवावयाचा हें तारतम्य पाहून ठरविण्याचा अधिकारहि सरकारने आपणा सच दिला होता '—मि० मेल्ड्रमची ही जबानी खोटी आहे असा त्याजवर आरोप करण्यात आला आहे असें सांगण्यात आलें आहे की, त्याला सरकार कडून कोणताच अधिकार देण्यात आला नव्हता, केवळ स्वतःच्या प्रेरणेनेच वागून त्याने दंड बसविला, आणि प्रारंभापासून अखेरपर्यंत तो स्वतःच्याच जबाबदारीवर वागत होता सरकारचे सर्व अधिकार आपणासच आहेत असें तो समजू लागला आपण बेकायदा दंड बसवीत आहोंत हें कळत असून तो बेकायदा दंड बसवीत होता, आणि लोकांनी तो दिला नाही, तेव्हा अत्याचारी व बेकायदा उपायांचा अवलंब करून आपला अधिकार तो प्रस्थापित करू पाहत होता "

"या मुद्याला उत्तर देतांना विद्वान ॲड० जनरल यांनी सांगितलें की, सरकार व मेल्ड्रम यांच्या दरम्यान टेलिफोनने

बातचीत झाल्याचा सुगावा (trace) सरकारला लागत नाही. पुढे तर त्यांनी निश्चितपणे असें सांगितलें की, या प्रश्नाबाबत चीफ सेक्रेटरीनें मि० मेल्ड्रम यांना कोणताहि फोन केला नव्हता. आमच्या मनावर असा ठसा उमटला आहे की, 'चीफ सेक्रेटरी' या शब्दावर जोर देण्यांत आला होता. पण सरकारजवळ कांही चीफ सेक्रेटरी हा एकच ऑफिसर नाही."

८ व्या परिच्छेदात, मि० मेल्ड्रम यानी बसविलेला सामुदायिक दंड बेकायदा होता ही गोष्ट सरकारतर्फे मान्य करण्यात आली याचा निर्देश करून चीफ् जस्टिस म्हणतो—"मि० मेल्ड्रम यांनी शपथेवर केलेलें विधान खोटें आहे असें ज्याअर्थी म्हणण्यांत आलें आहे, त्याअर्थी आम्हांलाहि हें नमूद करणें कर्तव्य वाटतें की, मि० मेल्ड्रम-सारखा ज्युनिअर डि० मॅ०, १९४२ च्या नं० २० च्या ऑर्डिनन्सची, सामुदायिक दंड बसविण्याच्या पद्धतीच्या बाबतींत, अवज्ञा करील आणि प्रांतिक सरकारचे सर्व अधिकार आपणांसच आहेत असें समजून वागेल, हें आम्हांलाहि संभवनीय वाटत नाही. १२ सप्टेंबर १९४२ ला (No X. L. XI. of 1942) हा ऑर्डिनन्स काढून वरील २० नंबरच्या ऑर्डिनन्सेमध्ये सुधारणा करण्यात आली. त्यात प्रांतिक सरकारने आपले अधिकार कोणाला द्यावेत हें सांगण्यात आलें व ऑफीशियल गॅझेटमध्ये आगाऊ प्रसिद्धीच्या आवश्यकतेविषयींच्या कलमातहि बदल करण्यात आला. या सुधारणा होणारच हें ध्यानात घेऊन, प्रांतिक सरकारनेच हुकूम दिले असले पाहिजेत; मि० मेल्ड्रम यांच्या मेंदूतून सामुदायिक दंडाची कल्पना निघाली नाही, याविषयी आम्हांला संदेह नाही. म्हणून त्यांची जबानी सत्य आहे असें आम्ही समजतों." -

[1] यानंतर ९ व्या परिच्छेदात, आपण अमक्याच दिवशीं बावलीस येऊं असें मि० मेल्ड्रम यानी सांगितलें नव्हतें म्हणून १९ तारखेच्या लोकांच्या प्रतिकाराचा बदला घेऊन दहशत निर्माण करणें हा त्याचा बावलीस जाण्याचा

हेतु नव्हता, असें प्रस्थापित करून चीफ् जस्टिस घटा वाजविण्याच्या घटनेकडे वळले नंतर ता० १७ व १८ ला गावात झालेल्या सभांचा त्यानी निर्देश केला पुढे रे० इ० ता० १६ ला गांवातून निघून गेल्यावर लगेच गावकऱ्यांनी गाधीचौकात जी एक सभा घेतली होती तिचा विशेष निर्देश करून, शाळा मास्तरांच्या जबानीच्या आधारें चीफ् जस्टिस लिहितात.-"या सभेंत सांगण्यात आलें की, आज जरी दंड वसूल करण्यात सरकारला यश आलें नाही, तरी सरकारी अधिकारी लौकरच दंडवसूलीसाठी आल्याशिवाय राहणार नाहीत ज्याच्याजवळ ज्वारी आहे त्याची ज्वारी ते जप्त करतील म्हणून ज्वारी मजुराना वाटून देणेंच इष्ट होईल · ··· **या सभा ही केवळ एक लोककल्याणाची बाब होती व श्रीमंतांच्या कोठ्यांतली ज्वारी गरिबांना वाटणें एवढाच त्यांचा उद्देश होता असें मानण्यास मी तयार नाहीं.**" घंटी वाजल्याबरोबर लोकांनी आपापली कामें सोडून एकत्र जमावें व प्रतिकारास सज्ज व्हावें, म्हणून ज्वारी वाटण्यात आली होता असें म्हणून गार्धीचौकात १८ ता० ला जमलेला जमाव हा मुळातच 'भयानक व साशंकित मनोवृत्तीचा' (in a dangerous and apprehensive mood) होता, ही गोष्ट १० व्या परिच्छेदाच्या प्रारंभीच चीफ् जस्टिस यानी नमूद केली

१५ ता० पासून घडलेल्या मोडतोडींच्या प्रतिकाराच्या घटनाचा पुन्हा एकदा निर्देश करून चीफ् जस्टिस म्हणतात—"**जमाव जीं कृत्यें करतो त्यावरूनच त्याचे हेतु ठरवावयाचे असतात, आणि जमाव प्रथम जमला तेव्हा तो बेकायदा नव्हता असें म्हणणें जरी शक्य असलें, तरी जेव्हा त्यानें पोलीसदलावर दगडफेक केली तेव्हा तो बेकायदा बनला होता** आणि पोलीसदलाने चौकात प्रवेश करताक्षणींच त्याच्यावर दगडफेक सुरू झाली, असा पुरावा आहे **बेकायदेपणाचीं बीजें ज्यांत मुळांतच भरून होतीं तो जमाव प्रत्यक्ष बेकायदा बनण्यास फारच अल्प कारण पुरतें.**"

११ व्या परिच्छेदांत, डि० मॅ० मि० मेल्ड्रम यानी ५ सप्टेंबरला जें प्रेस कॅम्युनिक वार्ताहराना दिलें त्याचा व त्यातील विधाना वरून बुद्धिपुरःसर

असत्य ठरण्यात आली होती असें म्हणून त्याचें वाभाडे आरोपींच्या वकिलांनी काढले, या गोष्टींचा निर्देश करून, **गांवांत शिरल्याबरोबर पोलीसांनी जो पहिला लाठीहल्ला केला त्याविषयीं चीफ् जस्टिस म्हणतात "या बाबतींतल्या प्रत्यक्ष घटनांचें स्वरूप फिर्यादीच्या साक्षीदारांनीं सौम्य करून दाखविलें, हें मला मान्य आहे. जमावानें निघून जावें असा औपचारिक हुकूम देण्यांत आला नव्हता, हेंहि मला मान्य आहे. पण कोणत्या रीतीनें कां होईना त्यांनी निघून जावें याची सूचना जमावाला देण्यात आली होती हेंहि स्पष्ट आहे, आणि हेंहि स्पष्ट आहे की, लोक जेव्हा जाण्यास निघाले, तेव्हा त्यातील एकाने त्यांना जाऊं नका म्हणून सांगितलें. म्हणून जमावाचा पाठलाग करण्यासाठीं करण्यात आलेला प्रयत्न समर्थनीय ठरतो."**

लष्करी पद्धतीनें 'त्वरेनें चाल करून जाणें' यात व 'हल्ला लाठी हल्ला' यातील फरक ओळखणें कठीण आहे—"हे लक्षात घेता प्रेम कम्युनिटामध्ये मि० मेल्बूर्न यानी (याबाबत) केलेलें विधान खरें आहे"—असें पुढे चीफ् जस्टिस यानी म्हटलं तें पुढे म्हणतात—"मी अशा निर्णयाप्रत पोहचलों आहे की, जमावानें निघून जावें असें सांगितल्यावर, जेव्हा तो गेला नाही, तेव्हा पोलीसपार्टी त्याच्यावर चालून गेली त्यावेळीं त्यातील बरेचसे लोक गल्लीतून चौराकडे पळाले आणि पोलीसहि त्याचा पाठलाग करीत चौरात व चौरातून गल्लीकडे गेले अशा तऱ्हेने **या लहानशा जमावाचा चोकापर्यंत पोलिसांनी पाठलाग केला नसता तर तें अधिक शहाणपणाचें झालें असतें, असें पुढील घटना लक्षांत घेता म्हणतां येईल त्यांनी केलेला हा पाठलाग शहाणपणाचा नसेल पण बेकायदा खास नव्हता"**

अशा रीतीनें घटनाक्रम गांधीचौरापर्यंत आणून सोडल्यावर चीफ् जस्टिस आपल्या निकालपत्राच्या १२ व्या परिच्छेदांत,—"आपल्या मानबांधवाचा पाठलाग करीत पोलीस चौकात येत आहेत असें पाहून (तैथाल)

जमावाने त्याच्यावर दगड फेकून मारण्यास प्रारंभ केला, आणि ते त्यांच्याजवळ जाऊन भिडले व लाठ्यांनी मारण्यासहि त्यांनी सुरवात केली अशा स्थितीत कॉंग्रेस-ध्वजाच्यामागे जमाव शांतपणें उभा होता व पोलीस दलानेच त्याच्यावर तडाखेबंद लाठीहल्ला सुरू केला व जमावाने केवळ आत्मरक्षणार्थ प्रतिकार केला, हें चित्र मी मान्य करू शकत नाहीं ”

पुढे १३ व्या परिच्छेदांत, नक्की कोणत्या स्थळीं पोलीस पोहचले असताना दगडफेक सुरु झाली याविषयींच्या जबान्यांत एकमत आढळेल अशी अपेक्षा करणे योग्य नाहीं असें म्हणून चीफ् जस्टिस म्हणतात—“मनुष्यस्वभाव ध्यानात घेता असेंच म्हणावें लागेल की, पोलीसदलाने चौकात प्रवेश करतांच दगडफेक सुरू झाली ” गावांचौक, त्याच्या चतुःसीमा, शाळा, झेंडा, देऊळ, विहीर इ० स्थळें व त्यांचीं अंतरें याविषयीं वर्णन करून चीफ् जस्टिस म्हणतात– “हा चौक म्हणजे काही मोठी जागा नव्हती उत्तरेकडून दक्षिणेपर्यंत त्याची लांबी ८० फुटाहून अधिक भरणार नाही” दगडफेक केव्हा व कशी सुरु झाली याविषयींच्या साक्षीदारांच्या उलट सुलट जबान्या उघृत करून चीफ् जस्टिस म्हणतात— ‘या पुराव्यावरून निर्णय जो निघतो तो हा की, पोलीस जेव्हा चौकातून धावून जात होते, तेव्हा त्याच्यावर थोडीशी दगडफेक झाली, आणि तरी देखील जेव्हा ते पुढेच जाऊ लागले, तेव्हा जोर त्यांच्यावर तुटून पडले व या दगलींत डी० एम्० पी० व डि० मॅ० यांच्यावर जबर मार पडला त्यांचे कपडे फाटले, त्यांचे टोप हरवले आणि डि० मॅ० चें घड्याळ व सिगारी फाळीहि हरविली. त्याच्या हाताच्या कोंपराचें हाड तुटलें व डोक्याच्या मागच्या बाजूस दगड लागून जखम झाली ”

यानंतर १४ व्या परिच्छेदांत डि० मॅ० व त्यांची टोळी यांनी झेंडा केव्हा काढून नेला याची पुराव्यावरून मीमांसा करण्यात आली. एद डि० मॅ० मि० मेल्कम यांच्याहि जबानींतली या बाबतींतली विसंगति चीफ जस्टिस यांच्या लक्षात आली. ते म्हणतात “इतर साक्षीदारांची तुलना करता त्याचें (डि० मॅ० चें) तपशीलाबाबतचें वक्तव्य

गोलमाल (vague) आहे; पण हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे की, मि० मेल्ड्रम यास डोक्याच्या मागच्याबाजूनें दगड लागून गंभीर जखम झाली होती आणि अतिशय गुंतागुंतीच्या अशा या मामल्यांतील (in a very confused proceeding) प्रत्यक्ष तपशिलांच्या बाबतींत त्याची स्मृति अगदीं स्वच्छ असणें संभवनीय नाहीं "

१५ व्या व १६ व्या परिच्छेदात, गाधीचौकातील दगलीच्या वेळीं डि० मॅ० व त्याचें दल यानी झेंडा काढला नव्हता, तो त्यानी मागाहून आणला ही गोष्ट चीफ जस्टिस यानी प्रस्थापित केली १७ व्या परिच्छेदात, गाधीचौकातील दगलीच्यावेळीं, साहेबमडळींनी प्रथम झेंडा काढण्याचा प्रयत्न केला व त्यामुळे रागवून नतर लोकांनी त्यांच्यावर हल्ला केला कीं, लोकांनी आधीच हल्ला केला होता याविषयींच्या जबान्यांची छाननी करण्यात आली आहे पाटलाचें जें वक्तव्यपोलीस डायरींत नोंदलेलें आहे व जें बरोबर असल्याचें त्यानें कोर्टांतहि कबूल केलें, तें वक्तव्य असें—"त्याच्या (पोलीस दल) पैकी कोणीं तरी, गाधीचौकांत उभारण्यात आलेलें, तिरगी सादीचें निशाण काढून नेण्याचा प्रयत्न केला पण दगेखोर धावून आले व त्यांनी तें निशाण त्याच्यापासून हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला दगेखोर हल्ला करीत आहेत हें पाहून तुम्ही जर निघून जाणार नाही तर गोळीबार करण्यात येईल अशी त्याना ताकीद देण्यांत आली पण दंगेखोरानी तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. उलट ते दगड मारू लागले व त्वेषानें हल्ला करू लागले ' याप्रमाणे पाटलाचें वक्तव्य उध्दृत केल्यावर चीफ जस्टिस म्हणतात—"यावरून असें म्हणता येणार नाही की, झेंडा प्रत्यक्ष काढला होता व त्याच वेळीं ते तो घेऊन गेले त्या तऱ्हेनें या विषयाचा उपन्यास करण्यात आला त्यावरून झेंडा पहिल्या दगलींत काढून नेण्यात आला हें कथन असिद्ध होतें, आणि पोलीसडायरींतल्या भाषेवरून एवढेंच सूचित होत की झेंडा काढण्याचा प्रयत्न करण्यात आला, पण त्याचा प्रतिकार करण्यात आला यापेक्षा त्या भाषेवरून अधिक कांहींहि सूचित होत नाही. हा साक्षीदार (म्ह० पाटील) उलट तपासणींत असें ठासून सागत आहे की, झेंडा काढण्याचा प्रयत्न करण्यापूर्वीच पोलीसदलापैकी कांहीं

लागलेला होता आणि विशेषत, डि० मॅ० व डी० एस्० पी० यांच्या डोक्या वर तर झेंडा काढण्यापूर्वीच मार लागलेला होता अर्थात्, जमलेला समूह बेकायदा होता या विषयीं मुळीच संशय राहू शकत नाहीं झेंडा उपटण्याचा कोणताहि प्रयत्न दूर करण्यापूर्वीच हा समुदाय बेकायदा जमाव बनलेला होता."

यानतर १८ व्या परिच्छेदात, मग झेंडा प्रत्यक्ष कोणी काढला याची चर्चा करण्यात आली आहे झेंडा प्रत्यक्ष कोणीं काढला याविषयीं इतर साक्षीदार मुग्ध असले तरी सार्जेंट क्वीन या बाबतींत फार निश्चयात्मक रीतीने बोलला हें दाखवून चीफ् जस्टिस लिहितात—"या बाबतींत निश्चयात्मक असे एकच साक्षीदार बोलला तो म्हणजे क्वीन तो म्हणाला कीं, डी० एस्० पी० मि० ग्रॅट, यांनी झेंडा काढून आणला. मि० ग्रॅट यांना साक्षीदार म्हणून बोलावण्यांत आलें नव्हतें. याबाबत सरकारच्या तर्फे असें स्पष्टीकरण देण्यांत आलें आहे कीं, दंगेखोरांपैकीं कोणालाच तो ओळखूं शकला नसता म्हणून त्याला साक्षीदार या नात्याने बोलावण्याची आवश्यकता नव्हती हें स्पष्टीकरण पर्याप्त आहे, असें आम्हांला वाटत नाही हजर असलेल्या दोन प्रमुख अधिकाऱ्यांपैकी एक या नात्याने मि० ग्रॅट जर साक्षीदार म्हणून बोलावले गेले असते, तर कमी शिकलेल्या अशा इतर साक्षीदारापेक्षा नितीतरी अधिक सुसंगवार असें स्पष्टीकरण अनेक मुद्यावर ते देऊ शकले असते त्यानी स्वत च दुसऱ्यांदा चौकांत जाऊन झेंडा काढून आणलेला होता आणि दंगलीच्या म्हणजे पहिल्या खेपेसहि त्यानी झेंडा काढण्याचा प्रयत्न केला होता. म्हणूनच त्यांना साक्षींत बोलावण्यांत आलें नव्हतें असा आमचा ठाम समज झाला आहे. त्यांची ही कृति जरी बेकायदा नसली, तरी तिच्यामुळेच जमावाच्या रागाचा पारा, एरव्हीं भडकला नसता इतका, भडकला."

इतकें सर्व मान्य करूनहि ची० ज० पुढे म्हणतात—"झेंडा हा जरी जप्त करण्यात आला नव्हता व झेंडा उभारणें हें प्रतिबंधित कृत्य नव्हत, तरी

याप्रसंगीं तो सरकारी सत्तेचा विरोध दर्शविण्यासाठीच उभारण्यात आला होता यांत शंका नाही आणि **एका विघडलेल्या व बेकायदा जमावाचा बंदोबस्त करीत असताना (असला विरोधाचे प्रतीक बनलेला) झेंडा काढून घेण्याचा प्रयत्न करणें अगदी स्वाभाविक होतें "**

याप्रमाणे डि० सुप० ऑफ पोलीस ग्रँट याच्या कृतीचें समर्थन केल्यानंतर पुढील उद्गार काढणें चीफ् ज० यास आवश्यक वाटलें ते म्हणतात—"**झेंडा काढून नेण्याचा पहिला प्रयत्न विफल झाल्यानतर, मागाहून पुन्हा पोलीसदल बरोबर घेऊन चौकात जाणें व झेंडा काढून आणणें अनावश्यक व अन्यायाचें (injudicious) होतें मध्ययुगीन लढाईच्या ज्या विचित्र तऱ्हा होत्या व विजयपताका आणण्याची त्या काळची जी पद्धति होती त्यासारखाच हा प्रकार होय "** ग्रंट याच्या बाकीच्या कृत्यांचें समर्थन करीत असतानासुद्धा वरील शालजोडींतला अहेर त्यास चीफ् ज० यास करावासा वाटला हें विशेष ध्यानात ठेवण्यासारखें आहे. पण हा अहेर हलका झाला असें वाटूनच की काय, ची० ज० पुढे म्हणतात—" या त्याच्या मूर्तीचाच आणखी एक दुर्दैवी व अपरिहार्य परिणाम असा झाला की, पोलीसपार्टी पाटलाच्या घरात दडली, तऱ्हा त्याला लोकांनी वेढा दिला, आणि कोणत्या शर्तीवर आपण झेंडा परत करण्यास तयार आहोत याविषयी नामुष्कीची बोलणी करण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला व ती बोलणींहि फसली, आणि परिणामत लोकांचा क्षोभ पुन्हा भडकला व त्याच्यासमोर अधिक अधिक माघार घेणें त्यांना भाग पडलें **मि० ग्रँट यांच्या या सारासार, विवेकहीन वर्तनावर कसून होणारी उलट तपासणी टाळावी म्हणूनच फिर्यादीने त्याना साक्षीदाराच्या पिंजऱ्यात बोलाविलें नाही, असें आम्हास वाटतें."**

मि० ग्रँट याना साक्षींत न बोलावण्यातला सरकार पक्षाचा दुष्ट हेतु याप्रमाणे उघड करून दाखविणें ची० जस्टिस यानाहि अपरिहार्य झाल

तथापि १८ व्या परिच्छेदाच्या शेवटच्या वाक्यात ते म्हणतात—" तथापि मला या ठिकाणीं हें पुन्हा सांगितलेंच पाहिजे की, ध्वजस्तंभ मोडण्याचा व झेंडा काढून नेण्याचा प्रयत्न झाल्यामुळे, पोलीसदल परत फिरल्यावरहि त्याच्यावरील हल्ला या चालू ठेवण्यांत आला याचें थोडेसें स्पष्टीकरण होऊं शकतें, पण त्यामुळे लोकानी जी हिंसा केली व ज्या हिंसेमुळे पोलीस-दलाच्या प्राणाना धोका उत्पन्न झाला होता आणि जिच्यामुळे केवळ आत्म-रक्षणार्थ गोळीबार करण्याचा प्रसंग त्याच्यावर आला तिचें समर्थन मात्र होऊं शकत नाही "

पुढे १९ व्या परिच्छेदात 'रामसिंग मारवाड्याच्या कोठ्याजवळ झालेल्या घटनाचें' वर्णन करून चीफ् ज० यानी असें प्रस्थापित केलें आहे की, गांधी चौकांत पोलीसदलावर हल्ला करणारा जमाव आणि नदीवर पाठलाग करणारा जमाव हे दोन भिन्न जमाव होते असें मानता येणार नाही

२० व्या व २१ व्या परिच्छेदात, पाटलाच्या घरात पोलीसदल दडून असताना झालेल्या घटनाबद्दल मेल्ड्रम व सार्जंट क्वीन यांच्या जबान्यात जो फरक पडला व जी विसंगति दिसून आली त्याचा परिहार चीफ् ज० यानी केला आहे, आणि नंतर पुन्हा नदीपार रामसिंगच्या कोठ्याजवळ घडलेल्या घटनाचा निर्देश करून २१ व्या परिच्छेदाच्या शेवटीं ते म्हणतात—' **सार्जंट क्वीन याने जर करारी वर्तन ( resolute conduct ) केलें नसतें व निशाणबाजींतलें आपलें कौशल्य दाखवून, पाठलागाच्या या अंतिम अवस्थेंत जमावाच्या पुढाऱ्याना लोळविलें नसतें, तर पोलीसदलास जमावानें गुरफटलें असतें व ठार मारलें असतें यांत शंका नाही** "

२२ व्या परिच्छेदांत आरोपींना झालेल्या शिक्षा व त्याचीं कलमें याची चर्चा करण्यात आली आहे त्यात त्यानी असें म्हटलें आहे की, **३३३ व ३३२ कलमें १४९ कलमावरोबर वाचून शिक्षा दिल्या-नंतर पुन्हा त्याच लोकाना ३२४ व ३२५ कलमान्वयें शिक्षा देणें वायफळ ( Superfluous ) होतें** "

चीफ् ज० यांचें हें वरील वाक्यातील पार्गोट स्पेशल जज्ज मि० दडे व रिव्हयू जज्ज मि० पोलक याच्या डोक्यावर बसण्यासारखें आहे

शेवटच्या म्हणजे २३ व्या परिच्छेदात चीफ् ज० म्हणतात—"आरोपींपैकी बहुसख्य लोकाना ४ वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यात आली आहे, व त्यापैकी २ वर्षे त्यानी आतापर्यंत भोगिलीहि आहे. शिक्षा कमी करण्यात यावी ही प्रार्थना सामान्यतें करण्यात आली विशिष्ट व्यक्तींचीं नावें घेऊन करण्यात आली नाही. **एकंदर जमावाचा समुचित विचार करतां यांची शिक्षा कमी करणें इष्ट आहे असें मला वाटत नाहीं;** कारण पुराव्यावरून हें स्पष्ट झालें आहे की, झालेल्या हल्ल्यात पोलीस दलाचे प्राण गेले नाहीत, ही भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे ज्याना फक्त दोनच वर्षांची शिक्षा झाली आहे त्याची मुदत आता सपत आली आहे. लड्डूशा व नशविखा याने टि० मॅ० वर हल्ला केला होता व त्याला झालेल्या गभीर दुखापतीला तेच जबाबदार आहेत, म्हणून त्याना प्रत्येकीं सात वर्षांच्या सक्त मजुरीची शिक्षा झालेली आहे. पण त्याची शिक्षा का कमी करण्यांत यावी याचीं कोणतींहि खास कारणें सागण्यांत आलेलीं नाहीत, "खून करण्याचा प्रयत्न" हा जो आरोप त्याच्यावर ठेवण्यात आलेला होता त्या बाबतींत (खालच्या कोर्टांतून) त्याना दोषमुक्त करण्यात आल्यानंतर त्याना देण्यात आलेली शिक्षा काहीशी अयुक्तिक (illogical) वाटते जमावाने जें केलें व जें करण्याचा प्रयत्न केला त्याहून अधिक त्यानी काहींच केलें नाही म्हणून त्यांच्या बाबतींत शिक्षा कमी करणें व ती चार वर्षांवर आणणें समर्थनीय ठरेल एवढी सुधारणा करून बाकीच्या शिक्षा म्हाइयामतें कायमच ठेवल्या पाहिजेत"

सही—एफ० एल० ग्रिल,
चीफ् जस्टिस

ता० २९-१२-१९४४

# शहीद स्मारकसमितीची स्थापना

राष्ट्रीय–परिस्थिति क्रमाक्रमाने निवळत गेली केवळ दडपशाहीच्या जोरावर लोकांच्या शारीरिक उठावण्या कांही काळ दाबणें शक्य असलें तरी त्यांच्या मनांत भडक्लेली असंतोषाची आग विझवणें अशक्य असतें, याची जाणीव ब्रि० सरकारला होत गेली महायुद्ध संपलें युरोपांत दोस्त विजयी झाले प्रशांत महासागरांत अमेरिकेच्या परमाणु–स्फोटकाने (Atom Bomb) जपानवर मात केली जपाननेंहि दोस्तांसमोर गुडघे टेकले युद्धसमाप्तीच्या सुमारास म्हणजे युरोपांतील युद्धात विजय मिळाल्यावर व जपानी युद्धाचा अंत होण्यापूर्वी ब्रि० साम्राज्याचे कुटिल महामंत्री चर्चिल हे आणखी एक डाव खेळले महायुद्धाच्या निमित्ताने हातांत आलेली ब्रि० साम्राज्याची सत्ता आणखी निदान पांच किंवा तीन वर्षे तरी आपल्याच हातीं रहावी अशी हाव त्यास सुटली म्हणून पूर्वेकडील युद्ध संपण्यापूर्वीच ब्रिटनमध्ये त्यांनी निवडणुकीचा फड मांडला युद्धनेते व युद्धविजेते या नात्याने त्यांना ब्रि० जनतेंत जी लोकप्रियता मिळाली होती तिचा फायदा घेऊन युद्धाचा पूर्वेकडील भाग संपण्यापूर्वीच स्वदेशांत निवडणुकीचा फड जिंकण्याचा त्यांनी इरादा केला पण त्यांत ते अयशस्वी झाले त्यांच्या पक्षाचा प्रचंड पराभव झाला आणि ब्रिटनच्या इतिहासांत पहिल्यादांच ब्रि० मजूरपक्ष प्रचंड बहुमताने पार्लमेंटांत निवडून आला व अधिकारारूढ झाला

मजूर मंत्रीमंडळ ब्रिटनमध्ये अधिकारारूढ झाल्यानंतर ब्रिटनच्या साम्राज्यविषयक व आंतरराष्ट्रीय धोरणांत क्रमाने पण निश्चितपणें परिवर्तन होऊं लागलें ब्रि० लोक हे परिवर्तनतंत्रांत मोठे कुशल आहेत प्रत्यक्ष परिवर्तन असतानाहि त्याला ते परिवर्तन म्हणणार नाहीत बादशहांच्या सरकारचें जुनें व निश्चित धोरणच आम्ही पुढे चालवीत आहोंत असें ते म्हणत राहतील प्रत्यक्ष आपल्या बादशहाचें डोकें ते कापून आणतील पण आपण ही क्रांति केली असें

## स्मारकाकारतां २००० रु. किमतीचे शेत बक्षीस दिले



श्रीमान शेठरामकिसन अयादास (ऊर्फ) बापू शेठ



दे भ रघुनाथमल कोचर
एम् एल् ए



श्री देवकिसन झेवर

ते तोंडाने कधी म्हणणार नाहींत. आपल्या पिढीजात स्वभावास अनुसरून बादशहा सरकारचें हिंदुस्थानविषयक निश्चित धोरण अमलात आणण्याच्या उद्योगास मजूर-सरकार लागलें चर्चिल-मंत्रिमंडळाच्या धोरणात आमूलाग्र परिवर्तन केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें

या ठिकाणीं आम्ही एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, जरी महात्मा गांधींना काँग्रेसचें आंदोलन सुरू करण्याची संधि चर्चिल यांच्या मंत्रिमंडळाने दिली नव्हती व कित्येक दिवसपर्यंत पुण्याजवळ आगाखान-प्रासादात त्यांना त्यांना डांबून ठेवलें होतें तरी तेथूनहि गांधीजी एकटे हिंदी स्वातंत्र्याची लढाई लढतच होते आगाखान-प्रासादाच्या बंदीखान्यातून गांधीजींनी त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो व ब्रि० मंत्रिमंडळ यांच्याशीं केलेला पत्रव्यवहार हें एक अपूर्व वाङ्मय आहे तो एक अद्भुत वाङ्मय-खंड आहे. जगाच्या स्वातंत्र्य-वादी वाङ्मयात, आगाखान-प्रासाद व व्हाइसरॉय-प्रासाद यांच्या दरम्यान झालेल्या या पत्रव्यवहाररूपी वाङ्मयखंडाचें स्थान फारच उंच लागेल यांत शंका नाहीं गांधीजींना हिंदुस्थानात कांहीं करता येऊं नये म्हणून चर्चिल महाशयांनी त्यांना तुरुंगात डांबलें, पण तेथे बसून त्यांनी जें केलें तें हिंदुस्थानाच्या तर कानीं पडेलच, पण जगाच्या बाजारात त्यामुळे काँग्रेसची इभ्रत आणखी वाढली व ब्रि० सत्तेची इभ्रत घटली हिंदी स्वातंत्र्याचाच केवळ नव्हे, तर जगातील सर्वच पददलित जनतेचा लढा हा एकटा म्हातारा तुरुंगांतून लढला. गांधीजींच्या या माऱ्याने लॉर्ड लिनलिथगो इतका हैराण झाला की, त्याची ती व्यथा त्याच्या पत्रव्यवहारात उमटू लागली

गांधीजी तुरुंगात असताना त्यांच्या परिवारातील दोन सर्व श्रेष्ठ परिजन ब्रि० सरकारच्या बंदीवनाच्या आगींत जळून भस्मसात् झाले महादेव भाई देसाई व पूज्य माता कस्तुरबा यांचे तुरुंगातील मृत्यु हा ब्रिटनच्या राज्य व्यवस्थेवर लागलेला कायमचा कलंक होय पुढे गांधीजींनी तुरुंगात २१ दिवसांचा उपवास केला या उपवासाचं नीतिशास्त्रहि त्यांनी ब्रि० सरकारला लिहिलेल्या पत्रांतून प्रकट झालें आहे ब्रि० सरकार त्यावेळीं गांधीजींचें रक्त पिण्यासच बसलेलें होतें चर्चिलशाही राजवटीचा तो दंडक होता गांधीजींच्या उपवासाने सर्व

देश हादरून गेला त्याना गुरेमिया झाला. त्याची शुद्धहि गेल्यासारखी झाली काही दैवी चमत्कार झाला तर गांधीजी बचावतील, एरव्ही त्याची आशा सोडलेली चागली असें नामांकित डॉक्टर बोलू लागले पण ब्रि० सरकार त्यावेळीं दगडासारखें मख्ख होऊन बसलें. त्याने अशाहि स्थितीत गाधीजींची मुक्तता करण्याचें नाकारलें असें म्हणतात की, उपवासात गांधीजी जर मेलेच तर त्याचें दहन करण्यासाठी चदनी चितेची सर्व तयारी नि० सरकारने करून ठेवली होती पण गाधीजींची इच्छाशक्ति जबर! उपवासाच्या अग्निदिव्यातूनहि ते पार पडले डॉक्टर लोकानी म्हटल्याप्रमाणे चमत्कार घडला खरा!!

यानंतर आम्रविकाराने आजारी पडल्याचें निमित्त करून ब्रि० सरकारनें त्याची मुक्तता केली पुन्हा देशात नवचैतन्य खेळूं लागलें हजारोंचे समुदाय त्याच्या प्रार्थनेस जमू लागले राजकारणाचें तुबलेलें पाणी प्रवाही होऊ लागलें मुदतबदींचे अनेक पुढारी सुटूं लागले. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय वार्ताहरांचीं घोळकीं गाधीजींच्यामागें फिरूं लागलीं. नवीन आलेले व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यानी गाधी–लिनलिथगो–पत्रव्यवहार प्रसिद्ध करण्यास परवानगी दिली ब्रि० सरकारच्या नीतिवर्तनाच पहिलें गमक उपलब्ध झालें.

हळूहळू हें परिवर्तन अधिक विशद होऊं लागलें. अद्यापि इग्लडमधल्या निवडणुकी सपल्या नव्हत्या. लोकमताची खुशामत करण्याची जरुरी मि० चर्चिल याना भासू लागली होती हिंदुस्थानांतील त्याची दडपशाही विफल ठरली होती. निवडणुकींतला एक पवित्रा म्हणून त्यानी हिंदुस्थानातील दडपशाहीचें धोरण परत घेण्याचें ठरविलें आणि हिंदुस्थानात हिंदी पुढाऱ्याची सर्वपक्षीय परिषद भरवून तिच्यापुढें हिंदी सुधारणाच्या काही योजना माडण्याचें ठरविलें त्यासाठीं कॉंग्रेस–वार्किंग–कमेटीची अहमदनगरच्या किल्ल्यांतून मुक्तता करण्यात आली पहिली सिमला–परिषद भरली व अयशस्वी झाली. पण राजकारणाचा प्रवाह वेगाने वाहू लागला आपले राष्ट्रीय पुढारी सुटलेले पाहून जनतेला महान् आनद झाला

ब्रिटनमधल्या निवडणुकींत चर्चिलपक्ष पराभूत झाला व मजूरपक्ष विजयी झाला. व्हॉइसरॉय लॉर्ड वेव्हेल यानी इग्लंडची वारी केली हिंदुस्थानात केंद्रीय

व प्रांतीय विधीमंडळाच्या निवडणुकींची नव्या मजूरसरकारची घोषणा बरोबर घेऊन ते परत आले. निवडणुकींची प्रचंड धामधूम झाली. १९३६ च्या निवडणुकीत हिंदुस्थानांतील ११ पैकी ६ प्रांतात कॉंग्रेस विजयी झाली होती. पण १९४६ च्या या निवडणुकींत ती ११ पैकी ८ प्रांतांत विजयी झाली. केंद्राचा प्रश्न सुटेल तेव्हा सुटो. पण १९४६ च्या एप्रीलांत हिंदुस्थानच्या आठ प्रांतांत कॉंग्रेसचीं मंत्रिमंडळें सुरू झालीं. अत्यंत बिकट अशा आर्थिक व सामाजिक परिस्थितींत कॉंग्रेसने अधिकाराचीं सुत्रें हातीं घेतलेलीं पाहून जनतेला निरतिशय आनंद झाला

या निवडणुकींच्यावेळीं मध्यप्रांत कायदेमंडळासाठी कॉंग्रेसचे अमरावती तालुक्यातील उमेदवार म्हणून यावलीचे वीर पंजाबराव यांना उभें करावें असा काही मंडळींनी प्रयत्न केला. पण वेळेच्याआंत त्यांच्या निवडणुकीचा अर्ज प्रांतीक कॉंग्रेस कमेटीकडे दाखल करणें शक्य झालें नाही, व यामुळे हा विचार सफल होऊं शकला नाही. वऱ्हाड-मध्यप्रांतांत कॉंग्रेसचें मंत्रीमंडळ स्थापन झाल्यावर त्याने चोवीस तासात आष्टी, चिमूर, रामटेक, यावली येथील राजबंदींची व मगनलाल बागडी प्रभुति हिंदुस्थानी लालसेनेच्या लोकांची तुरुंगातून मुक्तता केली. वीर पंजाबराव सुटून आले. यावलीकरांना परमानंद झाला.

यावलीच्या वीर गाथांचा प्रसार आधीच प्रांतभर झालेला होता. १९४५ सालीं, म्हणजे १९४४ च्या डिसेंबरांत हायकोर्टाच्या निर्णयाने यावलीचे ता. १८ ऑगस्टचे वीर सुटून आल्यानंतर प्रथमतःच, १८ ऑगस्टचा दिवस यावलीला मोठ्या थाटामाटाने व उत्साहाने साजरा झाला होता. आपले वीरपुत्र सुटून आलेले पाहून यावली आपलें गेल्या दोन तीन वर्षांतलें सर्व दुःख विसरली. तिची मान सुरवातीपासून अखेरपर्यंत ताठच राहिली. आता फक्त एकच शल्य तिच्या काळजात सलत होतें तें म्हणजे १५ ऑगस्टच्या क्रांतीचे वीर पंजाबराव व त्याचे सहकारी अजून तुरुंगांत होते, हें होय. पण कॉंग्रेस मंत्रिमंडळाने अधिकार ग्रहण केल्यावर कांहीं तासांतच त्यांची मुक्तता केल्यानंतर तर यावलीच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. स्वातंत्र्याच्या वेदीवर बलिदान गेलेल्या वीर पुत्राच्या मरणाचा तिला गौरव वाटत होता. पंजाबराव यांच्या सुटकेनंतर

शहीद स्मारक समिती स्थापन केली आणि यावलीच्या आपल्या विपद्ग्रस्त बांधवांना मदत करणें आणि यावलीच्या शहीदांचें स्मारक उभारणें हीं दोन कामें त्यांनी तावडतोब हातीं घेतलीं यावली येथील दानशूर शेठ श्री रामकिसन अबादास उर्फ बाबूशेठ मुंदडा यांनी तावडतोब गावाशेजारील सुमारें २५०० रु. किंमतीची आपली २ एकर २० गुंठेची वाडी स्मारकासाठी शहीद स्मारक समितीला दान दिली त्यांच्या या औदार्यामुळे स्मारकाच्या योजनेला एकदम जोराचा चालना मिळू शकली याशिवाय विदर्भ प्रांतिक काँग्रेस वऱ्हाडातील शहीदांच्या स्मारकासाठी त्यांनी ५०० रु ची देणगी दिली आहे यावलीच्या सार्वजनिक कार्यात १९४२ पासून आजपर्यंत वेळोवेळीं त्यांनी उदार साह्य केलें आहे

जी गोळी लागली ती अजून त्याच्या मांडीत आहे. ती वेव्हाच काढण्यांत आली नाही. तिच्या वेदनांनी तो अजून विव्हळत आहे.

अशा रीतीने कित्ता तरी लोकाना, त्याचा काहीएक अपराध नसताना यातना सोसाव्या लागल्या अशा परिस्थितीत, त्याना नुकसान भरपाई मिळाली पाहिजे हा आमची प्राथमिक न्यायाची मागणी आहे त्याना जें नुकसान व ज्या यातना भोगाव्या लागल्या त्या बद्दल सरकारच जबाबदार आहे कारण सरकारी नोकरानी बेकायदा कृत्यें केलीं म्हणूनच ही आपत्ति या लोकाना भोगावी लागली.

(१) निरनिराळ्या मुदतीसाठी जे लोक तुरुंगात डाबले गेले होते त्याची यादी सोबत जोडली आहे. तींत त्याचा आर्थिक दर्जाहि नमूद करण्यात आला आहे ते जितके दिवस तुरुंगात होते तितक्या दिवसाची नुकसानभरपाई त्याना मिळावी अशी आमची मागणी आहे

(२) गोळीबारात जे मेले त्याची व त्याच्यावर अवलंबून असलेल्या व साप्रत अगदीच निराश्रित झालेल्याचीहि यादी सोबत जोडली आहे या हुतात्म्याच्या निराश्रित कुटुंबियाना पूर्ण नुकसानभरपाई मिळावी अशी आमची मागणी आहे

(३) गोळ्या लागून जे जन्माचे जायबंदी झाले आहेत अशा लोकाचीहि एक यादी सोबत जोडली आहे. त्याना हयातभर पेन्शन मिळावी अशी आमची मागणी आहे.

(४) ज्याच्या जवळून सामुदायिक दंड वसूल करण्यात आला त्याचीहि एक यादी सोबत जोडली आहे. त्याचा दंड त्याना व्याजासहित परत मिळाला पाहिजे अशी आमची मागणी आहे.

(५) ज्याच्या घरांची मोडतोड करण्यात आली व जंगम मालमत्ता लाद-विण्यात आली अशाचीहि एक यादी सोबत जोडली आहे त्यानाहि नुकसान भरपाई मिळावी अशी आमची मागणी आहे.

(६) ज्याची जगम मालमत्ता जप्त करून विकण्यात आली त्याची एक यादी सोबत जोडला आहे आमची अशी मागणी आहे की, विक्रीची किंमत त्याना परत करण्यात यावी

(७) ज्याच्या जवळून लाचलुचपत घेण्यात आली अशाची यादी सोबत जोडण्यात आली आहे या आरोपाची चौकशी व्हावी व गुन्हेगाराना शासन करण्यात यावें अशी आमची मागणी आहे

(८) डि० मॅ० मेल्डूम, डी० एस्० पी० प्रॅड व त्याची जी टोळी १८-८-४२ ला यावर्लीस गेली होती त्या सर्वांचा चौकशी होऊन त्याच्यावर खटला भरण्यात आला पाहिजे अशी आमची मागणा आहे एकदा अधिकाराचा खोगीर काढून टाकला म्हणजे तशाच रीतानें त्याच्या वर्तनाची चौकशी झाली पाहिजे कोणत्याहि खासगी व्यक्तीच्या असल्या वर्तनाला जे कायदेनियम लागू पडतील त्याच्याच आधारें त्यानीहि चौकशी झाली पाहिजे व तेच कायदे त्यानाहि लागू करण्यात आले पाहिजेत, आणि त्याच कायद्यानुसार त्याना शासनहि झाल पाहिजे

कायद्याच्या दृष्टीनेहि परिस्थिति अशीच आहे डि० मॅ० हा आपलें सरकारी कर्तव्य बजावण्यास यावर्लीस गेला नव्हता हें एकदा मान्य केलें, म्हणजे तो दगेखोर ठरतो आणि त्यानें उभारलेल्या बेकायदा दगेखोराचा सशस्त्र टोळी आणि शांतताप्रिय ग्रामीण लोक याच्यांत ता० ऑगस्ट १९४० ची चकमक उडाली असें ठरतें डि० मॅ० ची टोळी ही बेकायदा जमाव तर होताच पण ता आक्रमकहि होता त्याच्याजवळ शस्त्रें होतीं डाका घालणें व लूटमार करणें, हा त्याचा उद्देश होता गावात प्रवेश केल्यापासूनच त्यानीं उद्दामपणाची व आक्रमक वृत्ति धारण केली होती त्यानी लोकावर गोळ्या झाडल्या व खून पाडले ९३ कलमी सरकारलाहि या खटल्याच्या या स्वरूपाची जाणीव झाली होती, आणि या खटल्यांतलि अपीलाचा निर्णय जाहीर झाल्यावरोबर C P & Berar maintanance of order and resto ation of order and collection of fine (indewnity) नावाचा कायदा त्यानी जारी केला १९४५ चा

